


३ आवाजी रघुनाथ चिटणीस १ बाळाराव गोविंद दिवाण
२ मिर्जा अब्दुल रहीमबेग

**श्री महादजी शिंदे**
खानगी दरबार [१७८०]

१ कलदरखान गवई ३ पखवाजी
२ मकन गवई

श्री

# शिंदेशाही इतिहासाचीं साधनें.

## भाग १ ला.



संस्थान कोटा येथील

शिंदेसरकारचे वकील गुलगुले

यांचे दप्तरांतील

शिंदे राजघराण्याचा असल पत्रव्यवहार.

१७९० ते १८२४ विक्रमी.

संपादक,

आनंदराव भाऊ फाळके

मुद्रक,

य. ता. माणगांवकर, आलीजाह दरबार प्रेस,

लष्कर, ग्वाल्हेर.

१९२९



कैलासवासी श्रीमाधवराव शिंदे आलीजाह बहादुर

श्रीकृष्ण.

# अर्पण पत्रिका.



श्रीनाथ

श्रीमहाराजाधिराज श्रीमहाराज श्रीआलीजाह

कैलासवासी

## श्रीमाधवराव शिंदे बहादुर.



ज्याने पूर्वापार ऋणानुबंधपरंपरा राखून रंकाचा राव केला,
राज्यकारभारांतून संधी साधून या अर्भकासाठीं कावाडकष्ट
सहन करून व सहस्रावधि अपराध पोटी घालून
पुत्रवत् लालनपालन केले आणि संसारसागर
तरणोपायाची दीक्षा दिली त्या अनुपमेय
विभूतीस तिचे अतुलपराक्रमी व राजकार्य
धुरंधर पूर्वज श्रीमन्महाराजाधिराज
महाराज श्रीमहादजी शिंदे
यांच्या पुतळ्याचे अनावरण-
समारंभ शुभप्रसंगी ही
अल्प सेवा सादर
समर्पित
असो.

ॐ

मिति माघ कृष्ण १० बुधवार,
विभवनाम संवत्सर,
संवत् १९८५

शेषाश्रित शिलेदार,
आनंदराव भाऊ फाळके,
ग्वाल्हेर.

# सूचीपत्र.

## विषयसूची.

## चित्रसूची.



---

## चिन्हसूची.

| | |
|---|---|
| * | असल पत्राची तारीख |
| ⁎ | पैवस्तीची तारीख. |
| † † | पत्र व पैवस्तीखेरीज अन्य तारीख. |
| ♆ | हस्ताक्षर कनिष्ट अधिकारी |
| †' | ,, वरिष्ट अधिकारी. |
| † Å | ,, शिलेदार सरदार. |
| ॐ | ,, शिंदे राजघराण्यांतील व्यक्ति. |
| 卍 | राजमुद्रा. |

———ॐ———

# ग्रंथसूची.


| | | |
|---|---|---|
| १ खरे वासुदेव वामन शास्त्री | ऐतिहासिक लेखसंग्रह. भाग २,३. | .. |
| २ खरे. यशवंत वासुदेव | मराठी राज्याचा उत्तरार्ध. भाग १. | १९२७. |
| ३ गहलोत. जगदीशसिंह | मारवाड राज्यका इतिहास. | १९२५. |
| ४ तारीख | जागीरदारान [ ग्वालियार ] भाग १,२. .. | १९१३. |
| ५ नातू. विष्णु रघुनाथ | आलिजाह बहादुर माधवराव शिंदे यांचे चरित्र. .. | १८९४. |
| ६ पारसनीस. दत्तात्रय बलवंत | श्रीब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर यांचे चरित्र व पत्रव्यवहार. .. | १९००. |
| | बायजाबाई शिंदे यांचे चरित्र | १९०२. |
| | इतिहाससंग्रह .. | .. |
| | शिंदे सरकारची शकावली | १९११. |
| | शिंदेशाही पत्रव्यवहार भाग ३,५ | .. |
| ७ फडके शंकर तात्या | शिंद्यांचे घराण्याचा इतिहास. | १८६४. |
| ८ भागवत. राजाराम रामकृष्ण शास्त्री | मराठ्यांच्या संबधाने चार उद्गार. | १८८९. |
| ९ भागवत. अनंत नारायण | होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग १ | १९२१. |
| १० भारतेतिहास मंडळ पुणे. | चंद्रचूडदप्तर. कला १. शके | १८४२. |
| | फार्शी मराठी कोश. | १९२५. |
| | त्रैमासिक. वर्ष ९ अंक २. शके | १८५०. |
| ११ रघुनाथ यादव [ विरचित ] | पाणिपतची बखर . | १९१४. |
| १२ राजवाडे. काशिनाथ विश्वनाथ | मराठ्यांच्या इतिहासांची साधने खंड १,१३. .. | १९००. |
| | ऐतिहासिक प्रस्तावना. | १९२७. |
| १३ राजाध्यक्ष. नरहर व्यंकाजी | जिवाजी वल्लाळ [बक्षी] केरकर यांचे चरित्र. .. | १९०७. |
| १४ रानवडे. मोरो लक्ष्मण | तारीख सिंधिया. [हस्तलिखित] | १८११. |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | लेले. काशिनाथ कृष्ण | धार संस्थानचा इतिहास. | १९१८. |
| १६ | वैद्य. चिंतामणराव विनायक | मराठ्यांचे क्षत्रियत्व. | १९२७. |
| १७ | शर्मा. गणेश रामचंद्र | सारस्वत भूषण भाग १. | १९१०. |
| १८ | शालिग्राम. शंकर तुकाराम | ऐतिहासिक पोवाडे [द्वितियावृत्ती] | १९११ |
| १९ | सत्कार्योत्तेजक सभा धुळे | इतिहास व एतिहासिक | . |
| | | पेशवाईची अखेर. भाग ३. | |
| २० | सरदेसाई गोविंद सखाराम | नानासाहेब पेशवे | १९२६. |
| २१ | साने काशीनाथ नारायण | भाऊसाहेबांची बखर. | १९२२. |
| २२ | केरसुने | अप्रकाशित पत्रे | |
| २३ | मुझूंदार फडणीस राजगडवाले | अप्रकाशित पत्रे | |
| २४ | सरदार शिंदे पिंगोरीकर | अप्रकाशित पत्रे | |
| २५ | सरदार शिंदे सरनोबत | अप्रकाशित पत्रे | |
| २६ | क्षीरसागर | अप्रकाशित पत्रे | |

## ENGLISH

| | | | |
|---|---|---|---|
| 28 | Aitchison C W | .. Treaties And Engagements vol iii, iv. | 1893 |
| 29 | Gwalior | Selections Durbar Records. | |
| 30 | Tod Col. James | .. Annals and Antiquities of Rajasthan. vol i, ii Popular Edn. | 1914. |

# अभिप्राय

—⁂—

भारतइतिहाससंशोधनाच्या कार्यात अत्यत महत्वाची भर या पुस्तकानें पडत आहे. श्रीमत सरदार आनंदराव भाऊसाहेब फाळके यानीं हे सशोधनात्मक पुस्तक प्रसिद्ध केले आहे यात विशेष औचित्य आहे. हे शिंदेशाहीतील जुने सरदार असून त्या राज घराण्याविषयीं त्यास साहाजिक जन्मत: अभिमान आहे आणि असा सहजाभिमान विषय भूत घराण्याविषयीं असल्याशिवाय त्या घराण्यातील पुरुषाचे चरित्र योग्य समजणे शक्य नाहीं पण फाळके साहेब हे विद्वान् आणि बुद्धिमान असल्यानें हे संशोधनाचे कार्य अधिक आदरार्ह झाले आहे. त्यानी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे या पुस्तकाच्या टीपांत 'केवळ शिंदेशाहीचाच दृष्टीकोण स्वीकारिला नाही.' त्याचप्रमाणे या टीपात 'कोणावर कटाक्ष ठेवून धार धरली नाहीं.' ही गोष्ट केवळ विद्वान् समतोलवृत्ति मनुष्यासच साधते. ग्रंथ कर्त्यानें हल्लीं उपलब्ध असलेली सर्व माहिती जमेस धरली आहे हे सागण्यासारखे आहे अमुक एक ग्रंथ पाहिला नाहीं असे कोणी म्हणू शकत नाही आणि यामुळे ग्रंथकर्त्यानें जागजागीं दिलेल्या टीपा माहितीनें भरलेल्या आहेत कोटेकर शिंदेशाही वकीलाचा पत्र संग्रह श्रीमत आनदराव भाऊसाहेब फाळके याच्या हातीं लाभला ही याचप्रमाणे अत्यत समाधानाची गोष्ट होय. या ग्रंथावरून नवीन माहिती महत्वाची कळते, इतकेच नव्हे तर काहीं जुन्या चुकीच्या समजुतीहि दुरुस्त होतील. शिंदे होळकराचा वेबनाव कुभेरीवर झाला नाहीं असे दिसते. टॉडची विधानेहि काहीं ठिकाणीं सोडावीं लागतील. असो. पुढील भागा कडे या पुस्तकाने वाचकाचे डोळे लागले आहेत हे सागावयास नको. पुस्तकाचे बाह्यांग व त्याची छपाई उत्तम असून पत्रांतील भाषा जशीच्या तशी छापणे व कित्येक उत्तम फोटो देणे यानीं पुस्तकास फार शोभा आली आहे.

चिंतामणराव विनायक वैद्य.

पुणे, २१ सितंबर १९२९.

श्रीकृष्ण

# शिलेदाराची आलेराई.

काय म्यां पामरे बोलावी उत्तरे ।
परि त्या विश्वंभरे बोलविले ॥
श्रीतुकाराम

या पुस्तकाच्या शिरोभागी असलेल्या त्रिशद्वांनी कशी धादल उडविली आहे बरे ! ' वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ' या गीतोक्तीचा साक्षात्कार मी प्रत्यक्ष अनुभवीत आहे. कर्तव्यमूढतेच्या या इंद्रजालात अकस्मात् फसलो किंवा मनसोक्त विचाराचे व आचाराचे हे फळ होय, याची कारणमीमांसा शोधावी अथवा ' आलिया भोगासी असावे सादर ' या संतोपदेशाप्रमाणे मन स्थितीचा विचार करावा ? भक्तीभावनाप्रधान महाराष्ट्रीयास संताची वचने वंदनीय आहेत. अर्थात् किंकर्तव्यतेचा विचार करणे प्राप्त होते. आणि त्या दृष्टीने पाहूं जाता वरील शब्दात घावरण्यासारखे असें काय आहे हें निश्चित केल्याखेरीज त्यातून मुक्ततेचा मार्ग तरी कसा सुचणार ? ' **शिंदेशाही इतिहासाची साधनें** ' हे तीन शब्द सरळ व सोपे असून त्यांचा अर्थ ही फारसा कठिण नाही असें बहुतेकांस वाटत असेल तर सुखे वाटो पण तसा भास निदान मला तरी होत नाही असे स्पष्ट सांगावे लागते. पूर्वापार संबंधसंस्कारामुळें '**शिंदेशाही**' विषयी केवळ अभिमानच नव्हे तर भक्तीभाव असणे व त्या ममतेच्या [किंवा आत्मीयतेच्या] नात्याने शिंदेशाही **इतिहासाचे** स्वरूप प्रगट व्हावे अशी उत्कंठा असणेही साहजिक आहे व त्या सबधी जी '**साधने**' अनुकूल असतील तींही इष्ट आहेत यावद्दल वाद नाही पण तीं साधनें किती व कशा प्रकारची असतात हे पहाता आले आणि अनुकूल व प्रतिकूल साधनचिकित्सा इतिहासाच्या दृष्टीने शास्त्रोक्त करिता आली व ती शिंदेशाहीस साजेलशी झाली म्हणजे कार्यसिद्धि होण्यास अडचण राहत नाही या साधनसिद्धते विषयी मनात जसा विचार येऊं लागतो तसें या शिलेदाराचे घोडे पेंड खाऊं लागते आणि किंकर्तव्यतेचा पगडा बसून उद्विग्नता वाटूं लागते हा केवळ औपचारिक विनोद नव्हे पण खरी वस्तुस्थिति आहे. कारण ' शास्त्रज्ञ पंडित नाही मी लेखक ' किंबहुना या त्रयी पलीकडे जो एक प्रकार नैसर्गिक बुद्धीमत्ता परिपक्व होऊन प्रफुल्लित झालेला कधी कधीं निदर्शनास येतो त्या दुर्मिळ श्रेणीतही मला रिघाव नाही. इतकेंच नव्हे तर मला संस्कृत भाषेचा गंधही नाहीं. फार काय तर मराठी मातृभाषादेखील सरळ व शुद्ध बोलता किंवा लिहिता येत नाही. तसेच अनुवंशिक शिक्षणसंस्कारही सांगता येत नाहीं. मी केवळ एक मराठा शिंदेशाही '**शिलेदार**' आहे एवढा मात्र मला अभिमान आहे मग कोणत्या आधारावर मी ही लेखणी उचलली हे कोडे माझें मलाच उमजेनासें झाले आहे साक्षरतेस भुलून इतिहासाचे नादी लागून मनोरंजनार्थ म्हटले तरी असले धाडस करण्यात माझी दिशाभूल तर होत नाही ? शिलेदारी बाण्यामुळे लहानपणी वयोवृद्ध लोकाचे मुखाने जुन्या गोष्टी ऐकण्याचा प्रथम सुयोग आला. तदोत्तर शाळाप्रवेश झाला. तेव्हा इतिहासप्रसिद्ध घराण्यातील सोबत्याशी परिचय झाला. पुढे अभ्यास संपला हे ! शाळा सोडली. त्यानंतर सरकारी सेवेंत प्रविष्ट झालो तेथेही ऐतिहासिक माहितीची अत्यंत अवश्य-

कता भासली म्हणून तत्संबंधीं साहित्य वाचण्याचा क्रम ठेवणें भाग आलें. इतकेंच काय तें. याम गोडी म्हणता येईल काय ? आवड म्हटली तर शास्त्रीय रीतीनें अभ्यास तरी करावा कीं नाहीं ? पण तसाही काहीं प्रकार घडला नाहीं वाचनाचा नाद म्हणून इतर विषय न घेता ऐतिहासिक पुस्तकें मात्र चाळली असें फार तर म्हणता येईल आणि हेंच सत्यही आहे अशा परिस्थितींत आत्मविश्वास नव्हे पण फाजील अट्टहास धरून भ्रामक कल्पनेच्या जोरावर असलें जबाबदारीचें काम शिरावर घेतल्यानें इतिहासक्षेत्रात या 'शिलेदाराची ही शुद्ध भालेराई' आहे असा ग्रह सूज्ञ वाचकाचा झाला तर त्यात मुळींच नवल नाहीं माझी मनोदेवताच मला तशी साक्ष देते म्हणून मी शिष्ट सांप्रदायरूपी प्रस्थावनेस रामराम ठोकून ही भालेराई आरंभिली आहे उपयुक्ततेच्या दृष्टीने स्वयं धावा मारण्यापेक्षा या साधनाची लगाम एखाद्या चाणाक्ष चाबुकस्वाराच्या हातीं देऊन चंदीचाऱ्याचा पुरवठा केला असता तर लाभविशेष संभवनीय होता अशी स्नेहाची सूचनाही मिळाली पण ती या अडेल तट्टास रुचते थोडीच ? शिलेदारी सांप्रदायास ती समत नव्हती शिलेदार बहुधा आपलें घोडें आपणच खाजवून फेरून तयार करीत असे येथपर्यंत कीं स्वत श्रम करून घोडा तयार केला तरच तो स्वार म्हणविला जाई ही केवळ दंतकथा किंवा आख्यायिका नव्हे माझे चुलत बंधु तीर्थस्वरूप कैलासवासी **माधवराव फाळके** यानीं आमरणात चाबुकस्वाराचा घोडा शिवलाच नाहीं खोगीर, काठी सपाटी पाहिजे ती मिळो, तंग चौकडा असो वा नसो पण स्वारी केल्याखेरीज ते राहिले नाहींत ही शिलेदारी तऱ्हा झाली शिलेदारशिरोमणी **माधवराव महाराज शिंदे** आलीजाह बहादुर हे चाबुकस्वारावर मुळीच अवलंबून राहिले नाहींत हे सर्वश्रुत आहेच ती भली बहादुरी स्वत संपादन करिता आली नाहीं हें खरें, पण तो शौक प्रत्यक्ष डोळयानें पाहिल्यामुळे त्याचा पीळ मात्र गेला नाही चाबुकस्वाराचा प्रकार पहावा तर घोड्यात एखादी असली गोम ठेवून ठेतात कीं त्यासाठी त्याचे दारी फेरी करावी लागते प्रसंगवशात् खोगिरासहित घोड्यास सलाम करून त्याचे पाठीमागे तोबरा घेऊन फिरावें लागते. चाबुकस्वारी तरारीच्या या भरारीत पडून मंडलचक्र काटण्यापेक्षा सरळ दौडधूप करून घोडा व हतियार आपले हातीं ठेवण्याचा जो 'सततर' शिलेदारी सांप्रदाय आहे तो काय वाईट ? पैंजन, कलगी, हुमा मालादिनें नटवून छमछमची चाल दाखवून धुमाळ उडविता येणार नाही, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे पण कावा अटेरची ही कवायद सोडून सरळ कदम टाकून घोड्याची व मालकाची चाकरी करणें बरें इतकेंच नव्हे तर हा आपल्या स्वहिताचा परंपरागत धंदा सर्वस्वी सोईस्कर असून तो शिलेदारी धर्म आहे अर्थात् स्वयम् सिद्ध होऊन जी साधनें अनुकूल असतील तीं सज्ज करून ठेवणें भाग आहे यापलीकडे अन्य कर्तव्य नाहीं त्या 'कामगिरी' पुरताच 'हिसेब' द्यावयाचा आहे त्याची 'समजावीस' झाली म्हणजे घोडे गंगेस न्हालें एवढ्यासाठीं हा त्रीशब्दी चक्रव्यूह रचावा लागला ईशेच्छेनें हा व्यूह पार पडला तर पुढें दसरा दिपवाळीचे मुहूर्तानें साधनचिकित्सेच्या मोहिमेचा विचार करिता येईल आणि साधिलें तर त्याचें चर्चात्मक सारही देण्याचा यत्न करून पाहूं पण त्या दिशेस जावयाचा विचारच नाही, तर तूर्त वाट शोधण्याचें कर्तव्य तरी काय आहे ? संशोधन क्षेत्रातील वीर **खरे** व **राजवाडे** याचा साधनाबरोबर सारही देण्याचा सांप्रदाय होता तो अनेक दृष्टीने हितावह आहे असें मान्य करावें लागतें. पण कोठें ते रथी महारथी व कोठें या शिलेदाराची मर्यादित गती स्वप्नीही साम्य शक्य नाही ते कार्य सामर्थ्याच्या बाहेरचें होय त्यामुळें इतिहासभक्ताचा मनोभंग होऊन निरुत्साह होणार त्यास निरुपाय आहे कोणी लहानशी कामगिरी असती तरी या शिलेदारानें कदाचित् कमर बांधली असती पण साधनसामुग्री अफाट आहे ती प्रथम चाळून

पाहणें, तिचें प्रथक्करण करणें तथा कालानुसार विषयानुक्रम लावून तदोत्तर वाचन व मनन करुन सार काढावयाचें व तें प्रकाशित साधनाच्या तागडीत तोलून साधक बाधक विचारानें जिकडें पारडें झुकेल त्याचें विवेचन करून निष्कर्ष सांगावयाचा. अशा प्रकारें अवडंबर करावयाचे म्हणजे डमरूच वाजवावयाचा ! आणि मग साधन प्रकाशनाची निदान या जन्मीं तरी आशा धरावयास नको खरे व राजवाडे या धुरधरानीं आजन्म यज्ञ करून जी कार्यसिद्धी केली तिचेच स्वरूप पाहिलें म्हणजे मन दंग होतें तेव्हा पुढील अवसान कळतच आहे नवें साधनाशिंगर्द संभाळून या रणक्षेत्रात उतरुन धुमवडाक्याच्या भडीमारात शिरून तलवार बहादुरी करणें कठिण आहे उच्छृंकळपणाला वळी पडून गाठचे घोडे व पदरचा गाशिया गमवून घोंगडी पांघरून घरची वाट धरण्यापेक्षा नवशिक्या स्वाराप्रमाणें रणातील पटाईतास शक्तीनुसार साधन साहित्याची कही पोचविण्याची कामगिरी भली त्यात काय कंकण मोडून बट्टा येतो ? जें जाडे भरडे शिलेदारी घोडें स्वराज्य व साम्राज्यरुपी रथाचे कामीं पडलें त्याला आता एवढं ओझें वाहता येऊं नये काय ? 'हरोल' न साधली म्हणून धैर्य सोडून 'करोल' देखील सोडावी की काय ? असे नाना प्रकारचे रंगतरग मनात घोळत होते कार्यक्षेत्रविस्तारभयाधकारात क्षणभर 'सुधबुध' गेली. निराशेला वशीभूत होऊन हा शिलेदार गनिमी कावा काढूं पहात होता तो अकस्मात् जन्माचें दोन सागाती, दोघाची संसर्गिक अधिकार वाणी, पहिला सहाध्यायी तर दुसरा समध्येयी, पाठीवर येऊन उभे राहिले एक देशमुख तर दुसरा 'देशाधिकारी' उभयतांनीं एकमुखे होऊन [स्नेहवादे] समाचार घेतला शिलेदारी धर्माचें स्मरण देविलें क्षेत्र सोडून जाण्याचें क्षात्रवृत्तित्यागाचा निषेध केला 'सारे चाकरीवर गेले टाळा देवून जावें !! त्या परिस मरण काय वाईट ' असा स्पष्ट संकेतच नव्हे तर निर्वाणीची आज्ञा आहे असें साधार सिद्ध करून दाखविलें अर्थात् सुळीची पोळी असली तरी ती भाल्याच्या नोकावर ठेवण्याविषयी कर्णी फुंकून या शिलेदाराला 'हरहर महादेव ' करावयास लाविलें ही गर्जना करण्यापूर्वी कार्याची रूपरेषा निश्चित करावी लागली तिचा आराखडा उभयता समोर सादर करिता क्षणींच त्यानीं मोठ्या संतोषोत्साहानें तो सर्वस्वी मान्य केला आणि कामास आरंभ झाला

## कोटा संग्रहाशीं परिचय.

• शिंदेशाहीशी एका काळी संबध ठेवणारीं जी महाराष्ट्रीय घराणीं इकडें तिकडे विखुरलेलीं आहेत त्यांपैकी कोटेकर हे एक होय त्याचे जवळ जुने कागदपत्र आहेत अशी माहिती बऱ्याच वर्षापासून होती, परतु अनेक कारणामुळे ते कागदपत्र पाहावयाची संधी आली नाहीं, किंवा कोटेकराशी प्रत्यक्ष परिचय घडला नाही. सन १९२६ चे सुमारास सुदैवानें किंवा दुर्दैवानें असो अकस्मात् सरकारी कामगिरी संपून छावणीस मुकामास आलो असता उद्योगात काल्क्षेप होईल की नाहीं याबद्दल मोठी विवंचना मला व माझ्या इष्टमित्रास पडली. अर्थात् फावल्या वेळी स्थानिक ऐतिहासिक घराण्यासंबंधीं कागदोपत्री माहिती मिळविण्याचा उद्योग आरभिला या व्यवसायात जी कांहीं साधनें पाहावयास मिळाली त्यावरून शिंदेशाहीची ही अल्प पण हल्ली उपलब्ध असणारी [सर्वोपलब्ध] साधनें प्रसिद्ध करण्याची इच्छा बलवत्तर होऊं लागली. त्याची जुळवाजुळव करण्याचे संधीस बळवंतराव रामचंद्र रेगे [ दौंडकर ] याचा घनिष्ट संबंध आला व त्याचा कोटेकराशी काहीं शरीरसंबध आहे असें कळलें. त्यानी मित्रत्वामुळें पत्रव्यवहार करून कोट्यापावेतो स्वत घेऊन जाऊन कोटेकर वकील गुलगुले याच्याशी परिचय करविला त्यावेळीं साधारणत तेथील साधनसंग्रह पाहण्यात आला. सरदार गुलगुले यानीं सर्व संग्रह माझ्या हवाली करून तो प्रकाशित करण्याची मोठ्या आनंदाने संमति दिली तेथून या कार्याचा प्रारंभ समजला पाहिजे.

## गुळगुळे संग्रहाची माहिती.

एकंदर संग्रह पाहता असें दिसून आलें की, जे काही कागदपत्र तूर्त आहेत ते धूळ, धुरवडा, वाळवी आणि ओलावा इत्यादि साधनशत्रूपासून वाचवून काळजीपुरस्सर त्यांनी जपून ठेविले आहेत कालचक्राच्या वाहत्या ओघात निसर्गतः त्यावर जे काही परिणाम घडले आहेत त्यास तर कोणाचा उपाय नव्हता पण ते जपण्यात मानवी प्रयत्नात काहीं कमतरता राहिलेली दिसत नाहीं अर्थात या घराण्यास कागदाची महती पूर्णपणें होती असे स्वयम् सिद्ध आहे. अशी तपील सुधारलेल्या पद्धतीनें हे कागद काल विषयानुरूप लाविले होते असें जरी म्हणता न आलें तरी वरीच ठळक ठळक पत्रें व्यक्तिश एकत्रित केलेली असून त्याची जुळवणी **सरदार पुरुषोत्तमराव गुळगुळे** यानीं स्वयम् केली होती कोठ्यासारख्या दूर व परस्थ ठिकाणी वास करणाऱ्या महाराष्ट्रीय सजिवाचे शरीरसवय घडण्याची जेथें भ्राति तेथें या निर्जिव ' चिटोऱ्याना ' नवीन पद्धतीचा सत्कार घडण्याची आशा करणें व्यर्थ आहे आशा स्थितीत जें द्दश्य दिसतें त्यावद्दल गुळगुळ्याचा गौरवच केला पाहिजे मोडी वाचणारे कोट्यात मिळणें अशक्य होतें या मुळें ग्वाल्हेरीहून कारकून व टायपिस्ट पाठविण्याची योजना करावी लागली. वाड्या समीप कोठेतरी या मडळीसाठी जागेची सोय करण्याची विनंति केली असता निराळी राहुटी न दाखविता सरदार गुळगुळ्यानीं त्यास आपल्या गोठात आश्रय देऊन न कळत पाहुणचाराची व्यवस्था केली वेळोवेळी कामाच्या तपासणीसाठी व छाटणीसाठीं या शिलेदारास जावें लागलें तेव्हा इतर जागी मुकाम न करू देता वकील **साहेबांनीं** आपल्या नवृत आश्रय देऊन आपले भडारातून रसद पोहोंचवून पावती घेतली. त्याच्या या जुन्या पण स्वराज्य साम्प्रदायरुपी औदार्याग्रहापुढे शिलेदारासदेखील हात टेकावे लागून रोजमुरा स्वीकारावा लागला अस्तु एकदर कागद पाहून त्याचें प्रथ करण करुन वर्गीकरण करण्याची व्यवस्था लावून नकल करण्यास आरभ झाला.

हा सर्व संग्रह शिंदेशाही संबंधीच आहे असें म्हटलें असता वस्तुविपर्यास होणार नाहीं श्रीमंत **पेशवे, पवार, होळकर** आणि **गायकवाड** व त्याच्याशीं सबंध ठेवणाऱ्या काही निवडक व्यक्ती **यांची तुरळक व मोटक पत्रे वगळली असतां हा सबंध पत्रव्यवहार शिंदेशाहीचाच आहे** असें ओघानेंच दृष्टोत्पत्तीस येईल या सवधी तूर्त इत्यंभूत परिचय देण्याचें प्रयोजन नाहीं. तथापि सक्षेपाने इतकें सागणें पुरे होईल कीं, प्रमाणानें स्वयं शिंद्याचाच शिक्केमोहरी पत्रव्यवहार फार आहे. त्याचे बरोबरीनें किंबहुना किंचित कमी तत्कालीन इतर पुरुषाच्या पत्राचे प्रमाण आहे आणि या कागदो-पत्रींच तत्कालीन राजकीय स्थित्यंतराचे स्पष्ट, साग्र व सुसगत स्वरूप पहावयास मिळतें सरकारी पत्र व्यवहार बहुधा ' आज्ञापत्राचे ' रूपाने असल्यामुळें त्यात पाल्हाळ नसून संक्षेपानें आशय प्रगटीकरण झालें असलें तर त्यात फारसें नवल नाहीं, अस्तु या सग्रहातील सर्व **पत्रांची संख्या** सुमारे **साडे दहा हजार** होईल. त्यापैकीं एक तृतीयाश पत्रे ठोकळ मानानें किरकोळ असून बाकी सर्व पत्रें उपयोगी आहेत शुद्ध शोधकदृष्टीने व नूतन माहिती या मानानें ही संख्या कदाचित न्यूनाधिक ठरविता येईल पण ' **शिंदेशाहीची स्वतंत्र साधनें** ' हा दृष्टिकोन ठेविला असता त्यात फारसा फेर करिता येईल असें वाटत नाही। आणि या दृष्टीनेंच तूर्त याची चाळणी करुन ही पत्रें प्रकाशित करण्याचा विचार आहे. शिंदेशाहीत वास करणाऱ्या मजसारख्या व्यक्तीने ह्या सग्रहाच्या योग्यायोग्यतेविषयीं उद्गार काढावयाचे म्हणजे पर्यायें पक्षाभिमानच व्यक्त केल्यासारखेहोईल अशी भीति वाटते म्हणून एका प्रसिद्ध इतिहासकाराच्या मताचें सार देणेंच सोईचे होईल.

## [ गोविंद सखाराम सरदेसायाचा अभिप्राय ].

'The ancestors of this Saraswat Brahmin family, sirnamed Gulgule, came from Achare in the South Konkan and were placed by the Peishwa, at Kotah as Revenue Collectors, under the orders of Scindia. The carefully preserved historical papers in this family contain some 25 bundles The total number of letters will come to about 6000. [ * *This was apparently I believe a cursory estimate open to correction* ] Even if a scrupulous selection were made more than half will deserve being printed fully.

This is so far as mere quantity goes. But the quality of the whole Record is even far superior to its quantity. For while we have plentiful materials bearing on the administrative and other measures of the Peshwas at Poona and the South, we find practically very little bearing on their North Indian Affairs. Such points, for instance, as, how the Marathas expanded into Rajputana, what sort of relations they kept with the Rajput Princes, what difficulties they encountered and how they overcame them all. All this was the work of one great personality Mahadji Scindia whose life work from 1761 to his death in 1794, is fully exemplified in the copious letters sent from his Camps.

There occured something like a biforcation in the Maratha fortune in 1772. The keen rivalry, for Power raged between Nana Phadnavis and Mahadji Scindia, forms one of the most instructive episodes of the declining period of the Maratha Power and was uptil now more or less inexplicable, as the student of History had before him only one side of the question profusely represented in the Patwardhan and the other Records which have so far been published The other side, namely that of Mahadji Scindia, was conspicuous by its absence. That is to say while so far we had only the letters of Phadnavis and his partisans, accusing Mahadji and his ways, we had very little that gave the version of Mahadji Scindia. This want can now be amply supplied by the publication of this Kotah Records.

The letters written by Jaganath Vishwanath from Poona, during the 4 eventful years 1791 to 1794, are indeed more than their weight

* या उताऱ्यांत वाकडे अक्षरानें [ *Italics* ] जो मजकूर जागोजागीं कंसात दाखविला आहे तो या बिकेदारानें पदरचा घाटविला आहे.

in gold, as they lucidly set forth the points of difference between Nana and Mahadji and give graphic account of day to day occurances and conferences at Poona, in those momentous years of Maratha fortune

An account of Maratha politics in the North with Mahadji Scindia's side fully represented can now be created out of this Kotah Dufter, which must be ranked as valuable as the Miraj Dufter printed by Khare For the first time the student of Maratha History will be supplied with an authentic material for estimating the character of Mahadji Scindia and his achievements by means of this Kotah Dufter supplemented by the 4 volumes already printed by [ *Dattatraya Balwant* ] Parasnis To the Royal House of Scindias this new find will indeed bring credit and glory. The student of Maratha History will now have all his curiosity amply rewarded.

There is another special value for this Dufter. The Records of the several Deccani families so far printed by [ *Khare* ] Rajwade and others, are more or less scrappy and do not in themselves give a complete version of any historical developement This Kotah Dufter, however, is complete and intact, [ *not* ] right from the beginning of the Maratha entry into the North [ *but from 174?* ] to its ultimate settlement under the British supremacy in the first quarter of the 19th century. Hence we find in it ample material for estimating the various stages of Maratha expansion into the North, its policy and methods, its financial facilities and burdens, difficulties and encounters and the kind of relations existing between the Marathas and the Rajput [ *Princes.* ] Kotah was long the pivot round which the Maratha Policy in Rajputana centred during [ *and previous to* ] the regimes of Mahadji and Daulat Rao Scindia.

The Dufter contains full personal handwritings of [ *not* ] all [ *but certainly many* ] members of the Scindia family and the various generals, officers [ *and other notabilities of the day* [ Thus this Northern find is as rich in men and matters of the North as the Deccani Papers [ already printed ] are of the South. Fresh incidents [ *facts* ] and personalities hitherto unknown are profusely brought into light, thereby enriching the Maratha History to a great extent. Not only were the Scindias [*a lot of*] strong fighters, clever writers and able administrators but it is surprising to learn in these papers that

they were scholars [of Sanskrit also and were] fond of reading old works. Mahadji Scindia's acrimonious discussions with Nana Phadnavis and the details of his last illness are found graphically described, Horses, regiments, guns and their manufacture, items of Maratha social life in those days, banking rates of interests and commodities, exchange of various manufactures, fruits, scents, ornaments, old Sanskrit works and writings, paintings and idols, medicines and arms, all these have frequent mention in this correspondence. We also get precious glimpses of Mahadji Scindia's character and his conduct towards his subordinates We find all his follower and help-mates thriving under his patronising care and serving their master all their life with rare loyalty and devotion. In short the Maratha History of the Post-Panipat period had so long to depend entirely on the accounts presented by the Southern records, but hereafter we can have a rival Record in this Kotah find perhaps even more important in a historical sense.'

हा गोविंद सखाराम सरदेसायाचा अभिप्राय व पुढें येणारी प्रत्यक्ष प्रमाणें याचा तुलनात्मक दृष्टीने विचार करिता या साधनाची खरी योग्यता आपोआप उघडकीस येणार आहे, अर्थात् त्या संबंधी पृच्छा करण्याचे प्रयोजन नसलें तरी एवढी गोष्ट सागणे अगत्याचें आहे की शिंदेशाहीसंबंधी प्रमाणाभावी ज्या काही कल्पना साप्रत प्रचलित आहेत त्यावर नवीन प्रकाश पडून शिंदेशाही इतिहासाचा जो दीप मंद, अस्पष्ट व अधुक दिसत आहे तो जास्त प्रदिप्त झाल्यासिवाय खचित राहणार नाहीं, किंबहुना शिंदेशाही इतिहासाच्या ह्या स्वरूपापेक्षा मराठी सत्तेची जी अधकारमय अनास्था पाहावयास मिळते तिचा लोप होऊन तिचें मूळ, खरें आणि उज्वल मूर्तिमंत चित्रच या प्रयत्नानें पाहावयास मिळून महाराष्ट्र इतिहासात अमर्यादपणें सावळा गोंधळ माजविणाऱ्या परकीय इतिहासकाराच्या पायात कोलदाडा पडेल असें वाटते

## गुळगुले संग्रहाचें एक व्यंगविशेष

या संग्रहात जर काहीं सांगावया सारखे व्यंग असेल तर तें एवढेंच कीं गुळगुल्याचा वकील या नात्यानें जो पत्रव्यवहार शिंदेदरबारशी झाला तो मात्र या संग्रहांत मुळीच उपलब्ध नाहीं. जीं सरकारी पत्रें प्रसंगानुसार गुळगुले याना आली त्याचाच यात केवळ भरणा आहे ही अशी स्थिति का असावी, वकीली वारनिशा कोठें गेल्या इत्यादि प्रश्न साहजिकच मनश्चक्षूपुढे उभे राहातात १८५७ चे बंडांत गुळगुले यांजवर भयंकर गंडातर आल्याची दंतकथा आहे. या अनर्थात त्याच्या घराच्या एका भागाचा गोळ्यानें विध्वंश झाला. घरात बंडखोर शिरून त्यानी लूट केली गुळगुले मोठ्या शिकस्तीनें प्राण घेऊन बाहेर पडले. त्याच्या पश्चात् काय गोंधळ माजला असेल तो ईश्वरास ठाऊक. या प्रळयातच वारनिशा बहुधा 'अग्नेये स्वाह' झाल्या असाव्यात. सरकारी पत्रव्यवहार वारनिशापासून निराळ्या जागीं असल्यानेंच सुरक्षित राहिला असें वाटतें. सरकारी पत्रापैकी जी पत्रें या वकीली पत्रात सर मिसळ झालीं तीं अर्थातच सापडत नाहींत. हा वकिली पत्रव्यवहार काळाच्या उदरात गडप झाल्यानें ऐतिहासिक दृष्ट्या मोठीच हानि झाली यात संशय नाहीं. सरकारी पत्रव्यवहारामुळें शिंदेशाहीच्या

अंतर्बाह्य परिस्थितीची जशी नीट कल्पना होते तशी ती कोटे व त्या लगतची इतर राज्यें यांच्या संबंधानें करण्याचें साधन हीं पत्रें कोणीही आजपर्यंत पाहिलें नाहीं. अर्थात संस्थानिक राजकीय वातावरणाचे सर्व ऐतिहासिक प्रसंग बारकाईनें गेले व त्या अनुरोधानें त्यांना सरकारी पत्रव्यवहाराशीं अन्योन्य संबंध जोडून इत्यादि गोष्टींना ज्या निरनिराळ्या ठळक रीतीनें उजेडांत यावयास पाहिजे तितका तो उमटण्यास आला नाहीं. सरकारी पत्रव्यवहारावर जेवढी तत्कालीन राजकीय बाजू जमेस धरली गेली आहे त्यावरून निराळा तर्क होईल नेमका न कळे. तथापि जीं काहीं पत्रें वांचलीं तीं सुरक्षित व व्यवस्थित ठेविल्यामुळें शिंदेशाही इतिहासच जपून ठेविल्याचें श्रेय सर्वस्वी या कोटेकर वकील घराण्याला आहे. या त्यांच्या कामगिरीबद्दल शिंदेशाही त्यांची सदैव ऋणीच राहील यांत मुळींच संशय नाहीं.

सर्व जुनें कागदपत्र पाहून ते वर्षवार कालानुक्रमानें लावणें, त्यांचें नीट वाचन व मनन करून त्यांना तत्कालीन इतर उपलब्ध साहित्याशीं ताडून पाहणें इत्यादि अनेक संस्कार करावे लागतात. या वरून हें प्रकाशन कार्य अल्पावधींत होणें शक्य नाहीं. तरी सावकाश त्याची फाळणी करणें प्राप्त आहे व हें काम सरकारच्या अनुमतीच्या यत्नास अनुकूलता आल्यामुळें व काहीं प्रकाशित साधनें दुर्मिळ असल्यामुळें शिलकी थोडें लवकर लागून ही मर्यादा आणखी वाढण्याचा संभव आहे.

### प्रथम भागासंबंधीं दोन शब्द.

या संग्रहांत पानिपतोत्तर पत्रव्यवहाराचें प्रमाण जास्त असल्यामुळें कालक्रमानुसार पूर्व-पानिपतीय पत्र प्रकाशनाचें काम प्रथम हातीं घेतलें आहे. याची एकंदर संख्या ७०० असून त्यांपैकीं ५०० पत्रें उपयुक्त आहेत. हीं कदाचित् एकाच स्वतंत्र भागांत देतां आलीं असतीं परंतु ठरविलेल्या रूपरेषेनुसार तीं अनेक भागांतून प्रकाशित होणें इष्ट वाटलें. त्यांपैकीं हा पहिला भाग इतिहासभक्तास सादर करीत आहे.

या भागांतील पत्रांना क्रमांक लावण्याचे कामीं फारशी अडचण पडली नाहीं. कारण सरकारी पत्रांत बहुधा हिजरी सन दिलेला आहे. जी मुख्य अडचण भासली व भासत आहे ती ही की पूर्व-पानिपतीय ऐतिहासिक जीं साधनें खरे, पारसनीस, राजवाडे, इत्यादि नामांकित इतिहासकाराकडून व विविधज्ञानविस्तार, काव्येतिहाससंग्रह व भारतवर्ष मासिकांतून प्रसिद्ध झालीं तीं वाचावयास तर काय पण पहावयासदेखील मिळालीं नाहींत. त्यामुळें या नवीन पत्रांसंबंधीं विचार करून व तारतम्य पाहून सार काढण्यास मुळींच मदत झाली नाहीं. अर्थात् काहीं जागीं दुर्लक्षाचा किंवा पक्षपाताचा दोष अंगीं येईल तर त्यास माझा निरुपाय आहे. तीं साधनें प्रत्यक्ष पाहावयास मिळाल्यानंतर विधानांतर करावेसें वाटल्यास तसें करण्यास मला मुळींच संकोच वाटणार नाहीं. आणि याचसाठी मी तूर्त या भागाचें चर्चात्मक सार देण्याच्या भानगडींत पडलों नाहीं ही गोष्ट वाचकांनी लक्षांत असूं द्यावी. तसेंच मुक्कामाची पूर्ण यादी देखील तयार करितां आली नाहीं.

मूळ पत्राची भाषा व्याकरणदृष्ट्या शुद्ध करण्याचा परिपाठ आहे पण तो मी स्वीकारिला नाहीं. मूळ पत्राची हुबेहूब नक्कल देणेंच मला विशेष सयुक्तिक वाटलें व त्यांत पदरचा अनुस्वार देखील हवा असतां दिला नाहीं. तो अवश्यकतेनुसार निराळ्या कंसात दाखविला आहे. मोडींत 'इ' [ऱ्हस्व] व 'ई' [दीर्घ] एकच असल्यानें त्यांत व्याकरणाप्रमाणें ऱ्हस्व दीर्घाचा विचार मात्र अवश्य केला आहे. व हाच क्रम 'उकारा' बद्दलही ठेविला आहे. या पलीकडे असल पत्राच्या भाषेंत काहींच ढवळाढवळ केली नाहीं. वाचकाच्या सोयीसाठीं असल पत्रांत अक्षराचें वळण जेथें जेथें बदललेलें दिसलें तेथें तेथें निरनिराळी चिन्हें दिलीं असून त्यांची स्वतंत्र सूचीही पण दिली आहे.

या पहिल्या भागांत एकंदर २९९ पत्रें असून त्यापैकी ६ पत्रें निरनिराळ्या ठिकाणाहून मिळविलीं आहेत. [लेखाक १, ६२, १०७, १३९ अ, १३९ इ, १५६,] एवढी पत्रे सोडून बाकीचा सर्व पत्रसंग्रह 'गुलगुले दफ्तरचा' असून तो शिंदे राजघराण्याचा सन १७३३ ते १७६७ पर्यंतचा पत्रव्यवहार आहे. यातून **महादजी शिंदे यांची पत्रे मात्र वगळलीं आहेत.** त्याचा पत्रव्यवहार फार असल्यामुळे तो अनेक भागात प्रसिद्ध करणेच प्राप्त आहे

**राणोजी शिंदे** याची आजपर्यंत् केवळ ३ पत्रे पहावयास मिळत होतीं [ब्रम्हेंद्र लेखाक १७७, १७८ व इतिसंग्रह पुस्तक २ अक ९ ऐटि ३५] ती आज ३९ पत्रे 'सग्रहात' जास्त उपलब्ध झाली आहेत त्यापैकी ३४ पत्रे जी उपयुक्त वाटली ती येथे दिली आहेत. [लेखाक १ ते ३३] यासिवाय आणखी २ पत्रें पाहावयास मिळतात [Selection Records. Baghi page 15] अशीं ३९ पत्रें राणोजी शिंद्याची प्रस्तुत पाहावयास सापडतात

राणोजी शिंदे यास लिहिता वाचता येत होते किंवा नाही याविषयी गुलगुले संग्रहातील पत्रावरून ठाम मत निदान मला तरी निश्चित करिता आले नाही त्याच्या पत्रातील अक्षरांचें वळण बहुधा एक घाटी असून 'बहुत काय लिहिणे हे विनती' चे वळण दोन प्रकारचे आहे त्यापैकी एक तर **रामचंद्र मल्हार सुखठणकराचे** हस्ताक्षराशी जुळते पण दुसरे कोणाचे हे काही निश्चित सागवत नाही अक्षर इतके वळणदार आहे की ते राणोजीचें ठरविण्यास जरा सकोच वाटतो यामुळें राणोजीच्या साक्षरतेविषयी प्रश्न सुटत नाही. [आणि हीच अडचण जयाजी शिंद्यासबंधी भासते लेखाक १३९ ई टीप १६३] तथापि **रानवडे**विरचित बखर व 'मुतालकी अधिकारप्राप्ती' च्या दृष्टीनें पाहता ते निरक्षर असतील असे वाटत नाही पण या विधानास तूर्त प्रत्यक्ष प्रमाण उपस्थित नाही एवढे खरें.

**जयाजी आपा शिंदे** याची १२४ पत्रे 'सग्रहात' सापडली त्यापैकी या भागात १०८ पत्रें दिली आहेत [लेखाक ३४ ते १३९] राजवाड्याने ७ असल पत्रे छापलेली आहेत [खड १ लेखाक १, ३०, ३२, ३७, ४३, ४५, ४९] ती मिळविली असता ११५ पत्रें उपलब्ध होतात यापेक्षा अधिक पत्रें जयाजीची मिळावयास पाहिजेत मला काही प्रत्यक्ष पहावयासदेखील मिळाली पण ऐतिहासिक दृष्ट्या तीं फारशी महत्वाची नसल्यामुळें येथें देण्याची अवश्यकता वाटली नाही

**जनकोजी शिंदे** याची १५८ पत्रें 'संग्रहात' जी मिळालीं त्यापैकी ११३ पत्रे येथे दिली आहेत [लेखाक १४० ते २५३] एक पत्र जे इतर जागीं मिळालें तेही दिले आहे [लेखाक १५६] अशा प्रकारे पत्राची संख्या ११४ होते याखेरीज राजवाडे याने ५ पत्रे प्रकाशित केलीं आहेत [खंड १ लेखाक ५५, ६१, ७४, १३७, १८३.] 'बायजाबाई शिंदे याचे चरित्रात' पारसनिसाने १ पत्र दिलें आहे [पान ८] अशी १२० पत्रें जनकोजी शिंद्याचीं मिळतात शोधाती ही संख्या आणखीही वाढण्याचा संभव आहे

जनकोजी शिंद्याची 'पानिपतोत्तर पत्रें' सुद्धा यातच समाविष्ट केलेली आहेत. वास्तविक ही [३१] पत्रें त्याचे नावावर घालता येत नाहींत [लेखाक २२३ ते २५३] तीं महादजी, केदारजी इत्यादिकाची समजली पाहिजेत

**दत्ताजी पाटील शिंदे** यांची ८ पत्रे या भागात आली आहेत [लेखाक २५४ ते २६१] या व्यतिरिक्त राजवाडे याने १ पत्र प्रसिद्ध केलें आहे [खड १ लेखाक ७३] एकुण दत्ताजीची ९ असल

पत्रें पाहावयाला मिळनात जनकोजीच्या वाळपणीं ज्या दत्ताजी शिंद्यानीं सतत ४ वर्षे शिंदे शाहीची सूत्रें चालविली त्याचीं केवळ ९ पत्रेच मिळावीत हे मोठें आश्चर्य आहे अस्तु पुढे मागे त्याचीं यापेक्षा अधिक पत्रें सापडतील अशी आशा वाटते

**मातोश्री निंबावाई शिंदे** यांचें केवळ १ पत्रच का होईना पण तें प्रथम पहावयास मिळतें. [ लेखाक २६८ ]

**साबाजी शिंदे** याचीं ४ [ लेखाक २६२ ते २६५ ] व **खानाजी जाधव** सेनापति याचीं ६ [ लेखाक २६६ ते २७२ ] अशी १० पत्रें प्रत्यक्ष पाहावयाचा योग प्रथम या भागात आला आहे

**केदारजी शिंदे** याचीं ३४ पत्रें सग्रहात असून त्यापैकीं २२ येथें घेतलीं आहेत. [ लेखाक २७३ ते २९६ ] राजवाडे यानें १३ पत्रें दिलीं आहेत [ खड १३ पत्राक १, ४, ३२, ३३, ३६, ३७. ३८ ४९, ५०, ५१, ५२, ५३, ५४ ] तीं जमेस धरिता ३५ पत्रें उपलब्ध आहेत

**खलोजी शिंदे** याचीं २ पत्रें प्रथम पहावयास सापडतात [ लेखाक २८२, २८३ ]

अशा प्रकारें राणोजीपासून केदारजीपावेतो शिंदेराजघराण्यातील ३३१ असल पत्रें सध्या उपलब्ध आहेत पहिल्यापेक्षा ही सख्या जरी वाढलेली दिसत असली तरी तीं फार अल्प आहे असेंच म्हणावें लागतें कारण यापेक्षा किती तरी पटीनें ती जास्त असावयास पाहिजे इतिहासाचार्य राजवाडे याच्या भाकिताप्रमाणें कोटेकर वकिलाचे हे कौतुक तर पाहावयास मिळाले पण बूंदी, जयपुर, जोधपुर, उदेपुर इत्यादि उत्तरहिंदुस्थानचे राजेरजवाडे याजकडील अन्य वकिली पत्रव्यवहार अद्याप अज्ञात व अनुपलब्धच आहे तसेंच श्रीमंत गायकवाड, पवार [ भोसले ] व होळकर या मराठेशाहीच्या अवशेष भागीदाराचा पत्रव्यवहार बाहेर आलाच नाही या खेरीज पेशवाईचा जो प्रचंड पत्रसग्रह आहे त्याचा परिस्फोट अद्याप व्हावयाचा आहे

शिंदे व होळकर याचीं काहीं समायिक पत्रें मिळतात ती फार थोडी असून वरील मोजणीत आली नाहीत तथापि ती पुढील भागात होळकराचे पत्रव्यवहारात पहावयास सापडतील

या पहिल्या [ व पुढे येणाऱ्या दोन पूर्वपानिपतीय ] भागासंबधी जर काही सागावयाचें असेल तर ते इतकेच की ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकराचे चरित्रात जो पत्रव्यवहार पारसनीस याने दिला आहे तो थोरले बाजीराव पेशवे याचे निधनोत्तर एक दोन वर्षाचें वर्णन देऊन सपतो आणि राजवाड्याच्या पहिल्या खडाचा आरभ १७५१ पासून होतो अशा प्रकारें जी उणीव आजवर पडत होती ती सर्वस्वी तर म्हणता येणार नाहीं पण काहीं अशी तरी भरून निघत आहे अर्थात् १७४२ ते १७५० या आठ नऊ वर्षांचा वृत्तात पहावयास मिळतो तसेंच पहिल्या खंडात जी माहिती राजवाडे याने दिली आहे त्यात ही भर ज्यास्त उसळणार आहे त्याला 'चंद्रचूड कले' चा ज्या दिवशी सयोग होईल तो सुदिन समजला पाहिजे ठोकळ मानानें बोलावयाचे म्हणजे मराठ्याच्या उत्तरहिंदुस्थानविषयक हालचाली, घडामोडी तथा राजेरजवाडे याच्याशी घडलेले व्यवहार इत्यादिकाचे अर्तबाह्य स्वरूपाचा शोध लागून अनिश्चित मुद्याचे समाधानकारक रीतीने स्पष्टीकरण होत असून खरे रहस्य कळते ती विवक्षित स्थलें व योग ही क्रमश प्रसगानुसार टीपेंत जरी दर्शविली असली तरी त्याचे सुसघटित सार देता आले नाही म्हणून त्याची खरी बहार पाहावयास मिळत नाही.

राणोजी, जयाजी, जनकोजी, जोतिबा, दत्ताजी, तुकोजी, केदारजी व खलोजी शिंदे याचीं चित्रें उपलब्ध न झाल्यामुळें तीं अर्थातच देणें शक्य झालें नाही. वरील पुरुषाचीं चित्रें आज मिळत नसली तरी

तीं पुढें सांपडण्याची मला आशा वाटते कारण राणोजीचे समकालिन **बाजीराव पेशवे, मल्हारजी होळकर, पिलाजी जाधव** इत्यादि अनेक इतिहासप्रसिद्ध पुरुषांची चित्रें उपलब्ध असतां वरील **शिंदेघराण्यांतील पुरुषांचीच तेवढी चित्रे तयार झाली नसतील असें अनुमान करवत नाही.** शिंदेशाही छत्राखालीं वास करणारे चित्रकार त्यावेळी विद्यमान असून त्यांनीं तत्कालीन शूरवीराची काढलेली चित्रे आज चित्रकारांच्या नावासह पाहावयास मिळतात. यदाकदाचित् शोधांती ही चित्रें नच मिळालीं आणि सर्वस्वी निराशा झाली तर वरील पुरुषाचे रूपाकारविशेष माहीत होण्याची अन्य साधनें अनुकूल आहेत किंवा नाहींत याचा छडा लावून जे सार निघालें त्याचें दिग्दर्शन करावयाचा विचार होता पण काही काम अपुरें राहिल्यानुळें तो विचार पुढील भागावर ढकलणेंच प्राप्त झालें.

एक रंगीत चित्र मात्र गुलगुले संग्रहात सापडलें खरें पण तें कोणाचे आहे याबद्दल अद्याप निश्चय झाला नाही ते बहुधा जयाजी, दत्ताजी किंवा तुकोजी ह्यापैकी कोणाचें तरी असावे असें वाटते. या संबंधी ठाम निर्णय झाल्यावर त्याचे स्पष्टीकरण ओघानेच पुढें होऊन इतिहासभक्तांची जिज्ञासा तृप्त होईल.

आलीजाह बहादुर **महादजी शिंदे** यांनी तर काही चित्रकार आपल्या पदरींच ठेविले होते. [ ती घराणी आजही विद्यमान असून ] त्याच्यामुळेच महादजी शिंद्यांची बरीच चित्रें जागोजागीं पहावयास मिळतात अस्तु त्यांचे एक नवीन दरबारी चित्र जें ' संग्रहात ' उपलब्ध झाले तें या भागाच्या मुखपृष्ठावर दिले आहे.

कोटेकरांचे ' संग्रही ' रंगीत चित्रांचा बराच साठा आहे त्यात पशु, पक्षी, सुंदर स्त्रिया, रमणीय देखावे, रागरागिणी तथा पौराणिक व ऐतिहासिक विभूती, नामांकित राजे, सेनापती, सरदार व शूरवीरांचा भरणा विशेष असून मराठ्यांची चित्रे फारच कमी आहेत. अस्तु जीं आहेत ती सवडीप्रमाणें व सोईप्रमाणें निरनिराळ्या भागात देण्याचा विचार आहे. स्वयम् गुलगुले घराण्यातील पुरुषांची चित्रेंही मिळतात. **कोटा येथील पहिले वकील बाळाजी यशवंत गुलगुले** यांचे चित्रासंबंधी अद्याप निर्णय झाला नसल्यामुळे तें देता आले नाहीं त्यांचे पुत्र **लालाजी बल्लाळ गुलगुले** यांचे रंगीत चित्र मात्र दिलें आहे या व्यतिरिक्त पहिल्या भागात आलेल्या शिंदे राजघराण्यातील व्यक्तींच्या छत्र्यांचीं छायाचित्रें दिली आहेत.

असल व प्रमाणशीर पुराव्याची सर्वतोपरी वाण असल्यामुळे स्वदेशीय इतिहासकारांस बराच काळ परदेशीय इतिहासकाराच्या ओंजळीनें पाणी प्यावें लागले तर त्यांत त्यांचा मोठासा दोष आहे असें नाही. जुन्या बखरी व दंतकथा यांच्या आधारावर आपला दृष्टीकोन स्थिर ठेवून महाराष्ट्रीय इतिहासाचा सत्य भाग जितका प्रकाशांत आणतां येईल तितका आणण्यास त्यांनीं शक्य तो प्रयत्न केला आहे यात संशय नाही. परंतु खरी पत्रबद्ध हकीकत उघडकीस येण्याभावी सत्य इतिहासरचना करण्याचे कामी त्यांची असमर्थताच राहिली.

ही जाणीव लक्षात घेऊनच **विविधज्ञानविस्तारकार, काव्येइतिहासकार, ग्रंथमालाकार, खरे, पारसनीस, राजवाडे, राजाध्यक्षादि [ सत्कार्योत्तेजक भारतेतिहास ]** मंडळी पुढें सरसावली. तिचें बरेंच काम फलद्रुपही झालें. मराठेशाही इतिहासाचें संशोधन करीत असता त्यांचे हातून शिंदेशाही इतिहासावरही साहजिकच बराच प्रकाश पडलेला आहे तथापि सुसंगत, व स्वतंत्र अशा शिंदेशाही साधनाची अनुकूलता होत नव्हती तो काळ जाऊन ईशेच्छेनें आणि **कोटेकर वकील गुलगुले** यांच्या ममत्वानें व **पुणेकर देशमुख** [ राजराजेंद्र मालोजी नरसिंगराव शितोळे ] यांच्या

सक्रीय प्रोत्साहनामुळें आजचा हा सुयोग इतिहासभक्तास लाभत आहे यावद्दल परमेश्वराचे धन्यवादच गायिले पाहिजेत आता एवढ्यावरच संशोधनकार्य संपलें असे मात्र समजता कामा नये या संग्रहाखेरीज स्वतंत्र असें कित्येक ज्ञाताज्ञात सग्रह शोधून शिंदेशाही इतिहासात त्याची अजून भर टाकावयास पाहिजे अशा प्रयत्नासिवाय शिंदेशाहीचा सत्यसाधंत इतिहास तयार होणे शक्य नाही असा माझा विश्वास आहे हें कार्य आजपर्यंत शिंदेशाही छत्राखाली वास करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीने आपल्या शिरावर धारण केलें नसून उलट या संबंधात हेळसाडच होत गेली असा स्पष्ट कबूली जवाब दिल्यासिवाय गत्यतर नाही. तसेंच शिंदेशाही राज्यांतर्भूत साधनचिकित्सा होऊन ती प्रकाशित झाल्यामुळेच सर्व कार्यभाग उरकणारा नसून त्याच्या पूर्ततेकरिता अन्य ठिकाणचींही साधनसामुग्री हाती लागली पाहिजे व त्या दिशेनें प्रयत्न होणे अत्यावश्यक आहे

या कार्यास काहीं तरी मूर्तस्वरूप यावें अशी फार दिवसापासून उत्कट इच्छा होती व त्यानुसार कार्याला लागलो पण ज्याच्या ज्याच्या जवळ ही साधनसपत्ति होती त्याच्या जवळ विनवणी पूर्वक याचना केली असता नेहमी दैवच आडवें येत गेले शेवटी या बाजूनें निराश होऊन निवडक मंडळीच्या संमतीनें जेवढी व जशी साधने मिळतील तशीच प्रकाशित करण्याचा निर्धार केला. ' निश्चयाचें बळ तुका म्हणे तेचि फळ ' हा अनुभव प्रत्यक्ष प्रचीतीस आला वरींच ऐतिहासिक पत्रे पाहावयास मिळून त्याच्या नकलाही हस्तगत झाल्या काही सज्जनानीं तर कागदही सर्वस्वी स्वाधीन केले अशा रीतीनें निराशेत आशा उत्पन्न होऊन उत्साह वाढून कार्य नेटानें चालले याच संधीस बलवंतराव रामचंद्र रेगे [ दौंडकर ] याचे द्वारें कोटेकर गुलगुले याचा परिचय होऊन ही विपुल **अमोल रत्ने पदरीं पडली** यावद्दल या उभयताचें जितकें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे शिंदेशाहीचा अभिमान बाळगणारी अशी प्रत्येक व्यक्ति अंत करणपूर्वक आभार मानिल्यावाचून खचित राहाणार नाही त्याचा मी सदाचा ऋणी झालो असें म्हणावयास हरकत नाही त्याच्या ह्या औदार्यामुळें आळसातून मुक्त होऊन मला अकस्मात् आपल्या काळाचा या सत्कार्यात व्यय करण्याची संधी मिळाली त्याविषयी मी व्यक्तिश उभयताचा अत्यंत आभारी आहे

**कोटेकर वकील गुलगुले** याचे नाव महाराष्ट्रीयास ' काही नवे नव्हे ' या घराण्याचा परिचय ' इतिहाससग्रह ' कार पारसनीस याने मागेंच करविला आहे [ऐस्फुले भाग ३ पान २१] आणि ' नाना साहेब पेशवे ' याचे चरित्रकार सरदेसाई यानी देखील त्याचा पुनरुल्लेख केला असून मराठेशाहीच्या उत्तरहिंदुस्थानकडील स्वाऱ्यासंबंधी साधनें सग्रही असल्याचें ध्वनित केलें आहे अर्थात् या घराण्याचा सविस्तर वृतात अवगत करून घेण्याची पिपासा इतिहासभक्तास स्वभावत उत्पन्न झाली असेल कागदपत्रासंबधी तर फूल नाही फुलाची पाकळी या न्यायाने थोडे बहुत समाधान करिता आले तसे याविषयी शक्य नाही. वाटणीपासून पानिपतच्या प्रथम सलामीपर्यंत बाळाजी यशवंत गुलगुले याची कारकीर्द संपली तदोत्तर लालाजी बल्लाळ वकिलीवर आला व त्याचे समोरच पेशवाईची इतिश्री झाली. अर्थात् या पितापुत्राचा काळ म्हणजे मराठेशाहीचा उत्तरेकडील सबंध इतिहास होय बऱ्याच कागदपत्राची निवड करणें बाकी राहिल्यामुळें सविस्तर वर्णन देता आलें नाही तथापि या घराण्याची सक्षिप्त माहिती लेखाक २ [ टीप ४ ] मध्ये आलेलीच आहे तेवढीच तूर्त पुरेशी होईल असें वाटते याहून विशेष व इत्थंभूत माहिती पुढे निराळ्या खडाच्या रूपानें देण्याचा विचार आहे

## शिंदेशाहीसंबंधीं जुनी व नवी साधनें.

शिदेशाही इतिहास रचणाऱ्या देशीय तथा विदेशीय ग्रंथकार यांचें सिंहावलोकन केलें असतां **रामाजी अनंत दाभोळकर** यास शिंदेशाहीचा **पहिला बखरकार** म्हणून मान द्यावा लागेल शिंदे होळकरांनी अंतर्वेदीत रोहिलखंडावर १७५१-५२ साली जी मोहिम केली तिच्या वर्णनपर दाभोळ-कराने एक बखर लिहिल्याचा विश्वसनीय शोध लागतो [ लेखांक ९५ टीप १२१ ] पण दुर्दैवानें **ती बखर आज उपलब्ध नाही.** जळालेल्या गुलगुले संग्रहात ती सापडली असली तर तिची प्राप्ति अशक्यच म्हटली पाहिजे तिची एखादि प्रत स्थलांतरां अज्ञातवासात पण सुरक्षित [ सुदैवानें ] राहिली असल्यास तिचा पुढे मागें शोध लागणे मात्र संभवनीय आहे या पलीकडे या बखरीची माहिती देता येणें शक्य नाही

‘**भाऊ साहेबांची बखर** हिचा कर्ता हा शिंदेशाहीचा दुसरा इतिहासकार होय ‘भाऊ बखर’ हे बखरीचे मूळनाव नसून तिच्या अनेक प्रतीपैकी एका प्रतीच्या [एका] पृष्ठावर’ बखर भाऊसाहेबाची’ अशी अक्षरें असल्यामुळे त्या आधारावर **काशीनाथ नारायण साने** यांनीं तिला वरील नाव दिलें आहे तिचे खरे नाव ‘**पानिपतची बखर**’ असेंच असावयास पाहिजे असा स्वयम् सान्याचाच विषेशत्वे कल होता. तसेंच ‘बखर लिहिणारा कोणीही असो तो शिंद्याच्या पदरीं असून मोठा शोधक व बुद्धिमान असला पाहिजे किंबहुना तो शिंद्याचा पक्षपाती भासतो असें म्हटलें तरी चालेल’ अशी बखरीच्या अंत प्रमाणाची खूण त्याना पटली तरी ती रुचली मात्र नाही. संगोपनसंस्कार करितांना तिला लडिवाळाचें हें नाव त्यांनी अर्पण केले आहे, अर्थात् ‘ चिटणीस, सभासद, सोहनी, रघुनाथराव यादव’ इत्यादि नामांकित इतिहासकाराच्या प्रभावळीत ‘**चिंतामण** गोविंद किंवा **कृष्णाजी** शामराव' या बखरकाराचे नाव सापडत नाही. ही दोनी बखरकाराची काल्पनिक टोपणनावें असून आपलें नाव अज्ञात राहावे असा त्याच्या मनाचा कल होता असें मानिलें तरी सान्यानी ह्या बखरीला जें नांव दिलें आहे त्याचे अनुचितत्वासंबंधी अनेक मुद्दे सांगता येतील पण तिच्या कर्त्याचा शोध लागल्यावर नावाबद्दल वाद गौण राहतो म्हणून त्या मुद्याना जरा बाजूला ठेवून **या बखरकाराच्या नांवाचा सुगावा लागण्याची सुचिन्हे दिसूं लागली आहेत असे मी सुचवीत आहे.** ‘चक्षुर्वै सत्यम्’ या न्यायानें पुरावा उपलब्ध होईपर्यंत त्याचें नांव पुढे आणून एक नवीन वाद उपस्थित करणे प्रशस्त होणार नाही तथापि ‘तो शिंद्याच्या पदरचा असून त्याचा तो पक्षपाती [ नव्हे पण पक्षाभिमानी ] होता’ हा सान्याचा तर्क खरा ठरण्याइतका आधार मिळेल असा विश्वास वाटतो प्रत्यक्ष प्रमाण हातीं लागल्यावर ह्या संबंधात पुढें स्पष्ट चर्चा केली जाईल यदाकदाचित् हे प्रमाण हाती न लागलें किंवा लागूनही तें अग्राह्य ठरले तरी या बखरीचा बराच संबंध शिंदेशाहीशीं येत असल्यामुळ आणि ती ‘चिटोरात्मक’ कसोटीस उतरत असल्यामुळे शिंदेशाही इतिहासाची रचना करावयाचे कामी तिचा आधार घेणे प्राप्त आहे एवढी गोष्ट मात्र लक्षात ठेविली पाहिजे.

**मोगे लक्ष्मण रानवडे** हा तिसरा ग्रंथकार होय दौलतराव शिंदे यांच्या मातोश्री मैनाबाई ह्या कुलावेकर आंग्रे ह्याच्या कन्या होत्या आणि आंग्रे यांचा रानवडे हा [ बहुधा ] कारभारी किंवा जुना माहितगार होता सालबईच्या तहानंतर इंग्रजाचा वकील शिंद्याच्या दरबारी राहूं लागला त्यापैकी Sir Robert Close यानें शिंद्याच्या इतिहासाची माहिती मागितली असता ती पुरविण्याच्या कामी रानवडे याची योजना झाल्यावरून त्याने ही बखर लिहिली आहे. हा ग्रंथकार महाराष्ट्रीय असल्यामुळे

तिची मूळ रचना मराठीतच असावी असें वाटतें पण मराठी बखर किंवा तिची प्रत उपलब्ध नाहीं. तिचें फारसी भाषांतर जें उपलब्ध झालें आहे त्याला आरंभ व शेवट या प्रमाणें दिला आहे ही नगर प्रजा अजाण व अज्ञानाभिमानशून्यीच आहे.

' सरकार ग्वाल्हेर रेसिडेंट निस्बत कप्तान उमराव बहादुर यांनें [ शिंदे राजघराण्याविषयीं ] ऐतिहासिक माहिती मागितल्यावरून मोरो लक्ष्मण रानवडे निस्बत संभाजीराव आंग्रे यांना [ महाराज दौलतराव शिंदे यांनी ] आज्ञा झाली कीं त्याने या संबंधीं चौकशी करून माहिती मिळवावी. सर्व ठिकाणी शोध केला असें आढळलें कीं राणोजी शिंदे यांच्या वेळचे कोणी माहितगार नसून जे कांहीं आहेत त्यांना पुरती माहिती नाहीं तथापि राज्यांतील प्रत्येक जागीं फिरून जुने सरदार व जमीनदार यांजकडून पुढील माहिती [ एकत्रित करून ] दिली जात आहे.'

अशा प्रकारें आपल्या सात आठ माणसांसहित सर्जेराव [ घाडगे घायाळ होऊन ] मरण पावल्या त्या प्रसंगीं तिनशेंच्या वर सरदारी माणसें जाया झाली ही घटना संवत १८६१ [ ? ] चे सालीं घडली नरेन्द्र [ दौलतराव शिंदे ] फौजेसहवर्तमान कूच करून नरवरास दाखल झाले नरवरच्या किल्ल्यात खंडोजी इंगळे राहत होता तो महाराजांचे [ पेशवाईस तथा ] भेटीस [ही सामोरा] आला नाहीं तो असें म्हणूं लागला कीं ईश्वराचे आश्रयानंतर महाराजांचे भेटीचें प्रयोजन काय ? [ सामोरा न येतां उलट रणांत तो युद्धास प्रवर्तला ] त्यावर उभयपक्षांमध्ये नरवर येथें लढाई सुंपली [ शेवटीं ] महाराजांनीं किल्ला [ सर करून ] आपले स्वाधीन ठेवून तेथील बंदोबस्त केला खंडोजी इंगळे याचे ' सटराम ' किल्ला बाहेर काढून दिले. मग तेथून कुच करून ग्वाल्हेरीस मुक्काम केला संवत १८६९ शके १७३४ या सालीं छावणी ग्वाल्हेरीस कायम केली. '

या बखरीची रचना कधीं झाली याविषयीं स्पष्टीकरण केलें नसलें तरी सर्जेराव घाडगे यांचे निधनोत्तर खंडोजी इंगळे यांजपासून नरवर घेऊन दौलतराव शिंदे ग्वाल्हेरीस आले आणि तेथे त्यांना ज्या सालीं छावणी केली तें वर्ष रानवडे स्पष्ट देत आहे. अर्थात् ग्रंथसमाप्तीचें हेंच सांकेतिक साल समजलें पाहिजे तसें तें निश्चित करण्यासाठीं जर बाध येत असला तर तो इतकाच कीं घाडगे १८६१ सालीं मारला गेला त्यासरशी इंगळेप्रकरण उपस्थित झालें असें रानवडे सुचवितो तर नरवर घेऊन ग्वाल्हेरीस येण्याला जो आठ वर्षांचा काल लागला तो जास्त वाटतो. ही शंका विचारणीय आहे तिचें निरसन या प्रकारें होतें कीं घाडग्याच्या मृत्यूचें जे साल दाखविलें आहे तें सर्वस्वी चुकलें आहे मग ही भूल स्वयम रानवडे किंवा भाषांतरकार यांपैकीं कोणीही केली असो त्यासंबंधीं विवरण करीत नाहीं. ' चंद्र २२ जमादार उर्फ आषाढ अशर मयातैन [ ५ अगष्ट १८०९ ] शहापुरा प्रांत मेवाड ' येथें घाडगे मारला असा जरी प्रत्यक्ष लेखी आधार सापडतो तथापि हीच तारीख ' २६ जुलै १८०९' होती असें Captain Broughton सांगतो [ Letters page 167 ] ' १२ चे जागीं २२ जमादार ' हा हस्तदोष मानिला तर ' २६ जुलै १८०९ ' येते. अस्तु ' २६ जुलैच का होईना पण ती घाडग्याची निधनतिथि ठरल्यानंतर रानवडे याचे दुसऱ्या भावार्थाच्या उत्तरार्धाविषयीं विचार करणें प्राप्त होतें घाडग्याचे निधनोत्तर थेट नरवरास शिंदे आले असें जें रानवडे भासवितो तें वस्तुत खरें नाहीं मेवाड, अजमेर, जयपुर, बूंदी, इंद्रगढ, सोपार व पोहरी वरून दौलतराव शिंदे ' अगष्ट १८१० चे सुमारें नरवरला आले आणि तेथून मे १८११ चे पहिल्या आठवड्यात ते ग्वाल्हेरीस पोंहोचले ' येवंच राजपुतान्यातील हालचाली वगळून ग्वाल्हेरीस येण्यापूर्वी

नरवर येथील शेवटच्या मुक्कामाचा वृत्तांत देऊन रानवड्यानें समाप्ति केली आहे. त्यानें तसें कां केलें हें कळत नाही तथापि सामोपचारें समेट करण्याची भापा घाडग्याचे वेळेपासून देवजी काळे याचे मध्यस्थीनें इंगळ्याशी चालू होती ही गोष्ट मात्र खरी आहे त्याचा निकाल शिंद्यास नरवर घेऊनच करावा लागला व तेथून ते ग्वाल्हेरीस आले इतकेंच दर्शविण्याचा हेतु रानवड्याचा असावा असें वाटते घाडग्याचे मृत्यूनंतर थेट नरवरची स्वारी झाली असा भावार्थ कदापि शक्य नाहीं

ज्या Close च्या मागणीमुळे ही बखर निर्माण झाली तो वकील या नात्याने तीन वेळा आला असला तरी त्याच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या कारकीर्दीत ही रचना झाली नसून पहिल्याच वेळी झाली असली पाहिजे कारण की नरवरापेक्षा महत्वाने अधिक अशा अनेक घडामोडी १८११ नंतर झाल्या त्याचा यात लवलेशही नाही एक वर्षाची राजपुतान्याकडील संबंध मोहीस रानवड्यानें गाळली आहे हें वैगुण्य त्याचे पदरी जें येऊं पहाते त्याचे एक कारण असे दिसते की Close हा त्या काळी मुहिमेंत प्रत्यक्ष वावरत असल्यामुळे तितका भाग त्याने सोडला असावा Malcolm तथा Grant Duff या उभयतास हिची वार्ता नव्हती त्या वरूनही हेंच अनुमान निघते

**नरसिंगराव सदाशिव नेवालकर** हा शिंदेशाहीचा चौथा बखरकार होय 'छत्रसिंग जाट राणा गोहद याने फिरंग्याशी सधान करून [ त्याची ] कुमक घेऊन ग्वाल्हेरचा किल्ला घेतला ' त्या मुहिमेचें त्याने वर्णन दिले आहे. अर्थात् गोहदप्रकरणी महादजी शिंदे याचे इग्रजाशी झालेल्या युद्धाची ही बखर होय. या नेवालकराचा काहीं शोध लागत नाही. तो शिंदेशाहीचा आश्रित असावा असा भास होतो. कदाचित् तो तसा न निघाला तरी 'श्रीमंत महाराज' या आदरप्रदर्शित विशेषणावरून त्याचा शिंदेशाहीशी काही तरी संबंध असला पाहिजे असें वाटते ही बखर आजवर उपलब्ध नव्हती. नुकताच तिचा शोध लागला आहे **अनंत वामन वाकणकर** [ धार ] याचे सग्रहीं जी प्रत मिळाली ती साग्र नसून बखरीचा एक अध्याय असावा असें तिच्या उपसहारावरून अनुमान निघतें

' महाराज याणी [ सदाशिव मल्हार ] वक्षीवर मेहरवानी करून जाहागीर, बहु [ मान ] नहावस्त्रे दिली **पुढे हिंदुस्थान, दिल्ली, आग्रे वगैरे सर होणार** या प्रकारे फिरग्याचा सलूक जाला. या मजकूराची बखर नरसिंगराव सदाशिव नेवालकर याणी केली ही बखर समाप्त सवत १९०१, शके १७६५ सन [ हिजरी ] १२५९ मुकाम लष्कर नजीक ग्वाल्हेर, श्रावण वद्य ४ रोज शनिवार ते दिवशी समाप्त. बहुत काय लिहिणे हे विनंती. '

' पुढें हिंदुस्थान दिल्ली आग्रा सर होणार ' या वाक्यावरुन महादजी शिंदे याच्या चरित्रातील [ गोहदपूर्व वृतात समाप्त करून ] गोहदोत्तर प्रकरणाची रचना करण्याचें बखरकाराचे मानस होतें असा स्पष्ट संकेत आहे याविषयी तर मतभेद शक्य नाही गोहोदोत्तर हें प्रकरण नेवालकराने समाप्त केलें किंवा नाही हें कळण्यास आधार नसला तरी त्याचा हा सकल्प तडीस गेला असावा असेंच म्हणणें ओघाने प्राप्त होते ही रचना झाली नसेल असेंही शक्य आहे पण वरील स्पष्ट संकल्परूपी संकेतावरून पहिलाच तर्क जास्त संभवनीय वाटतो. हिंदुस्थानसंबंधीं निराळा अध्याय हस्तगत झाला असता तर निर्णयच लागला असता. अस्तु तो दृष्टोत्पत्तीस येत नाही म्हणून बखरीची मागील पुढील रचना झालीच नसेल असें प्रतिपादन करणे जरा धारिष्ट्याचें होईल. शोधाती जे ठरेल ते खरे

या पलीकडे या नेवालकरविरचित बखरीसबंधीं तसेंच तिची प्रत धारेस वाकणकराकडे कशी गेली याबद्दल विशेष काहीं सागता येत नाहीं. धारचे अनंत वामन वाकणकर हेच काहीं स्पष्टीकरण करूं

इतकी भाषासाम्यता तरी कशी संभवनीय आहे ? किंवा फडक्याच्या इतिहासाचा प्रसार करण्यासाठीं प्रकाशित प्रत हाती लागल्यानंतर त्याच्या भाषेचे शुद्धिकरण करण्याचा प्रयत्न करून त्याने त्यातील १८४४ पर्यंतची हकीकत लिहिली असावी ? बहुधा हा दुसरा प्रकारच जास्त संभवतो.

जगन्नाथ प्रभाकर सरजामे याने १८७२ साली 'शिंदे यांचे घराण्याचा इतिहास' प्रकाशित केला. 'शेणवी वीर व मुत्सद्दी' ही बखर विविधज्ञानविस्तार मासिकात १८७९ साली प्रसिद्ध झाली तिचा कर्ता कोण हें अद्याप कळले नाही

कै. सरदार बळवंतराव भय्या साहेब शिंदे याचे प्रोत्साहानावरून विष्णु रघुनाथ नातु याने 'आलिजाह बहादुर माधवराव शिंदे यांचे चरित्र' १८९४ साली रचिले ह्या ग्रंथावर टीकात्मक जे लेख 'केसरी' पत्रात प्रथम प्रकट होऊन नंतर पुस्तकरुपात चिंतामण गंगाधर भानु यांनी 'नाना आणि महादजी' या मथाळ्याखाली प्रकाशित केले, त्याच्या प्रत्युत्तरादाखल हरिश्चंद्र नारायण नवलकर याने 'माधवराव शिंदे व नाना फडणवीस याची तुलना' या नावाचे एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें

'इतिहाससंग्रहकार' पारसनीस याने 'बायजाबाई शिंदे याचे चरित्र' १९०२ सालीं रचिले. तदोत्तर शिंदेशाहीसंबंधीं 'शकावली' व असल पत्रव्यवहाराचे पाच स्वतंत्र भाग प्रसिद्ध केले

जुन्या बखरी व ऐतिहासिक चिटोरी गोळा करण्याचे पर्वणीबरोबर विशिष्ट व्यक्तीचें लक्ष वेधून जी जागृति झाली त्यासरशी १९०७ साली नरहर व्यंकाजी राजाध्यक्ष यानी 'जिवाजी बल्लाळ केरकर यांचें चरित्र' निर्माण केलें. सप्रमाण साहित्यासह बाहेर पडणाऱ्या या शिंदेशाही इतिहासास ओघानेच आद्य मान मिळालेला आहे. याच साली उर्दू भाषेत रघुनाथदासजीने 'तारीख सिंदिया' लिहिली धनुर्धारीकृत 'आलिजा शिंदे' सर्वश्रुत आहेच यानंतर अलीकडे म्हणजे नुकतेच गतवर्षी शिंदेशाहीशी संबंध ठेवणारे वाटारकर निंबाळकर यांनी आपले घराण्याचा इतिहास प्रकाशित केला आहे.

या मराठी व उर्दू ग्रंथरचनेसिवाय इंग्रजी भाषेत शिंदेशाहीसंबंधी सात ग्रंथ उपलब्ध होतात (1) Hope's House of Sindia. 1864. (2) Col. Malleson's Essay on Mahadji Sindia. 1869 (3) H. G Keene's Mahadji Sindia 1872. (4) S. N. Roy's Gwalior. 1888. (5) M W Burwe's Life of Ranoji Sindia 1917 & (6) Mahadji Sindia. 1932. (7) Madhava Rao Sindia, by Bull & Haksar.

या जुन्या व नव्या लहान मोठ्या साधनसाहित्याचे परीक्षण किंवा चिकित्सा तूर्त न करिता दिग्दर्शनार्थ केवळ एवढेंच सागावेसें वाटते की सन १८६० चे बंडानंतर जी नवीन ग्रंथोत्पत्ति झाली ती बव्हंशी परदेशीय इतिहासकारांच्या आधारावर झालेली असून विशेषत वैयक्तिक आवडीनिवडीचें फळ होय. ही रंगीबेरंगी फळे दुषित, पोकळ व निर्जिव असल्यामुळे भावीइतिहासविजारोपनाला ती निरुपयोगीच होत. तथापि अशा काळी सुद्धा स्वावलंबन व शोधकबुद्धि याच्या बळावर **नातु, पारसनीस राजाध्यक्षादि** विद्वानानी लावून वाढविलेली काहीं जोरदार रोपडी विरळा व अपवादात्मक का होईना पण प्रत्यक्ष मिळतात त्याच प्रमाणे परकीय इतिहासकारातही Hope व Keene या सारखे सत्यशोधक देखील सापडतात हें विसरता कामा नये

जुन्या संचयापैकी दाभोळकराच्या श्रमाची फलप्राप्ति झाली नसेल किंवा भाऊ बखरकाराचा शोधही लागला नसेल असें ग्रहित धरून चाललें तरी राजाज्ञेनुसार प्रत्यक्ष राजधानीत केलेल्या प्रयत्नाचा व निपजलेल्या पुष्पाचा गंधही नसावा किंबहुना त्याचें सर्वस्वी विस्मरण व्हावे आणि ती सुगंधित पुष्पें परकीयास आवडून त्याच्या लागवडीची कलमें इतरत्र पाहावयास मिळावीत ! तसेंच त्याच

पत्राचें पृथक वर्गीकरण करण्याचे कामीं वामनराव गंगाधर ननकाडे यानें परिश्रम केले व हल्लीही करीत आहे तसेच निवडलेली पत्रे वाचून, समजून टायपिस्ट [ शशिकांत खानवलकर ] याचे करवीं शुद्ध लिहवून घेण्याचे कामी गणेश गोपाळ वैशंपायन हे फार दक्षता ठेवून नकल करण्याची काळजी वाहतात, असें संतोषाने नमूद करीत भाग आहे

आलीजाह दरबार प्रेसचे व्यवस्थापक **यशवंतराव माणगांवकर** यांनी या कामासाठी खास टाईपाची व्यवस्था करून आपले नजरे खालीं हें काम करवून घेतलें म्हणूनच हा पहिला भाग इतक्या लौकर इतिहासभक्तास पहावयास मिळत आहे याबद्दल मी त्यांचे मन पूर्वक आभार मानतो.

जी निरनिराळी चिन्हें तथा शिंद्याचे राजचिन्ह व मलपृष्ठाची रेखाटणी या सर्वांचे Drawing **रामचंद्रराव माने** कोल्हापुरकर याने काढिले तसेच त्याचे ठसे **विठ्ठलराव लक्ष्मण माने** [ म्हसवडकर ] यांनी येथील कलाभुवनामध्ये तयार करवून ठेवविले त्याबद्दल उभय मान्याचे मी अभिनंदन करीत आहे मुद्रितें तपासण्याच्या कामीं **अण्णासाहेब खंडेराव शिर्के** [ कुटरेकर ] यांनी काही दिवस सहाय्य केले आणि **माधवराव गंगाजी जाधव** यांनी लेखांकातील ठरविलेल्या तारखा वेळोवेळी तपासून त्या रुजू करण्याचे कामीं मदत केली त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

टीपा व्याकरणरीत्या शुद्ध करून त्यातील शब्दाचे शुद्धाशुद्ध पाहाण्याचें आणि मुद्रितें तपासण्याचें दिवसरात्र परिश्रम **लक्ष्मणराव तात्याजी शिंदे,** [ शिक्षक मराठा हायस्कूल ] याने घेतले आणि काम पूर्ण होईपर्यंत तात्पुरती शाळा सोडून संपादकाजवळ राहाण्याचा जो निर्धार केला आहे यावरून शिंदेशाहीविषयी त्याचा पूज्यभाव प्रतीत होतो हे निराळे सांगावयास नको. या रीतीने सहाय्य करण्याची उत्कंठा असल्याचें माझ्या परिचयातील हे पहिलेच उदाहरण आहे

शेवटी आता या कार्यास प्रवृत्त करविणाऱ्या तीन व्यक्तींचा नामनिर्देश केल्यावाचून राहावत नाही. कै आलीजाह बहादुर **माधवराव शिंदे** ही ती पहिली विभूति होय हिनेच संपादकाला रंकाचा राव केला हा केवळ गौरवालंकार किंवा अतिशयोक्ति नसून खरी सत्योक्ति आहे संपादकाचे घराण्याचा वंशपरंपरागत ऋणानुबंध लक्षात घेऊन सतत पाच पिढ्या दत्तविधान निश्चित करून आत्मियतेची साक्ष पटविली आईबापाचे पश्चात् पितृवत पालनपोषण करून स्वतःच्या नजरेखालीं शिक्षण देऊन तारुण्योच्छृंखलपणामुळे घडणारे अनेक अपराध पोटी घालून मार्गास लाविले. या विभूतीच्या कृपाप्रसादामुळेच आज मला ही लेखणी धरण्याचें धैर्य होत आहे. हिचे हे उपकार स्मरूनच हे अल्प सेवापुष्प तिचे चरणीं समर्पित करीत आहे.

कै० महाराजांनी ठरविलेल्या कार्यक्रमानुसार शिक्षणाचा लाभ घेत असता मला सौभाग्याने गुरुवर्य **बाळकृष्ण रामचंद्र वोकिल,** एम्. ए. यांचे शिष्यत्व लाभले. त्याच्या शुद्ध व सात्विक प्रेमाशिर्वाद मिश्रितज्ञानगंगेचा लाभ मला मिळाला प्रस्तुत कार्यातही त्यांची मला अमोलिक मदत झाली असून त्याच्याशी विचारविनिमय केल्याने या कार्याची दिशा बरीच निश्चित करिता आली. तसेंच फारसी भाषेचे ते आचार्य असल्यामुळें त्या भाषेतील शब्दाचे मूळार्थादि त्याचे कृपेमुळेंच देतां आले हें निराळे सांगावयास नको

सरकारी सेवेत प्रविष्ट झाल्यानंतर कोणत्याहिप्रकारे संबंध नसता स्वाभाविक शीलास वळी पडून **पांडुरंग बाबुराव वाळिंबालकर** [ साप्रत दिवाण सावंतवाडी ] यांनीं सतत सहा वर्षे आपल्या सहवासात घेऊन ऐतिहासिक ग्रंथामिरुचि वाढविली व लौकिकव्यवहाराची ओळख करून दिली त्यांच्या शिकवणीमुळे आज हे कार्य हातीं घेण्याचें साहस करिता आले.

सरते शेवटीं इतके आगखी सांगावयाचें आहे की साधनसंशोधनाचे क्षेत्रात उतरून धांवपळ करावयाचा विचार या शिलेदाराचा झाला होता तरी त्याची चाल फार मंद होती. तिला अकस्मात तेजी आली ती अशी की शिंदेशाहीची दिगंत कीर्ति गाजवून ज्याने 'श्रीशिन्दायाचे [साम्राज्यरूपी] हेतू पूर्ण करून दाखविले' त्या विभूतीच्या पुतळ्याची स्थापना होणार अशी वार्ता कानीं येऊन अनावरणसमारंभ ही निकट येऊन ठेपला आहे असे कळले. तो मुहूर्त साधला पाहिजे अशी देशमुखांची प्रेरणा व वकीलाची मुख्य 'कमान' मिळाली त्यामुळे या शिलेदाराने धावे दणाणले तारांबळीत कसे तरी काम आटोपून पहिली मजल मारून मुहूर्त गाठणे भाग पडले सुदैवाने तो मंगल दिवस आज साजरा होत आहे या शुभ घडीस श्रीमंत महादजी शिंदे आलीजाह बहादुर यांचे स्मरण करून आपल्या सोबत्यासह त्या 'शूरवीरास' ही सलामी देत आहे

ज्या साधनाधारे टीपा दिल्या आहेत त्यांची निराळी ग्रंथसूची प्रथमारंभी दिली आहे तसेच स्थल-सूची व व्यक्तिसूचीही शेवटी जोडली आहे. या शिलेदारास व त्याचे सोबत्यास हीं साधने किंबहुना हा साहित्यसांप्रदाय अगदी नवा असल्यामुळे व त्यास लागणारी प्रमाणुकूलता नसल्यामुळे आणि युद्धकालात हा व्यवसाय अनपेक्षित स्वीकारणे प्राप्त झाल्यामुळे हे काम जितके समाधानकारक रीतीने शेवटास नेता आले पाहिजे तितके झाले नाही. यात अनेक दोष राहिले आहेत. ते पुढे यथाशक्ति दूर करण्याचा यत्न केला जाईल तरी पण ही सर्व सृष्टि नवी असल्यामुळे दोष रहावयाचेच त्यासंबंधी येवढे सुचविणे आवश्य आहे की यथाशक्ति निःपक्षपाताने टीपा देण्याचा प्रयत्न केला असून कोणावर कटाक्ष ठेवून धार धरली नाहीं अथवा शिंदेशाहीचा दृष्टीकोण सर्वस्वी स्वीकारिला नाहीं केवळ 'शिंदेशाही इतिहासाचीं साधनें' हें नाव धारण केल्यामुळे कोणाला तसा भास झाला तर त्यास निरुपाय आहे. एवढी विपुल सामुग्री प्राप्त झाली असता माझे जागी अन्य व्यक्ति असती तरी तिने देखील हेच नांव दिले असते सुसंगत व सप्रमाण असा शिंदेशाही इतिहासाची जर रचनाच झाली नाहीं अथवा स्वतंत्र साधनेही प्रसिद्ध झाली नाहीत अशा स्थितीत अन्य साधनाधारे जी कल्पना शिंदेशाहीसबंधी रूढ झाली आहे त्यात या प्रयत्नामुळे जे फेरफार करणे अवश्य असतील ती स्थले व ते प्रसंग दर्शविल्यामुळे पक्षाभिमानाचा दोष माझे अंगी येऊ पहात असेल तर सुखे येवो या विषयी इतिहासभक्तांच्या क्षमेची ढाल हाती घेऊन निःशंक वावरत आहे किंबहुना पुढेही त्याच बळावर हा शिलेदार आपली खाजेराई चालू ठेवणार आहे हे लक्षांत असूं यावे सर्वशक्तीमान प्रभू ही 'शिंदेशाही इतिहासाची साधने' आपल्या अतवर्य लीलानुपद्धति प्रकाशित करवीत आहे. त्या विषयीं त्याचे पोवाडे गात हा शिलेदार आपली तात्पुरती रजा घेत आहे

॥ करविली तैशी केली 'खटपट' ॥ वाळूं की नीट देव जाणे ॥
॥ कोणा कारणे हे जालेसे निर्माण ॥ देवाचे कारण देव जाणे ॥
॥ अटो पोते मके सक्रन्दी जन ॥ करे पारखून बांधा गाठी ॥
॥ 'उकलिले' भांडार धन्याचा हा माल ॥ हा 'तो शिलेदार' भारवाही ॥

कृष्णमंदिर ग्वाल्हेर,
मिती माघ कृष्ण १० बुधवार,
विभवनाम संवत्सर, संवत् १९८५

आनंदराव भाऊ फाळके

श्री

यादी * वंशावली राणोजी सिंदे याजपासून सुमा सित असर मयातैन [अलफ] शके १७३७ मुा ग्वालेर.

† राणोजी सिंदे बिन जनकोजी सिंदे याची मातुश्री द्वारकाबाई, वतन कन्हेरखेड याचा विस्तार. [ राणोजी ] याच्या स्त्रिया दोन.

| निंबाबाई जेष्ठ. | चिमाबाई कनिष्ट. |
| --- | --- |
| ३ पुत्र. | २ पुत्र. |
| १ जयाजी सिंदे. | १ तुकोजी सिंदे. |
| १ जोतीबा सिंदे. | २ महादजी सिंदे. |
| १ दत्ताजी सिंदे. | |
| ३ | २ |

* ही वंशावली कालानुक्रम पहाता वरीच पुढें छापावयास पाहिजे, परंतु या व पुढील भागात ज्या घराण्यासबंधीं पत्रव्यवहार यावयाचा आहे त्या शिंदे राजघराण्यातील प्रमुख व्यक्ती कोणत्या होत्या व त्याचें परस्पराशीं नातें कोणत्या प्रकारचें होतें हे दाखविण्यासाठी, अर्थात् विषय परिचयार्थ, आवश्यक असल्यामुळें प्रारभीं दिली आहे. शिंदे सरकारचे खासगी कारभारी उपनाम क्षीरसागर यांचे संग्रहीं ही सापडली ज्या अनेक वंशावली प्रसिद्ध झाल्या आहेत त्या सर्वांत सर्वतोपरि विश्वसनीय अशी हिची योग्यता असल्यामुळें महादजी शिंद्याचा चरित्रकार नातु यानें तिचा [ अपूर्ण ] पुरस्कार केलेला आहे. [ पान ३०१ ] आणि तुलनात्मक दृष्टीनें मलाही त्यात फारसे दोष दिसत नाहींत अस्तु. तिच्या सत्यासत्यते विषयीं तसेंच राणोजीचें 'शूद्रत्व' [ फडकेकृत शिंद्याचा इतिहास पान १ ] व महादजीचे 'विदुरत्वा' संबंधीं [ सरदेसाईकृत नाना साो पेशवे ३८ ] ज्या भ्रामक कल्पना प्रचलित आहेत त्याबद्दल पुढें योग्य स्थलीं विवेचन केलें जाईल म्हणून तूर्त कमाकडी देत नाहीं. कागदपत्र जसजसे पुढें येतील तसतशी सत्यतेची स्वाभाविक साक्ष पटणार आहे येवढें मात्र येथें सुचवीत आहे.

† श्री छत्रपती [ थोरले शाहु महाराज ] व पंत प्रधान पेशवे यांजकडून मिळालेल्या सनदोपत्रीं आणि वतनसबंधीं इतर कागदोपत्रीं 'राणोजी सुत जनकोजी इब्न दत्ताजी शिंदे' अशी परंपरा दिलेली आहे क्षीरसागरानें केवळ राणोजीचाच वंशविस्तार दिला आहे. पूर्वपीठिका माहीत असूनही ती दिली नाहीं तिचें निराळें टिपण करुन ठेविलें आहे त्यात मात्र इतर शाखाचा विस्तार दिला आहे

४ कंन्या.

१ जानकाबाई भोइटे तडवलेकर.
१ जोगूबाई नेरलेकर सांळोखे.
१ येसूबाई सितोळे पाटसकर.
१ मैनाबाई माने रहिमतपूरकर.

४

[ ७ ]

याचा विस्तार पुत्राचा.

१ जयाजी सिंदे मारवाडात नागोरावर दगा जाला. याची स्त्री सकूबाई गाढवे याची कंन्या.

१ पुत्र जनकोजी सिंदे याची स्त्री कासीबाई सुलतानजी आपा खर्डेकर याची कंन्या. त्यास संतान नाहीं पाणीपतावर राहिले सा.

४ कन्या.

१ राजसबाई निंबाळकर पिराजी नाइक दहीगावकर याची सून याचा भ्रतार × × × सतत नाहीं.

१ आंबिकाबाई घोरपडे सखाराम घोरपडे कापसीकर याची स्त्री, राणोजी घोरपडे याची सून. त्यास संतत पुत्र नाहीं. कंन्या २.

१ पुणेकर सितोळे याचे घरी दिल्ही.
× × ×
१ हिरोजीराव पाटणकर यांस दिल्ही तीस पुत्र दोन. नांव बायजाबाई.

२

कन्या.

१ सगुणाबाई जाधव गोवेकर.
१ कुसाबाई ताकपीर चदावलीकर.
१ आनंदीबाई निंबाळकर.

३

[ ५ ]

पुत्राचा विस्तार.

१ तुकोजी सिंदे याची स्त्री लक्ष्मीबाई देवजी ताकपीर याची कन्या त्यास पुत्र [ ३ ] पाणीपतावर राहिले.

३ पुत्र.

१ केदारजी सिंदे यास स्त्रिया दोन याचा काल अ.वधात जाला.

१ आनदीबाई शाबाजी सुपेकर याची कंन्या.

१ साळूबाई. × × × हाली आउधात आहेत.

२

१ खलोजी सिंदे याची स्त्री गोडुबाई राघोजी आंगरे कुलाबेकर याची कंन्या. याचा काल आउधात जाला. संतत नाहीं.

१ आनंदराव सिंदे याची स्त्री मैनाबाई येसाजी आंगरे कुलाबेकर याची कंन्या [ यांस पुत्र दौलतराव शिंदे ]

३

१ आहिल्याबाई घोरपडे मालोजी राजे घोरपडे याची सून. गोविंदराव घोरपडे याची स्त्री. तीस पुत्र नारायण राव घोरपडे.

१ ठकाबाई सावताचे वाडींस दिल्ही. तीस कन्या आवसाबाई. निंबालकर याचे घरीं दिल्ही.

४

२ कंन्या.

१ आहिल्याबाई गोविंदराव घोरपडे याची स्त्री. त्यास पुत्र नाहीं. कंन्येचा वंश आहे.

१ लाडुबाई जाधव जीवनराव जाधव गोवेकर याची स्त्री. यास संतत आहे.

२

[५]

[१] जोतीबा सिंदे याची स्त्री सगुणाबाई काव्रहाज माडवगणकर भोपतराव देशमुख याची कंन्या. यास संतान नाहीं. बरवासागर येथें (अ)दंगा जाला.

[१] दत्ताजी सिंदे याची स्त्री भागिर्थीबाई गारखोजी भापकर याची कंन्या. याचा बुराडच्या घाटावर दिली जवल लढाईत पडले. त्यास पुत्र नाही. कन्या

[५]

[१] महादजी सिंदे याचा काल पुण्याचे मुकामी जाहाला. याचा विस्तार.

स्त्रिया.

१ अंनपुर्णा बाई जेसिंग घोरपडे याची कंन्या. त्यास कंन्या ठमाबाई होती.

१ भवानीबाई सिदोजी घाडगे याची कंन्या.

(अ) जयाजी प्रमाणेंच वरवासागर येथे जोतिबा शिंद्यास 'दगा' झाला असा क्षीरसागराचा संकेत दिसतो आणि दंतकथेचा ओघही तसाच आहे तो कदाचित् शक्यही असेल, नसेल असें म्हणवत नाही. कारण 'तुमचे [ जयाजी ] धाकटे बंधु जोतीबा शिंदे हे कस्बे [ वरवा ] सागर प्रांत वोंडसे येथें लडाईमध्यें वारले [ ठार जाले ] यास्तव कस्बे मजार कुल बाब कुल कानु दरोबस्त इनाम पुत्रपौत्रादिवंश परंपरेनें अनभवणें' [ ४ दिसंबर १७५२ ] ही पेशव्यांची सनद पाहून क्षीरसागरानें हें ठरविलें असावें असा तर्क करण्यास सबळ कारण आहे असो ते साधन प्रत्यक्ष उपलब्ध होत नाही तोपावेतो हा सनदी प्रकार ग्राह्य मानला पाहिजे अर्थात् जोतिबा वरवासागरच्याच ' लढाईत ठार झाले. ' इतिहासकाराची 'कुंभेरी ' खरी ठरत नाही किंवा सरदेसायाची ' झांशी ' संभवत नाहीं [ नाना पेशवे २५ ] जोतिबा १७४२ त वारले असें गृहित धरिलें तर पेशव्यांनीं फार उशीरां म्हणजे दहा वर्षांनंतर ' डोईकापणी ' बद्दल वरवासागर दिलें असें मानावयाचें कीं काय ? निदान शिंदेशाहीपुरती तरी अशी शंका घेण्यास जागा नाही असें शकावली सांगते [ पान ३, ४, ६ ].

धालाबाई कडेंकर देशमूख जानराव यास दिल्ही तिचे पोटी कन्या वायजाबाई देऊळगांवकर जाधव याचे घरी दिल्ही. बावाजी जाधव याची सून.

---

कंन्येचा विस्तार.

[१] जानकाबाई मोइटे तडवलेकर यास संतान नाहीं.

[१] जोगूबाई सांलोखे नेरलेकर यास पुत्र रघोजी सालोखे त्यास पुढे सतत आहे.

[१] येसूबाई सितोले पाटसकर याचा पुत्र म्हालोजी सितोले त्यास पुत्र

× ×

[१] मैनाबाई माने रहिमतपूरकर यास सतत नाही.

---

[४]

सदरहु आनवये.

१ पार्वतीबाई नरसिंग घाडगे याची वहीण. त्यास कन्या बालाबाई सितोले

१ भवानी बाई संगम [नेर] कर देशमुखाची.

१ गंगाबाई [हिंगे] पलवेकर जाधव याची कन्या

१ राधाबाई राउळाची कन्या पदमसिंग राऊळ याची वहीण.

१ लक्ष्मी बाई तुळजापूर [कर] भोपे कदम याची कन्या

१ सागिंधाबाई कडेंकर याची कन्या.

१ यमुनाबाई राऊळ याची कन्या. याचे वधू रामसिंग राऊळ दुंवडाईकर

---

९

कंन्येचा विस्तार.

१ सगुणाबाई जाधव गोवेकर याचा भ्रतार दहिरजी जाधव

६ पुत्र

१ येशवतराव जाधव पाणीपतावर राहिले त्याची बायको लोभाबाई हली आहे

१ जोतीबा जाधव.

१ आमरोबा जाधव.

१ बाजीबा जाधव.

१ जीवनराव जाधव.

१ नारायणराव जाधव खुरड्याचे लढाईत पडले. त्याची स्त्री जयाबाई जाधवीण.

---

६

१ कंन्या राजसबाई.

---

[७]

१ कुसाबाई ताकपीर चदोलीकर याचे पुत्र दहिरजी ताकपीर. यास संतत नाही.

१ आनंदीबाई निंबाळकर जगदेराव निंबालकर याची स्त्री. यास पुत्र नाही. कंन्या अंबिकाबाई कल्याणराव कवडे याची स्त्री. यास पुत्र तीघे.

---

[३]

सदरहू अन्वये.

---

[ वंशावलीच्या पाठीमागें खालील मजकूर क्षीरसागरानें लिहिलेला आहे ]

श्रीमंताचे [ पत प्रधान पेशवे ] येथून 'सरदारी' प्राप्त राणोजी सिंदे यांस [झाली.]

१२ राणोजी सिंदे पूर्वी पागे होते नंतर दया बहादर उजनचा सूभा बुडविला तेंव्हांपासून हिंदुस्थानचा सूभा वर्ष [1]बारा पर्यंत 'दौलत' केली.

---

[1] माळव्याच्या वाटणीबरोबर 'शिंदेशाही' अस्तित्वात आली असें जें सूत्र क्षीरसागरानें स्वीकारिलें आहे तें उपलब्ध साधनानुसार सयुक्तिक आहे पण त्या मानानें १२ चे जागी १३ वर्षे ७ मास पाहिजेत वाटणीचा 'सनदशीर' अमल कदाचित् '२२ जुलई १७३२' पासून झाला असेल [ पारसनीसकृत शकावली पान १ ] पण वाटणीतत्त्व तर त्यापूर्वींच ठरलेलें दिसते 'लिंगोजी माने याजबरोबर सरकारी शिके पाठविले आहेत तुमचे विचारास आल्यास मल्हारजी होळकर याजवळ देणें अगर तुम्हाजवळ ठेवणें ' [ २ दिसवर १७३१ ] या अनुरोधानें मराठेशाहीची 'मुतालकी' प्रथम जी सिंद्याकडे आली ती पुढें या राजघराण्याकडेच चिरस्थायी झाली. [ शकावली पान ४, ८, १६, २२, ३३ ] मुतालकीपासून १३ वर्षे ७ मास आणि वाटणीपासून १३ वर्षे येतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १५ | ‡जयाजी शिंदे यानी | ... | .. | . | वर्षे. |
| ७ | †दत्ताजी शिंदे यानी | .... | .. | ... | वर्षे. |
| १ | जनकोजी शिंदे यानी | ... | .. | . | वर्षे. |

२३ *महादजी शिंदे ता। वर्षे शके १७१५ प्रमादी नाम सवत्सरे सन अर्बा [तिसेन मया अलफ]

माधवराव नारायण मुख्य प्रधान याणी वरदहस्तेकरून यजमानास [दौलतराव शिंदे] वरे दिल्ही शके १७१५ फाल्गुन शुद्ध २ सोमवार [ ३ मार्च १७९४ ] आर्बा तिसेन [मया अलफ]

---

‡ जुलै १७४५ त जयाजी शिंदे गादीवर आले [ लेखांक ३७ ] आणि २५ जुलै १७५५ रोजीं त्याचा घात झाला [ लेखांक १८० ] या दृष्टीनें त्याची कारकीर्द १० वर्षांची ठरते

† 'गुमास्तगिरी व पेशगाई' चा सूक्ष्मभेद जाणणाऱ्या तसेंच मासादि वारीकसारीक माहिती देणाऱ्या क्षीरसागराकडून अशी चूक झाली कशी ? शिंदेशाहीच्या गादीवर दत्ताजी पाटील तर मुळींच आले नव्हते. जयाजीचें पश्चात् त्याचे औरस पुत्र जनकोजी शिंदे राज्यारूढ झाले आणि 'भाऊगर्दीत' राहिले [ १४ जनवरी १७६१ ] ही गोष्ट सर्वश्रुत होती त्याची कारकीर्द ५ वर्षे ५ मास २० दिवसाची झाली ते अल्पवयी असल्यामुळे राज्यकारभार दत्ताजी शिंद्यानी केला खरा पण तो पुतण्याच्या नावें चालवीत होते आपल्या नावें नव्हे केदारजी शिंद्याप्रमाणें त्याचा निराळा सिक्का चालला नाहीं [लेखांक २८७ ते २९५] उलट जयाजी शिंद्याचा जो सिक्का ते नेहेमीं वापरीत असत तोच त्यांनी कायम ठेविला होता [लेखांक २५४, २५५, २५६] 'ब्रह्मवाक्यो जनार्दन' असें म्हटलें तरी ७ वर्षांचा काल होत नाहीं. दत्ताजी बडाऊचे घाटावर १० जनवरी १७६० रोजीं लढाईत पडले [ लेखांक २२० ] त्यावेळीं सात वर्षे झाली होतीं असें मानिलें तर कारकीर्द १७५३ पासून मोजावी लागेल आणि जयाजी तर जुलै १७५५ पावेतों जिवंत होते तेव्हां सुसंगत जुळवणी व्हावी कशी ? असा ही संभव आहे कीं दत्ताजीनें जी भर 'दौलतीत' टाकिली त्यामुळे क्षीरसागरानें त्याना निराळें स्थान दिलें असावें. एरवी हें कोडें उलगडत नाहीं

* जनकोजी शिंद्याचें नावें 'उत्तरपानिपतीय' कारभाराचा प्रकार [ लेखांक २२३ ते २५३ ] तसेंच केदारजी शिंद्याचा पत्रव्यवहार पहाता ही मर्यादा वाढविली असावी असा भास होतो [ लेखांक २७३ ते २९५] पण विचारांतीं असें कळतें की जनकोजींच्या नावानें पत्रव्यवहार करणारी व्यक्ति कोणी दुसरी तिसरी नसून खुद्द महादजी शिंदेच होते ज्यास्त पत्रावर त्यांचेंच हस्ताक्षर मिळतें आणि भाऊगर्दीनंतर त्यांनी जो सिक्का स्वीकारिला आहे तोच विशेषत या 'उत्तरपानिपतीय' पत्रावर सांपडतो तेव्हां जनकोजींच्या नावासंबंधीं अशारीतीनें उलगडा होतो राहिले केदारजी तर त्याचा निराळा सिक्का तयार झाला होता [ २४ मे १७६७ ] आणि कांहीं महिन्याकरिताच का होईना पण तो चालला एवढें अगदीं निर्विवाद आहे [२५ सितंबर १७६७] असें जर आहे तर अर्थात् ते शिंदेशाहीच्या गादीवर आले आणि त्या पूर्वी जो अवधी लोटला तो सुद्धा केदारजी शिंद्याच्याच

## पेशवाईची वहिवट.

१३ बाळाजी विश्वनाथ [भट] शाहू महाराज यांजपासी येऊन वस्त्रे घेतली

शके १६३१

| | | | |
|---|---|---|---|
| १० | *गुमास्तगिरी रुजू मुतालकी पिंगळे याची केली | .... | वर्षे. |
| ३ | पेशवाईची वस्त्रे जाली | .... | वर्षे. |
| १८ | †बाजीराव बल्लाल .... .... | .... | वर्षे. |

कारकीर्दीत मोजावयास पाहिजे व क्षीरसागर या जागीं सपशेल चुकला असें स्पष्ट दिसतें. ही विचारसरणी जितकी सरळ व सोपी दिसते तितकी सुसंगत नाही. नुसत्या सिक्क्यावरूनच निष्कर्ष काढावयाचा असला तर महादजीच्या सिक्क्याचाही विचार करणे भाग येतें व त्या दृष्टीनें पाहूं जाता केदारजीप्रमाणे महादजीचा सुद्धा स्वतंत्र सिक्का तयार झाला होता [ १० जून १७६७ ] किंवहुना दोघाचे सिक्के एकाच समयीं तयार झाले असें म्हणावे लागतें आणि केदारजी गादीवर आले असें सिक्क्यावरून सिद्ध होत नाहीं. उलट पक्षीं महादजीचा स्वतंत्र सिक्का केदारजीच्यापूर्वी तयार झाला होता असा पुरावा मिळतो त्यावरून गादीवर प्रथम कोण आले असावेत या विषयीं काय तर्क करावा वरें ? आणि हाच कटाक्ष क्षीरसागराचा आहे व तो विचारणीय आहे असें मान्य करावे लागेल असो. पानिपतचे युद्धामुळें शिंदेशाही 'मोडीस आली' होती. [ खरे भाग ३ लेखांक ५९३ ] राजघराण्यातील व्यक्तींत परस्पर एकवाक्यता नसल्यामुळे गादीविषयीं वाद वरीच वर्षे रेंगाळत राहिला, शेवटी सर्व भानगडी शात करून महादजी 'दौलतीवर' आले त्यास अनुलक्षून ही मर्यादा ठरविली असावी असे दिसते तारीख जागीरदारानच्या कर्त्यानें राणोजीनंतर महादजी शिंदानां एचिसनच्या आधारावर [ Treaties vol iv page 11. ] गादीवर बसवून जयाजी व जनकोजी शिंदे या उभयतास जो अजिबात फाटा दिला आहे [ तारीख जागीरदारान तमहीद ३० ] त्यापेक्षा ही कालगणना फार मर्यादशील म्हणावी लागते

* 'या गुमास्तगिरीचा' उल्लेख कोठें सांपडत नाहीं 'बाळाजी विश्वनाथ [ भट ] यास शाहूनें मुख्य प्रधानकी किंवा पेशवाई दिली' [ १६ नवंबर १७१३ ] असें राजवाड्यानीं देखील संदिग्धच ठेविलें आहे प्रधानपद व पेशवाई दोन भिन्न पदव्या समजून सहा महिन्याच्या अंतरानें त्या बाजीरावांना मिळाल्याबद्दल राजवाडे स्वत सागतात [ ऐप्र १३०, १३२ ] आणि त्यापूर्वी ते 'सेनाकर्ते' होते असें म्हटलें आहे [ऐप्र १२९] बाळाजी पेशवे २ अप्रेल १७२० रोजी वारले [ ऐप्र १३१ ].

† प्रधानपद '१७ अप्रेल १७२०' रोजीं आणि 'पेशवाई' नवंबर १७२०चे सुमारें बाजीरावास मिळाली [ राजवाडे ऐप्र १३२ ] ते २८ अप्रेल १७४० रोजी निवर्तले या मानानें कारकीर्द २० वर्षांची येते.

१२ ‡बाळाजी बाजीराव .... .... .... वर्षे.

§माधवराव बल्लाल .... .... .... वर्षे.

††नारायणराव बल्लाल माहे ९ .... .... .... वर्षे.

रघुनाथ बाजीराव माहे ६ ... .... . . वर्षे.

२२ ‡‡माधवराव नारायण ... .... .... वर्षे.

*चिमणाजी माधवराव अजमासे मास ६ .... ... वर्षे.

†बाजीराव रघुनाथ यास वस्ते शके १७१८ चे मार्गसीर्षांत [ शुद्ध ६ सोमवार. ५ दिसंबर १७९६ ] वस्ते जहाली सन समान [?] तिसेन [ मया आलफ ]

---

‡ पेशवाईचीं वस्त्रे २५ जून १७४० त मिळालीं आणि २३ जून १७६१ रोजीं नानासाहेब मृत्यु पावले. [ सरदेसाई ७,२०८ ] या दृष्टीनें २१ वर्षें होतात.

§ ' बाळाजी बाजीराव याच्या मरणानंतर चौविसाव्या दिवसीच [ २० जूलई १७६१ ] पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं आणि कार्तिक वद्य अष्टमीस [१८ नवंबर १७७२] श्रीमंताचें देहावसान झालें ' [खरेकृत मराठी राज्याचा उत्तरार्ध खंड १ पान ३, २५२]

†† ' मार्गशीर्ष वद्य चतुर्थी रविवार ' [ १४ दिसंबर १७७२ ] पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं आणि ३० अगष्ट १७७३ रोजी 'ध' चा 'मा' झाला [खरेकृत मराठी राज्याचा उत्तरार्ध पान २५४, २६६]

‡‡ सवाई माधवराव याचा जन्म १८ अप्रेल १७७४ रोजीं होऊन [ खरे भाग ४ पान २०२६ ] २७ अक्टूबर १७९५ त वारले [ पेशवाईची अखेर पान १ ]

* वैशाख वद्य ४ बुधवार [ २५ मे १७९६ ] रोजीं चिमाजी आप्पा याचे दत्तविधान जाहालें [ पेशवाईची अखेर पान १० ]

† सवाई बाजीरावानी पेशवाईचीं वस्त्रे मार्गशीर्ष शुद्ध ६ सोमवारीं [ ५ दिसंबर १७९६ ] घेतलीं [ पेशवाईची अखेर पृष्ठ १६ ]



श्री जोतिबा शिंदे यांची छत्री, कस्बे बरवासागर, परगणे व जिल्हे झांशी.

श्री



हे शिंद्यांचे मूळ राजचिन्ह होय सन १८८४ च्या Postal Convention पासून ते बहुधा सर्वांच्या परिचयाचे झालें [ Selections Records, Postal pages 10, 12, 13, 19, 20 ] पण ते कोणीं कधी व कसें धारण केलें याविषयी लेखी आधार उपलब्ध नाही शिंद्याच्या दौलतीबरोबर राणोजीपासून त्याचा उगम झाला अशी सर्वसाधारण समजूत आहे व ती निराधार आहे असे दिसत नाही तत्संबंधी पुरावा तूर्त पुढे येत नसला तरी पानिपतापासून सुसंगत सुगावा मात्र लागतो तो असा कीं 'जरीपटका' म्हणून जो मुख्यध्वज शिंद्याचा आहे [भाऊबखर पान १८, ४३, ७५, ७७ ते ८३ ] त्याचे मध्यभागी हे ' शेषचिन्ह ' असल्यामुळे सैन्यातील सर्व निशाणावर तें साहजिकच आरूढ झाले जरीपटका पानिपतच्या वेळी गेल्याची दंतकथा आहे ती कदाचित् खरी असली तर त्याबरोबर जुने चिन्ह गेलें असेल पण तदोत्तर जो जरीपटका निर्माण झाला त्यात धारण केलेलें हें चिन्ह आज मितीसही पहावयास मिळते

॥ पुढे **नागाचें निशाण** फडके, फिरंग्याची लोळ । निघाला दौलतराव बाळ ॥

असे खर्ड्याच्या एका अप्रकाशित पोवाड्याचें कडवें आहे तसेच

॥ **जोतिबा** देव आहे प्रसन्न ज्याला वडिलावडिली पासून ॥
॥ वंशाचा नक्षा एक सारखा हा काल पहिल्यापासून ॥
॥ **नागांची निशाणे** हत्तीवर लाउन जरीपटका वर करून ॥

असे वर्णन परशुराम कवीनें दिले आहे [ एतिहासिक पोवाडे पान २६१ ] 'ढाल, निशाण व जरीपटका' म्हणून बखरकार जी नावे देतो ती एकच वस्तुविशेष असून तोच जरीपटका नातूंचा होय असें ग्रहित धरलें [ पान १२ ] तर शिंदेशाहीच्या उदयापासून त्याचा प्रचार झाला असा जो सार्वत्रिक भावार्थ आहे तो बहुतेक खरा आहे बखरकाराने कित्येक शूरवीराच्या शौर्याचा उल्लेख न करिता 'जवाहरगज' या हत्तीचें जें आवडंबर माजविलें आहे त्यात कांहीं तरी गूढ असलें पाहिजे [ पान ७९, १२१ ] युद्धात शेंकडों हत्ती आले व गेले असतील मग याचीच तेवढी महती कोणती ? याचें जरी स्पष्टीकरण केलेलें नाही तरी निशाणाशीं या हत्तीचा काहीं संबंध असावा असें तानाजी खराडे याचे शब्दावरून अनुमान निघते एरवीं ' कुंजपुऱ्याचे ' लढाईत ' जवाहरगज ' परत आल्याचे आनंदोद्गाराचे रहस्य ते काय असूं शकतें ! [ हत्तीबरोबर ] निशाण गेले अशी जी दंतकथा आहे ती खरी नव्हे कारण

निशाणासबंधीं बखरकार चकार शब्द काढीत नाही [ पान ८२ ] दत्ताजी शिंद्यांचे स्वारीचा 'लालमणी' घोडा घेऊन येण्यास जे वीर चुकले नाहीत त्यानीं निशाण जाऊं दिलें असेल हें तरी कसें संभवतें ? निशाणाबरोबर [ माहीमरातब, लग्गी सिवाय ] नगारा व घटकाही चालत होती त्यापैकीं कोणाशी तरी या ' जवाहर गजाचा ' संबंध संभवनीय आहे [ बखर पान १८, ५४, ५६, ५७, ७६, ७९ ] फार तर असें म्हणता येईल कीं निशाणाशी संबंध ठेवणारा हा जो हत्ती गेला तो शिंद्यानींच कुंजपुऱ्यास परत मिळविला. याविषयीं शिंद्यास आनंदाचा उमाळा येणें अगदी साहजिक होतें व तो मनोत्साह बखरकारानें वर्णिलेला आहे या जवाहरगजासबंधी चितो कृष्णाचें पत्र [ ७ नवंबर १७६० ] पुढें येणार आहे हा नागाचा विचार झाला सूर्याविषयीं ' अलामत सिंदिया ' पलीकडे संदर्भ लागत नाही मग हा शेषवेष्टित सूर्य आला कधी ? जनकोजी, [ लेखांक २२८ ते २५१ ] केदारजी [ लेखांक २७३ ते २९५ ] व महादजी शिंद्याच्या मुद्रात ' चंद्र, सूर्य ' आले आहेत अर्थात् पानिपत काळीं याचा प्रचार होता इतकें निश्चित होतें पण हा सुंदर शेषसूर्य संगम झाला कधी हे सागणे तूर्त कठिण आहे रत्नागिरी येथील ' श्रीजोतीबा ' हे शिंद्याचे कुल दैवत आहे ज्या देवाऱ्यात मूर्ती विराजमान आहे तिचे पाठीमागील कमानीचे मध्य भागी सूर्याच्या शिरावर प्रामुख्यानें ' शेषचिन्ह ' कोरलेलें आहे ते नवें किंवा जुनें आहे हें सागवत नाही त्यावरून असें अनुमान निघूं पहाते कीं शिंद्यानीं 'राजमुद्रा व राजचिन्ह' धारण करते वेळीं 'श्रीजोति स्वरुप' म्हणजे ' जोतिबा ' अर्थात ' सूर्य ' असा शाब्दिक व शास्त्रोक्त अर्थ घेऊन त्याच्याशीं शेषाचा संबंध जुळविला असावा

' नागवंशतिलक भोगावतीपुरवराधीश्वर ' या ' शिलालेखा [ तील शब्दा ] वरुन नागवंशाची कल्पना निघालेली असावी नागवंशात मुख्य कुल शिंद्याचे आहे हें प्राचीन काळापासून लढवाई मराठे म्हणून प्रसिद्ध आहे. शिंदे हा 'शेंद्रकाचा' प्राकृत उच्चार आहे बादामीच्या पूर्वचालुक्याच्या वेळेस ते 'सेंद्रक' म्हणून प्रसिद्ध होतें कर्नाटकचे शिंदे आणि कऱ्हाडचे शिंदे अशा दोन शाखाचे शिलालेख उपलब्ध आहेत या लेखात वशाला नाव देणारा मूळपुरूष शिंद सागितला असून त्याची उत्पत्ति भिन्न रीतीने सागितली आहे नावावरुन किंवा ध्वजावरुन काल्पनिक उत्पत्तिकथा भाट बनवीत असतात हें प्रसिद्ध आहे शिंद्याचे मुद्रेंत साप आणि कुळाचें नाव शिंदे तेव्हा मूळ पुरुष [ अहिछत्रात ] नागापासून किंवा सिंधु नदीजवळ शिवापासून उत्पन्न झाला असें भाटानी ठरविलें या दोन्ही कथाचा ऐतिहासिक रीतीने मेळ घालता असें म्हणता येते की अहिछत्राजवळच्या देशातून शिंदे हे उत्तरेकडून आलेले आर्य क्षत्रीय आहेत किंबहुना शिंद्याचे मुद्रेत नागाबरोबर सूर्य दाखविला जातो तेव्हा हे मूळचे सूर्यवंशी क्षत्रीय असावे असें अनुमान निघू शकते,' असे विद्वद्वर्य चितामणराव विनायक वैद्य सागतात [ मराठ्याचें क्षत्रियत्व पान ८, ९, १०, ११ ] या लेखात फार मार्मिक विचार प्रगट केले असून वैद्यानी शिंद्याचे प्राचीनत्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे त्यासंबंधी जो लेखी आधार थोडा उपलब्ध आहे तो पुढें पूर्ववाटणीच्या भागात देण्याचे ठरविले आहे.

——ॐ——

ॐ



# शिंदेशाही इतिहासाचीं साधनें

## भाग १ ला.

—०:०—

## श्रीमंत राणोजी शिंदे

## यांचा असल पत्रव्यवहार.

१७९९–१८०२ विक्रमी.

———

लेखांक [ १ ] श्री * संवत् १७९० पौष शुद्ध १

[ २६ दिसंबर १७३३ ]

नकल

राजश्री राघो विठल कादार प्रो राजगड[1] गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे[2] दंडवत सुमा आर्बा

---

(१) [ राजगड ] हें लहानसें संस्थान माळवा प्रांतांत आहे आणि तेथील [ ऊमत ] रजपूत राजे शिंद्याचे मांडलिक असून वार्षिक खंडणी देत असतात एचिसन् म्हणतो [ Treaties vol iv page 279] त्याप्रमाणें १७७० पासून हा संबंध नसून वाटणीपासून तो चालत आला आहे. [ शकावली पान २ ]

(२) राणोजी शिंद्याचा संबंध पेशव्यांपैकी प्रथम कोणाशी कसा व केव्हां आला याविषयीं बराच मतभेद आहे म्हणून बखर व इतिहासकारापैकी कोणाचाच आश्रय न करितां निराळाच पण विश्वसनीय असा आधार पाहूं 'आमची विशात काय होती? प्रथम राणोजीबावांस [ बारगिरीपासून ] खिजमतगारी सांगितली नंतर कृपा करून पागा दिली. तेथून या पदवीस आणिलें कीं आम्ही

सज्ञासीन मया आलफ. प्रो मजकूरची फडनिसी साल मारी रो गोविंद[३] विश्वनाथ यासी सांगितली असे. तरी याचे हाते फडनिसीचे प्रयोजन घेत जावें. जाणिजे छ * २९ रजब हे विनती. मोर्तब.

---

लेखांक [ २ ] श्री * संवत् १७९९ कार्तिक वद्य ३०

[ १६ नवंबर १७४२ ]




राजेश्री बाळाजी[४] येशवंत पो कोटे[५] गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दडवत. सुमा

---

बादशाहाची स्थापना केली. श्रीमंताचे सेवक होउन बादशाहा स्थापिले आता आम्ही बादशाहीपदाची इच्छा का करावी' ? [ पारसनीसकृत ऐतिहासिक पत्रव्यवहार भाग ५ लेखाक ५९, ९३ ] अशी त्रोटक पण अत्यंत स्पष्ट व सरळ शब्दांत महादजी शिंदे जर आपल्या पितृदेवाची उत्कर्षपरपरा देतात तर अन्य साधनाची आवश्यकताच कोठें रहाते ? त्यानी तिथि सवत्सर दिला नाहीं येवढीच काय ती उणीव भासते ती तूर्त जरी भरून निघत नसली तरी उत्कर्षपररेचा उगम नि सशय ठरल्यासारखा आहे 'तुमचा अभिमान ईश्वरास आहे आणि मजवर ईश्वरीकृपा आहे तोवर साहित्यास कधी चुकणार नाहीं. तीं पिढ्यांचे एकनिष्ट सेवक कामाचे असता तुमचा अभिमान नसावा । हे कधींही या घरात घडणार नाहीं.' [ सरदेसाईकृत नाना सो पेशवे १४४ ] या पत्रातील 'तीं पिढ्याचा' उच्चार मननीय आहे त्यावरून बाळाजी विश्वनाथ पेशवे याच्याशीं प्रथम संबंध आला किंबहुना पागेदारीपर्यंत मजल 'पहिल्या पेशव्याच्या' वेळींच पोहोंचली होती असें साधार सिद्ध होतें 'सरदारी आणि वांटणी' थोरल्या बाजीराव पेशव्यानीं दिली. [ शकावली पान १ ] एका क्षणार्धांत 'बाघ्याचा पाग्या' किंवा 'चत्री वारणाऱ्याचा पागेदार बनला' [ नातूकृत महादजी पान १२ ] अशातला प्रकार नसून सतत श्रम, साहस करून राणोजी शिंद्यानी स्वपराक्रमाने राज्य संपादन केलें बखरकाराची व इतिहासकाराची एका विवक्षित कारणामुळें जी दिशाभूल झाली आहे तिची सुसंगत सागड घालता येते पण स्थलसंकोचास्तव तसें येथें करिता येत नाहीं

(३) याचें उपनाम मुद्गल. हें महाराष्ट्रीय घराणें शिंदेशाहींतील माडलिक राजे राजगडवाले [ प्रांत माळवा ] याच्या पदरीं वरील सनदेच्या आधारें कायम आहे

(४) हेच बाळाजी यशवंत उपनाम गुलगुलें कोटा येथील शिंदे सरकारचे पहिले वकील होते हे सारस्वत [ ऋग्वेदीय वत्सगोत्रीय शाकलशाखीय ब्राम्हण ] घराणें, मौजे अचरे, तालुके मालवण, जिला रत्नागिरी [ कोकण ] येथील मूळचे रहिवाशी असून कारणपरत्वें मौजे भडगाव [ प्रात खानदेश ] येथें सुखवस्तीस येऊन राहिले. आणि तेथें घरवाडा, जमीन, शेते मिळकत मिळविली असें

सलास अर्बैन मया व अलफ. खरिदी घोडे २ गुा उदेराम खवास किाा रुपये १००० येक

कागदपत्रावरून समजतें पण प्रथमत बाळाजी किंवा त्याचे वडील यशवंतराव यांपैकीं कोणाचा शिंदेशाहीशीं केव्हां व कसा संबंध जुळला याविषयी जरी प्रत्यक्ष लेखी आधार तूर्त मिळत नमला तथापि 'कोटेकर' हें नामाभिधान १७४२ त प्राप्त होण्यास तसलाच कांहीं तरी पूर्वपरिचय व संबंध असला पाहिजे ही गोष्ट निश्चित आहे [ लेखांक ३ ] आणि त्या दृष्टीनें प्रस्तुत सामुग्रीची चाळणी केली असतां असें दिसून येतें की सन १७३२ चे सालीं जी पहिली वांटणी श्रीमंत पेशवे, शिंदे, होळकर व पवार यां मध्यें झाली त्या वेळी संस्थान कोट्याकडून जी खंडणी व जो मुलूक शिंदे सरकारच्या विभागास आला त्याची 'फडनीसी' प्रथम बाळाजी गुलगुले याने संपादन केली असावी [ लेखांक १०२ ] ही सेवा उत्कृष्ट रीतीनें करून आपल्या बुद्धिमत्तेची प्रचिती देऊन त्याने पुढें या प्रांताची 'कमाविस' मिळविली ही कामगिरी करीत असतां त्यास आपले अगची मुत्सद्दीगिरी दाखविण्याची अमोल संधी १७३७ चे साली प्राप्त झाली तेव्हांपासूनच या घराण्याचा खरा भाग्योदय झाला असा विश्वसनीय आधार आहे छत्रपति श्री शिव-रायाच्या पश्चात् स्वराज्यसूर्यास औरंगजेबरूपी खग्रास ग्रहण लागलें त्यापासून सुटका करून घेण्याचा जो निर्धार मराठ्यानी केला आणि तत्सिध्यर्थ ज्या अनेक क्लिप्त्या लढविल्या त्यांत 'माळव्यात मोहीम करून मोगलांस नामोहरम करण्याची' युक्ति प्रधान होती या युक्तिरूपी बीजमंत्राचा प्रयोग १६९८ सालीं होऊन जी ' मराठमोळ्याची लाट ' उसळली तिचा प्रवाह मोगलांस मर्यादित करिता आला नाहीं ' खरडोनी रंग हिरवा, भरलाचि रंग भगवा' अशी परिस्थिति उद्भवली तेव्हा १७३७ चे साली तिचा प्रतिकार करण्याची प्रतिज्ञा करून 'निजामुल्मुल्क समागमे सवाईचा पुत्र, रोहिले, बुंधेले, जाट, अहीर, खींची, नरवर, वोडसेकर, दतियेकर आदि रजवाड्यांच्या फौजा व तोफखाना घेऊन सिरोजेंवर उतरला [ ब्रम्हेंद्र लेखाक ३३, ३५ ] त्यास कोट्याचा राजा [ दुर्जनसाल ] २० हजार फौज [ घेऊन मदतीस ] येणार होता' [ ब्रम्हेंद्र लेखांक १३४ ] पण मध्येच 'शिंदे होळकर व पवार यानीं' त्याचे वाटेंतील 'मोगल [ सुभेदार ] शाजापुरकर बुडविला' व ते लगेच श्रीमंत बाजीराव पेशवे यास जाऊन मिळाले व 'भोपाळचे' सुप्रसिद्ध लढाईत 'निजामुल्मुलकाचें गर्वहरण केलें ' हा 'तमाशा' पाहून कोटेकर महाराव दुर्जनसालजी यांनी मदतीचा विचार लावणीवर टाकून मराठ्यांशी 'तह' केला [ ब्रम्हेंद्र १३६ ] त्या कामी बाळाजी फडणीस याने महारावाजवळ राहून आपले चातुर्य व मुत्सद्दीगिरी खर्च करून अशा आणीबाणीच्या प्रसंगीं कोटेकरास मोगलपक्षास जाऊं दिले नाहीं आणि त्यांचे मराठ्यांशी मित्रत्वाचें नातें जुळवून दिलें व उभयपक्षी संतोषकारक असा तहही करून देवविला. या प्रशंसनीय कामगिरीबद्दल महारावानी बाळाजी फडणीसास ७०० बीघे जमीनीचा 'चक उदक' [ इनाम ] दिला, व ही देणगी म्हणजे 'मोजे विराखेडी पो॥ उरमाला हा गाव महाराव यानीं तुम्हांस दिला तेणे प्रो॥ करार केला आहे. मौजे मजकूरी दुसरियाचा तालुक नसे तुम्ही किर्द करून वसूल घेत जाणें. वरकड कमाविसदारास त्या गांवासी संबंध नाहीं' बाजीराव पेशवे यानी कायम ठेविली [ २४ फरवरी १७३८ ] व शिंदे सरकारांतून 'वकीली' मिळाली. तेव्हापासून हें महाराष्ट्रीय घराणे कोट्यास कायमचे राहूं लागलें, आणि तेव्हा पासूनच हा 'वकीलाती [पत्रादि] संग्रह' सुसंगत साठू लागला. वरील सनदेवरून गुलगुल्यास पेशव्यांनी प्रस्थापित केलें अशी शंका घेण्याचे कारण नाहीं स्वत बाळाजीच शिंद्यास 'धणी' म्हणून संबोधितात [लेखांक १९] व रघुनाथराव दादा तर बाळाजीस' निस्वत जयाजी शिंदे' असे स्पष्टच म्हणतात [१४ जून १७५४] आणि बाळाजी पेशवे व सदाशिवराव भाऊ या उभयतांस हे सर्वस्वी मान्य आहे. 'फडनीसी, कमाविस व वकीली' खेरीज

हजार पागेस[७] घेतले असेत. सदरहूचे रुपये प्रा मा[र] पैकी देणे. घोडे पागेस जमा असेत. जाणिजे रा छ * २९ रमजान. बहुत काय लिहिणे हे विनती.

श्री मोर्तब सुद

---

अनेक उत्तमोत्तम कार्ये करून 'हाथी, घोडा, पालखीसह सरदारी,' शिंदेशाहीत संपादन केली. [ लेखाक १८६ ] आणि जो 'भाईचारा' महाराव व मराठ्याशीं करून देवविला तो सुरक्षित ठेऊन उभयपक्षाचें कल्याणार्थ अत्यंत श्रम करून हें नातें सतत ९० वर्षे कायम राखून या घराण्याने इतिहासात आपलें नाव अजरामर करून ठेविलें यात तिळमात्र संशय नाही शिंदेशाहीतील ऐतिहासिक घराण्यापैकीं हे एक जुने घराणें असून ईश्वरकृपेनें आज मितीस चागल्या स्थितींत कायम आहे याजबद्दल खरोखर धन्यता वाटते शिंदेशाहीशीं आता जरी प्रत्यक्ष संबंध राहिला नसला तरी या घराण्याचा शिंदेशाही विषयीं अभिमान व भक्ति तिळभरही कमी झाली नसून आपल्या प्रतापशाली पूर्वजाप्रमाणें श्रीमंत सरदार पुरुषोत्तमराव गुळगुळे याचे ठायीं ती पूर्णपणें वसत आहे हें प्रत्यक्ष अनुभवानें मला सागता येतें त्या निस्सीम भक्तीभावाचाच हा प्रभाव आहे कीं प्रत्येक 'चिटोरें' जपून सुरक्षित ठेविल्यामुळें आज शिंदेशाहीच्या इतिहासावर हा प्रकाश पडत आहे हे त्याचे उपकार संस्मरणीय होत

(५) कोटा राजपूतान्यातील हे राज्य प्रख्यात आहे मुख्य गादी बूंदीसह याचा संबंध वाटणीपासून शिंदेशाहीशीं झाला [ शकावली २ ] तेव्हापासून तेथील सर्व सूत्रें नेहमीं शिंद्याच्या हातीं राहिली असें पुढील पत्रव्यवहारावरून कळते. मराठ्याशी कोठेकराच्या संबंधाचें जें साल '१७३९' टाडने दिलें आहे [ Rajasthan vol. ii page 414 ] तें विश्वसनीय नाहीं असें पारसनीसाने दाखविलें आहे [ ब्रम्हेंद्र लेखाक १३६ ] तें शकावलीच्या मानाने आणखी मागें घ्यावे लागेल हा प्रकार ' अमझेरा खीलचीपूर, चंदेरी, दतिया, बूंदी, राजगड, सीतामहु व सोपार' या सर्वाला लागू होईल

(६) उदेराम खवास यास 'दाभाई' असेंही म्हटलेलें आहे राजपूतात दाईच्या मुलास दाभाई म्हणतात 'खवास' या अरबी शब्दाचा अर्थ 'मानकरी, मंत्री व शागिर्द' असा आहे या वरूनच मराठीत 'खवासीवाले' हें नाव आलें रथ, हौदा किंवा अबारीत राजासन्निध बसणारा मानकरी किंवा मंत्री तो 'खवासीवाला' [ फार्शीकोश पान ४४ ] 'खवास' म्हणजे न्हावी असाही अर्थ राजपूत लोकात प्रचलित आहे पण या ठिकाणीं तो प्रशस्त नाही मंत्री हाच अर्थ येथे घेतला पाहिजे राजपूत शासन-पद्धतींत 'खवास' ही एक प्रकारची पदवी आहे आणि त्या अर्थाच उदेरामाचा अन्यत्र उल्लेख आलेला आहे [ १८ अगस्ट १७३७ ] दाभाई या नावाचीं घराणी कोट्यात आहेत पण उदेरामाचा उलगडा कोणी करीत नाहीत

(७) ज्या शिंदेशाहीत शिलेदारीचा कळस झाला तत्संबंधीच संग्रहात हे पहिलें पत्र मिळावे हा एक प्रकारें सुयोग नव्हे काय? अस्तु सरकारी पागेत घोडी विकत घेताना किमत त्या वेळी काय द्यावी लागत होती याची कल्पना करिता येते.

लेखांक [ ३ ] श्री शंकर[८] * संवत् १७९९ मार्गशीर्ष शुद्ध ६
[ २२ नवंबर १७४२ ]

जमा पोते गुा बाळाजी येसवंत 'कोटेकर'[१] सुमा सलास अर्बेन मया अलफ. मा देराजखान रुपये १४० येकसे चाळीस रुपये जमा जाले. छ * ५ सवाल.

वार.

---

(८) 'श्रीशंकरा' चा नामोच्चार या पावती खेरीज सिक्केमोहरी पत्रावर कोठे आढळत नाहीं. राजघराण्यातील व्यक्तींनी आपापले सिक्क्यांत हें स्मरण कायमचेंच धारण केलें असल्यामुळें तें सहाजिकच निराळें निदर्शनांत येत नाहीं व तें सयुक्तिकही आहे आणि हाच प्रकार महादजी शिंद्यांच्या शेवटपर्यंत पहावयास मिळतो हिंदी पत्रव्यवहारांत ही मर्यादा जरी कायम राहिली नाही तरी मराठी पत्रव्यवहारांत ती बहुतेक अबाधित चालली होती. साबाजी पाटील शिंद्यानें असा नामोच्चार केला आहे खरा [ लेखांक २६२ ] पण तो 'शिवाचा' नसून - 'नाथाचा' आहे. तसेंच मोगल बादशाहाशी केलेल्या तहनाम्याच्या नकलेत 'महादेवाचा' उल्लेख आला आहे [ राजवाडे खंड १ लेखांक १ ] पण त्यांचा संबंध कोणाशी समजावा हे स्पष्ट कळत नाही नकलेंतील क्रमानुसार 'महादेव' होळकरांचें व 'खंडोबा' शिंद्यांचे कुलदैवत ठरूं पहाते पण होळकराचे कुलदैवत 'खंडोबा' असल्याचे सर्वतोमुखीं आहे म्हणून वरील प्रकार थोडा विसंगत वाटतो तहनाम्यासारख्या महत्वाच्या नकलेत हस्तदोष होणे संभवनीय आहे असें मानिलें तर 'महादेवाचा' कदाचित् शिंद्याशी संबंध येऊं शकेल. पण अन्य सबळ पुरावा पुढें येईपर्यंत ही भालेराई कामाची नव्हे, तथापि 'जोतिबाप्रमाणे खंडोबाही शिवाचेच रूपांतर समजण्याचा सांप्रदाय असला' तर मग कांही वादच उरत नाहीं [ भागवतशास्त्रीकृत मराठ्यांसंबंधी उद्गार पान १३, १४ ] आणि 'नाथपंथ'हा शैव सांप्रदाय आहे हें सर्वश्रुत आहेच. त्याप्रमाणे शिंदे मूळचे शैव सांप्रदायी असोत किंवा नसोत पण रत्नागिरीच्या **'जोतिबाच्या उपासनेची'** कारणमीमांसा मात्र तसें स्पष्ट दर्शविते ही गोष्ट विचारणीय आहे 'श्रीशंकर' किंवा 'श्रीनाथ' हा प्रयोग महादेवाचा द्योतक आहे त्या अर्थीं 'श्रीनाथ सहाय' च्या जागी 'श्रीनाथ साहब' करून त्याचा श्रीमनसूरशाहाशी बादरायण संबंध जोडणें शुद्ध अज्ञान होय मनसूरशाह गुरु होते म्हणून महादजी शिंदे मोठ्या भक्तीभावानें त्यांची पुण्यतिथी [उरुस] साजरी करीत असत याविषयी मतभेद नाही [ पारसनीसकृत पत्रव्यवहार भाग ३ लेखांक ३ ] पण त्या पूर्वी त्यांचा संबंध आलेला नाही 'श्रीनाथ' म्हणजे 'श्रीमनसूरशाह' असा जो सांप्रत अर्थ प्रचारात आला आहे त्यात काही तथ्यांश असलाच तर त्याचा संबंध साबाजी पाटिलापलीकडे मुळींच जात नाही. ही धार्मिक दृष्टि झाली पण याचें ऐतिहासिक स्वरूप अगदी भिन्न आहे, तें पुढे समजणार आहेच तथापि साराश येथे दिला असता अप्रयोजक होणार नाही. बायजाबाईच्या विवाहानंतर घाडग्यांचें वर्चस्व झालें त्यावेळीं हा एक नवीन दरख त्याचे सोईसाठी निर्माण झाला, 'पेशजी वानवडीचे मुकामी ऐनजमेवर दर सदे १ रूपया प्रमाणे **नाथाचा** दरख ठराउन देउन महालवार सनदा दिल्या' गेल्या त्याप्रमाणें सरकारी पत्रावर घाडगे 'श्रीनाथ' करु लागले पुढे त्याचें रूपातर होत गेलें त्याच्याशी सध्या प्रयोजन नाही पण वरील विवेचनावरून 'श्रीनाथास' प्रामुख्य मिळाले त्या वेळी मूळ कल्पना शुद्ध धार्मिक होती किंवा तिचा मनसूरशाहाशी संबंध संभवनीय होता असें मात्र म्हणता येणार नाही.

लेखांक [ ४ ] श्री * संवत् १७९९ मार्गशीर्ष शुद्ध ८
[ २४ नवंबर १७४२ ]

राजश्री बाळाजी येशवंत पो कोटे गोसावी यांसि

स्नो राणोजी सिंदे दंडवत सुमा सलास [ अर्बैन ] खरिदी घोडे गुा नाथूराम कोटेकर [ ? ] जमा पागा निस्वत सा[ा]जी[10] सिंदे रास २.

१८० घोडा आमरी नीला.

२५ तट्टू.

२०५

यो दोनसे पांच देविले असेत. [तरी] कब्ज घेउन देणे. जाणिजे रा छ * ७ सवाल. हे विनती. (श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [ ५ ] श्री * संवत् १७९९ मार्गशीर्ष वद्य ८
[ ८ दिसंबर १७४२ ]

राजश्री बाळाजी येशवत का प्रांत कोटे गोसावी यांसि

स्नो राणोजी सिदे दडवत सुमा सलास [ अर्बैन ] बा देणे खा [ खरिदी ]

---

(९) इतर महाराष्ट्रीय नावावरोबर असा संबंधसूचक शब्दप्रयोग केला नाहीं गुलगुले हे आडनाव परिचयाचे असता 'कोटेकर' हे विशेषण लावण्यात अर्थात् कांहीं रहस्य विशेष असले पाहिजे. कोट्याशी या घराण्याचा पूर्वपरिचय व सबंध असावा असा स्पष्ट बोध होतो ही केवळ कल्पना किंवा कोटि नसून "तुम्ही काही नवे नव्हा पुरातन वाटणी [ तुमचे परिचयाची ] आहे तेणेप्रमाणे ज्याचे त्यास द्यावे' असें स्वत मल्हारजी होळकर स्पष्टीकरण करितात [ १ मार्च १७४३ ] तेव्हा शकाच उरत नाहीं.

(१०) बखरीत व पत्रव्यवहारात अनेक जागीं यांचा शिंदेशाहीशी प्रामुख्याने संबंध आलेला आहे पण याचे नातें अद्याप अनिश्चित होतें. यांची ४ असल पत्रे [ लेखाक २६२, २६८, २६९, २७० ] उपलब्ध झाली आहेत आणि प्रथमारंभी जी वंशावळी दिली आहे त्यावरून हे कन्हेरखेडचे शिंदे असून राणोजी शिंद्याचे [कनिष्ट] बंधु होते असें कळते मानाजी फाकडे [शिंदे] या साबाजी पाटिलाचे नातू होते. ही शाखा १८०९ साली शिंदेशाहीतून निघून बडोद्यास गेली ती तेथेंच सरदारी संपादन करून राहिली.

उंट २ यो रुपये

१६०[११] निा सावाजी शिंदे उंट १.

१०० सरकारांत उंट १.

२६०

येकूण रुपये दोनसे साठ रूपये गुाहाय देविले असेत. [ते] देणे. छ * २१ सवाल. हे विनती.

श्री मोर्तब सुद

---

लेखांक [ ६ ] श्री * संवत् १७९९ मार्गशीर्ष वद्य ८
[ ८ दिसंबर १७४२ ]

श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जनकोजि सु त राणोजि सींदे नीरतर

दस्तक[१२] 'सरकार' राजश्री राणोजी सिंदे ता कमाविसदारांनी व चौकीदारांनी वगैरे रहदारांनी माहाय अहद प्रांत कोटे तहद औरंगाबाद[१३] सुहूरसन सलास अर्बैन मया व अलफ. माधोराम[१४] तिवारी कोटेकर यांजकडील उंटे सुमार २० वीस बराबर देऊन औरंगाबादेस पा असेत. त्यांस राहदारियानें मुजाहिम न होता महालो महाल कुली हांसिलाचा तगादा न करिता सुखरूप फरोख्त करूं देणे. ताकीद असे. छ * २१ सवाल.

श्री मोर्तब सुद

---

(११) उंट खरिदीच्या किमतीचा प्रकार या पत्रावरून उमजेल.

(१२) आपापले हद्दीपर्यंतच असले दस्तक देण्याचा प्रघात होता असें जें राजवाडे सांगतात [खंड १ लेखांक १३७] त्यास हा अपवाद तर खराच पण जकात माफीपावेतों परवाने देण्याची परंपरा अपवादात्मकच का होईना पण मराठेशाहींत होती असें साधार सिद्ध होतें कीं नाहीं ?

(१३) औरंगाबाद हें शहर निजाम हैदराबाद याचे राज्यांत मुधा नदीचे कांठीं आहे त्याचें जुनें मराठी नांव 'देवगिरी 'असें होतें तें औरंगजेबाचे नांवावर रूपांतर पावलें.

(१४) हा तिवारी कोटेकर महारावजीकडील एक मुत्सद्दी असून तो नेहमीं शिंद्याकडे राजकीय कारभारांत असे.

लेखांक [ ७ ]                    श्री                    * संवत् १७९९ मार्गशीर्ष वद्य ९
[ ९ दिसंबर १७४२ ]

राजेश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

स्नो     राणोजी सिंदे दंडवत सुमा सलास [ अर्बैन ] तुमची वस्त्रे[१५] राहिली ते येणे प्रो देणे.

खासगत तुमची
१ तिवट.
१ पा पेठेण.
१ छीट जोडी.
———
३

उदेराम खवास व माधवराम
[ तिवारी ] छीट जोडी २.
———

येणे प्रो देणे. रा मल्हारबा[१६] कडील येवजाची नेमणूक केली आहे. तो येवज रा लक्ष्मणरायाच्या [ ? ] कर्जात घावा लागतो तर तुम्हीच घेणे. [ आणि ] त्याजकडे देणे. येथून चिठी येईल ते देणे. जाणिजे रा छ * २२ सवाल. हे विनती.

श्री मोर्तब सुद

लेखांक [ ८ ]                    श्री                    * संवत् १८०० आषाढ शुद्ध १०
[ २० जून १७४३ ]

श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जनकोजि सु त राणोजि सींदे नीरंतर

राजेश्री बाळाजी येशवंत पा कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्नो     राणोजी सिंदे दंडवत सुमा आर्बा

(१५) विजयादशमी निमित्त शिलेदार, सरदार व मुत्सदी लोकास योग्यतेनुसार बहुमान सरकारातून मिळत असे ही प्रथा संवत् १९१० पावेतों चालू होती तत्संबंधीच हीं वस्त्रें पाठविली असावींत असें वाटतें.

(१६) श्रीमंत मल्हारजी होळकर.

आर्बैन मया अलफ. 'आमची स्वारी मकसूदाबादेस[17] गेली होती. तेथें रा रघोजी भोसले [नागपूरकर] याची गाठ घालून पराभव त्याचा करून माघारे माळवे प्रांते आलो.' तुमचे वर्तमान कळले नाही. पूर्वी लष्करांत असतां तुम्ही अवघ्या कमाविसदारानी जो हवाला घेतला त्या येवजावर आम्ही नेमणूक करून येवज उजनीस देविला तो पावला नाही म्हणोन रा त्रिंबक राजदेउ यानी लिहीले. त्यावरून अपूर्व वाटले! तैसच रा 'माहाराया[18] कडे दोन हप्ते येणे त्याची गत काय जाली न कळे. ते नष्टाई करितां राहत नाहीत [आणि] मग शब्द ठेवितात. यदा तरी सुरळित वर्तले असिले तर त्यांचेच वरे आहे. तुम्ही तो स्वामी कार्यास न चुका.' तर [येविसी] सविस्तर वर्तमान लिहिणे. जो वसूल जाला असेल तो येवज पाठउन देणे. उदेराम खवास व माधवराव यांस पत्र लिहीले ते [त्याजकडे] पाठउन जाव घेणे. जाणिजे रा छ * ८ जमावल. कासिद[19] व जासूद[20] जोडी पा आहे यास रूपये ५ देणे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




[४ जुलै १७४३]
पैवस्ता आषाढ वद्य नवमी.

---

लेखांक [९] श्री * संवत् १८०० आषाढ शुद्ध ११
[२१ जून १७४३]

पुा राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यासि.

सुमा अर्बा आर्बैन मया अलफ. राजश्री [राजा] मलजी[21] यासि [पारसी] पत्र पा

---

(१७) रघोजी भोसल्यांचा पराभव मकसूदाबादेस केल्याचा सुगावा आजवर नव्हता पण आतां ही गोष्ट ह्या पत्रावरून उघड होते

(१८) उदेपुरकरास जसे 'महाराणा' तसेच कोठेकरांस 'महाराव' म्हणतात. मराठी पत्रव्यवहारांत यांस ' महाराव, महाराउ, महाराय, महारावजी, कोठेकर, ' या नावाने संबोधिलें आहे. [लेखांक १७, १६, १९, १३, ४४] या वेळी दुर्जनसालजी गादीवर असून त्यानीच प्रथम मराठ्यांशी मैत्री केली.

(१९) ' कासिद ' हा अरबी शब्द रूपांतर न होता मराठींत आला. कासिद म्हणजे दूत.

(२०) ' जासूद ' मात्र रूपांतर करून मराठींत शिरला. मूळ अरबी 'जासूस' म्हणजे हेर

(२१) हे राजामलजी कोण ? नवल विशेष हें की याना फारसी पत्रें पाठविली आहेत राजामल या नावाचा एक प्रख्यात मुसाहिब सवाई जयसिंगजीचा होता [ Tod Rajasthan vol ii page

आहे हे मुजरद त्याजकडे पाठउन त्याचा जाब आणउन पाठउन देणे. तुम्ही ही आपले वर्तमान कोटाची वसूलाची विल्हे काये जाली [ते लिहिणें.] रा त्रिम्बक राजदेव याजकडे यैवज तुम्हाकडून देविला होता तो त्याजकडे पाविलात नाही. हे गोष्ट अपूर्व आहे ! तरी नेमणूके श्रो यैवज मारनिलेकडे पावता करणे. दोन हप्ते यैवज कोटेवाल्याकडून येणे होते त्याचीही विल्हे करून घेउन पाठवणे. जाणिजे छ ✻ ९ जावल.




पैवस्ता आपाढ वद्य ९ नवमी
[ ४ जुलै १७४३ ]

---

लेखांक [१०] श्री ✻ संवत् १८०० कार्तिक शुद्ध ८
[ १४ अक्टुंबर १७४३ ]




राजश्री बालाजी येशवत पा। कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्रो। राणोजी सिंदे दंडवत सुमा अर्बा अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पा। ते पावले लि। वर्तमान सविस्तर कलले. कोव्याचे यैवजी हुडीपत्र पा। ते पावले. यैवज येणे आहे आलियावरे लिहून पाठउ परंतु बापुजी ना। सिंदे यानी दिकत लि। आहे की रुपये अटीचे येतील त्यास बटा पडणार तर तेथील सावकारा सी तुम्ही अटीच्या रुपयास बटा पडेल तो समजोन घेणे. मागून वर्तमान लेहून पाठउ. बाकी चाही निकाल करून घेतो म्हणून लि। तर निकड करून घेणे. परंतु हुंडीयास शाहरी दिकत न पडे ते करणे. मुदेत च्यार रोज जादा लागली [तर] पुरवेल परतु हरकत दिकत नसती पडे ते [झाले पाहिजे] यास्तव तेथोन सावकारासी करार करून घेणे [कीं] बटा पडेल तो देणे लागे [ल] यैसे परिछिन्न सागणे. रा। माहारायाकडून येक लक्ष शाहातेर हजार येणे त्या पैकी आले काय त्यात आमची वाटणी काये काढली आण हुडी काये पाठविली [ ते ]

---

297] तोच हा असावा असें वाटते या गृहस्थाशी पूर्वीपासून शिंद्याचा पत्रव्यवहारही चालत होता असें कळतें

तपसीलवार लिहिणे. जाणिजे रा छ * ६ रमजान. ‖ बहुत काये लिहिणे हे विनंती. (श्री मोर्तब सुद)

पौा छ २५ रमजान कार्तिक वद्य १२
[ २ नवंबर १७४३ ]

---

लेखांक [११] श्री * संवत् १८०० पौष शुद्ध ९
[ १४ दिसंबर १७४३ ]

पुा राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार कोटे यांसि.

सुमा आर्बा आर्बैन मया अलफ. तुम्ही कोट्याचा येका हप्ताचा हिशेब लिा त्यामध्ये खेरावाद[22] बकानी[23] चा हिसेब वजा केला नाही. तरी दुसरे हप्ता येईल त्यामध्ये तऱ्ही वजा करून ज्यांचा त्यास पावणे. जाणिजे छ * ८ माहे जिलकाद. ‖ हे विनती. (श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [१२] श्री * संवत् १८०० पौष शुद्ध १०
[ १५ दिसंबर १७४३ ]

पुा राजश्री बाळाजी येशवंत यांसि.

सुमा आर्बा. रा जानोजी निंबाळकर[24] याचे ह[ा]ती बाबत रूपये १६५०० साडे सोळा हजाराची हुंडी पा त्यास ही वटा पडला असे मनास आणून दर सदे रूा १ प्रो

---

(२२) खेरावाद व बकानी हे दोन्ही महाल या वेळी मराठ्याकडे होते कोट्याच्या दक्षिणेस झालावाडची राजधानी झालरापाटण आहे तिच्या वायव्ये दिशेस आऊ नदीपलीकडे खेरावाद हा महाल आहे. साम्रत कोटा राज्यातील चेचट तेहसीलीत तो समाविष्ट होतो

(२३) झालरापाटणच्या अग्नेय दिशेस कालीसिंध नदीपलीकडे हा बकानी महाल आहे या नांवाची कोट्यात तेहसीलच आहे

(२४) महाराव जानोजी निंबाळकर निजामाकडील एक बलाढ्य मराठे सरदार रावरंभा निंबाळकर ते हेच निजामाच्या वतीने हे मराठ्याकडे बरीच वर्षे राजकीय कारभारांत होते

भरणा भरून घेणे. गै न करणे. नगदी रूपया घ्यावे त्यास वटा म्हणजे काय ? बाबूजी ना। याचे मारफतीच्या हुंडयास वटा[२५] फार आहे [तरी] हिशेब करून घेणे छ * ९ जिल्काद.




पो छ १ माहे जिल्हेज माघ शुद्ध त्रितिया शुक्रवार.
[ ६ जनवरी १७४४ ]

---

लेखांक [१३] श्री * संवत् १८०० पौष वद्य ८
[ २७ दिसंबर १७४३ ]




राजश्री बाळाजी येशवत कमाविसदार प्रा कोटे गोसावी यासि

अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दडवत सुरसन आर्बा आर्बेन मया अलफ. प्रा पिंपलोदे[२६] व किरवाड सरकार रणथंबोर[२७] हे दोन्ही माहाल साल मजकूरी हुजरून आम्ही आपणाकडे घेउंन राजश्री शंकराजी रघुनाथ याचे स्वाधीन

---

(२५) बाबुजी नाईक बारामतीकराचा शिंद्यांशी बराच साहुकारा होता नाईक खरोखरीच 'पंचमहापातकी जातीचा अपेशी सराफ' म्हणून त्याची पत कमी [ ब्रम्हेद्र लेखाक ३०० ] किंवा स्वामीच्या राजकीय वहिष्काराचा हा प्रभाव होता ?

(२६) पिपलोद व किरवाड हे दोन्ही महाल संलग्न असून ते शिंदेशाही जिले श्योपूरच्या पश्चिमेस पार्वती नदीच्या काठी आहेत ते कोणला अटीवर घेतले हे मात्र कळत नाहीं

(२७) चितोडगडा इतकेंच या डोंगरी दुर्गाचे पूर्वी महत्व होतें हा गड अकबर बादशाहाच्या स्वाधीन केल्यामुळेच बूंदीकरास 'रावराजा' ही पदवी प्राप्त झाली [ Tod Rajasthan vol II page 382,384] मोगलाईस उतरती कळा लागली तेव्हा मराठ्याच्या हाती जाऊ नये म्हणून जयपूर करास अनायासें तो मिळाला [Tod Raj vol II page 399] तथापि आसंमतातील प्रदेशात प्रथम प्रवेश करून सवडीप्रमाणे आक्रमण करण्याच्या हेतूनेच तर टोंक, रामपूरा, झलंगड व खातोली मराठ्यानी घेतली नसावी ? मल्हारजी होळकराकडील सटवाजी राजोळे याने तर 'पागेचे ठाणे देऊन गवत लाकडे' जमविण्याचा घाट घातला होता [ चंद्रचूड दप्तर १ लेखाक ४६ ] पण पानिपतच्या फेऱ्यामुळे पारडें फिरलें असावें असे वाटतें

कमाविस केली आहे. तेथील साहित्याविसी हे तुम्हास सांगतील तर तुम्ही राजश्री माहा-रावजी यास सांगोन हरयेकविसी याची मदत करून अमल वसे ते गोष्ट करणे. हे गै न करणें. जाणिजे रा छ * २१ जिल्काद. ॥ बहुत काय लिा हे विनंती.

श्री मोर्तब सुद

---

लेखाक [१४]

श्री

* संवत् १८०० माघ शुद्ध ३
[ ६ जनवरी १७४४ ]

श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जनकोजि सुत राणोजि सींदे नीरंतर

राजश्री बाळाजी येशवत पा कोटे गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दडवत सुमा अर्बा अर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पा ते पावले. अठयासी हजाराचा हिशेब लिहिला तो कळला. त्या ऐवजी हुंडी रुा ३०५९ तीन हजार ऐकुण साठची पाठविली ते पावली. पूर्वी हुंड्या पाठविल्या त्यास बटा पडला रूपये ४४७॥

[ तपसील घेतला नाही. ]

एकुण चारसे साडे सतेतालीस पडले. हे सावकाराकडे अगर कोटेकराकडे विल्हे करून घेणे. तुम्ही लिा की आपण बाबूजी नाास लिा आहे तर त्यानी तीन हजार एकुण साठची हुंडीच मात्र लिा की रोकड रुा येतील. वरकडास तो बटा [ ते ] घेउन चुकले. तो जेव्हां कोट्यात सावकारास अगर रा महारावजी यास तगादा कराल ते शाहरी लेहून ते रा गोविंदराम याची निशा करतील तेव्हां होईल. नाही तर होत नाही कळले पा. हे जे 'कोटेकराकडे पहिलीच वाकी अठ्यासी [हजार] येणे [आहे] पुढे निमे साल गेले × × × मागती पूर्व ब्रतावरे आले [असो] आमचे काय गेले. त्याचे ते करतील तैसे पावतील. तुम्ही तर मुदेस न चुकणे.' ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

पैा माघ शुध त्रितीया शुक्रवार छ * १ जिल्हेज
[ ६ जनवरी १७४४ ]

---

लेखांक [१५] श्री * संवत् १८०० माघ मासं
[ जनवरी १७४४ ]




राजश्री विठल येमाजी कमाविसदार प्रां सुसनेर[२८] गोसावी यांसी.

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो॥ राणोजी सिंदे दडवत सुरसन आर्बा आबैन मया व अलफ. तुम्ही रा. माधोराम त्रिवाडी याज वा॥ पत्र पाठविले ते पावले. त्यानी ही मुखजबानी सांगितले [आणि पत्र दिले] ते पावले त्याज वरून सविस्तर कळो आले. तर अम्ही त्या प्रांतास येउं [तेव्हां] भेट होईल. भेटी नतर जे कार्य करणे ते केलं जाईल. जाणिजे रा॥ छ * [१७ किंवा २७[२९]] जिल्हेज. ॥ तुम्ही कांही चिंता न करणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [१६] श्री * सवत् १८०० फाल्गुन वद्य १२
[ २९ फरवरी १७४४ ]




राजश्री बाळाजी यशवत पो॥ कोंटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो॥ राणोजी सिंदे दडवत सुमा आर्बा

---

(२८) सुसनेर जिले शाजापूर प्रांत माळव्यापैकी या नावाच्या तेहसीलचे ठिकाण अवंतीकेच्या उत्तरेस ३० कोसावर आहे

(२९) एकाच अर्थाची दोन पत्रे असून त्यांत तारखेची जागा जीर्ण होऊन फाटलेली आहे तथापि ७ या आकड्याचा कारकूनी फर्राटा एकांत दृगोचर होतो त्यावरून १७ किंवा २७ असावी असें वाटतें. आणि म्हणूनच पत्रावर नुसता महिना दिला आहे जिल्हेज १७ ला २२ जनवरी व २७ ला १ फरवरी १७४४ येते

आर्बैन मया अलफ. अजम सैद लष्कर खान[30] यानी भिलान खाना बा हती २ व पडतळे २० कापड गठे २ गाड्या २ सुपारी गोणी ४ घोडे १० माणसे ७५ या खेरीज [ इतर ] ही जिनस दिलीस रवाना केला आहे. तर रा. माहाराउजीस सांगोन कोणीविसी जकाती वगैरे [साठीं] मुजाहिम न होता सर[ह]द पार करून देणे. जाणिजे रवाना छ* २५ मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [१७] श्री * संवत् १८०१ वैशाख शुद्ध १
[ २ अप्रेल १७४४ ]




राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ राणोजी सिंदे दंडवत सुमा आर्बा आर्बैन मया अलफ. पा॥ पिपलोद व किरवाड व इंद्रगड[31] खातोली[32] येथील मामला राजश्री शंकराजी रघुनाथ याजकडे आहे. तेथील साहित्याविसी तुम्हास मशारनिले सांगतील अगर

---

(३०) भोपाळच्या तहाचे वाटाघाटीस जे तीन मुत्सद्दी निजामाकडून आले त्यांपैकीं हा एक होता [ ब्रम्हेंद्र लेखांक ३४, ३५ ] औरंगाबादेच्या सुभेदारीपासून पुढें तो निजामाचे दिवाणगिरीपर्यंत पोहोंचला [ सरदेसाईकृत नाना पेशवे पृष्ठ १०३, १२७ ]

(३१) कोट्याप्रमाणेंच बूंदींतून ही शाखा इंद्रसिंगाचे वेळी निराळी निघाली आणि खातोली ही त्याची पोट शाखा होय. [ Tod Rajasthan vol. ii page 387 ] इंद्रासिगानें आपल्या नावावर हें गाव नवीन वसविलें इंद्रगडवाले बूंदीकरांसहित वांटणी पासून शिंयास करभार देत होते १८१८ चे तहाप्रमाणें राजस्थानाची सर्व खंडणी कंपनी सरकारच्या मध्यस्थीनें घेण्याचें ठरल्यामुळें याचा इंग्रेजाशीं परिचय झाला. तथापि खातोलीकराचा शिंदेशाहीशीं संबंध अद्याप चालू आहे [ ताजा भाग २ पान २०८ ]

(३२) हें गांव पार्वती नदीचे पश्चिम किनाऱ्यावर आहे. पूर्वी खातोलीकर शिंद्याचे माडलिक होते हल्ली त्याचा संबंध कोट्याशी असून शिंद्यास देत असलेली खंडणी ते इंग्रज सरकाराकडे देत असतात. [ टीप ३१ पहा ]

लिहितील त्या प्रो माहू [ । ] राव यांस सांगोन साहित्य पुरवुन पां मजकूरी अमल सुरळीत चाले, झाडियानसी वसूल होय ते गोष्ट करणे. येविसी गै सहसा न करणे. जाणिजे. छ * २९ माहे सफर. ।। वहुंत काय लिहिणे हे विनती.




---

लेखांक [१८] श्री * संवत् १८०१ जेष्ट वद्य ९

[ २४ मे १७४४ ]




राजश्री वाळाजी येशवंत कमाविसदार प्रा कोटे गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दडवत सुहूरसन अर्बा अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन लेखनार्थ अवगत जाहला. कोट्याकडे सलास ताा वाकी रूपये ८८,००० अठ्यासी हजार होती xx xx xx येवज परभारे माहाली ज्याचा त्यास पाविला, प्रां खेरावाद थकानी व भीलवाडी[33] याची वाटणी पाठवणे त्याप्रमाणे ज्याचे त्यास वाटणी पावड म्हणून लिहीले त्यावरून वाटणीचा कागद अलहिदा पाठविला असे. त्याप्रमाणे देणे. आम्हाकडील येवज येणे सदरहू अठ्यासी हजार पैकी रूपये.

| | |
|---|---|
| २८,९१३॥ | वाटणी प्रांत कोटे |
| १,२०० | वाटणी भीलवाडी निमे |
| ३०,११३॥ | |

अके तीस हजार येकसे साडे तेरा रूपये यावे त्या पैकी तुम्ही राजेश्री गोविंदरामा कडे हुंडीया रूप ꠳ ये २७,००० सतावीस हजाराच्या रवाना केल्या म्हणून लेखन केले

---

(३३) भीलवाडी हे मुख्य गाव खेरावादच्या अग्नेय दिशेस ८ कोसाच्या अतरावर ऐंत नदीचे पश्चिम किनाऱ्यावर असून ते हल्ली झालावाड राज्यात आहे. हे तीन्ही महाल मराठ्याकडेच होते, पैकी पहिले दोन होळकराच्या सनदेंत लागले [ भागवतकृत होळकरशाही साधनें खंड १ पान २ ] आणि भीलवाडी निमे होळकर निमे शिंदे अशी विभागनी होती [ कावली पान २ ]

तर सदरहू येवज पावल्याचे जाबत्याचे पाठवणे व बाकी येवज तीन हजार येकशे साडे तेरा राहिले तेही राजश्री गोविंदरामा कडे पावउन जाब आणवणे. तुम्ही हुंड्या पाठविता त्यांस औरंगाबादेत बटा घेनात, तो आमच्या अंगावर पडतो [ तरी ] त्याची चौकशी साहूकाराकडे करून येवज उगउन घेणे. गुदस्ताच्या हुंड्या पाठविल्या त्यास बटा पडला. त्याची याद अलाहिदा पाठविली आहे. रुपये ६१२॥ सा[हा]से साडे बारा पाठउन देणे व ××× असेल व पुढे कराल त्याची चौकसी करून पाठवित जाणे.।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




पैा छ २२ रबिलाखर, जेष्ट-वर्द्य ९ गुरुवार.[३४]

---

लेखांक [१९] ॥ श्री ॥ * संवत् १८०१ जेष्ट वद्य ९
[ २४ मे १७४४ ]

पुरवणी राजश्री बाळाजी यशवंत गोसावि यांसि.

दंडवत सुहूरसन आर्बा. तुम्ही पत्र पाठविले की राजश्री माहारायाकडील येवज सध्या पैसा प्राप्त होत नाही. साहेब काम तर जाले पाहिजे यास्तव हवाला टवाळा करून हुडी पाडी घेउन कवज तूर्त देणे लागते तो येवज यावयास दिवसगत लागती या मुळे 'धणी'[३५] इतराज होतात येथे तो दुसरा इलाज नाही. सन आर्बाचा वसूल येणे तो

---

(३४) मोडकांचे जंत्री प्रमाणे 'अर्बा अर्बैनचे जेष्ट वद्य ९ मीस गुरुवार' नसून रविवार आहे समस चे जेष्ट नवमीस २२ रावलर असून गुरुवारही येतो. पण पत्रात स्पष्ट 'अर्बा' लिहिलेले आहे तो हस्तदोष असला तर तारीख २४ मे १७४४ येईल.

(३५) गुलगुले स्वयम् शिंद्यास 'धणी' म्हणोन संबोधितात तेव्हा आतां शंकाच राहत नाही. स्वामी सेवकाचे हे नाते दाखविणारी अनेक पत्रे संग्रही आहेत ती प्रकाशित होतील तसा हा ग्रह दृढतर होईल पण 'The ancestor of this Gulgule family was appointed by the Peshwa under the orders of Scindia' अशी भुरळ सरदेसायास कशी पडली? अल्पावकाशात संपूर्ण संग्रह चाळणे जरी शक्य नव्हतें तरी 'पूर्वपानिपतीय पत्रव्यवहार' त्यांनी पाहिलेला होता म्हणून तत्संबधी थोडें विवेचन केले असता अनाठायी होणार नाही व शिंदेशाहीचा खरा प्रकारही कळणार नाहीं माळव्याची वाटणी म्हणजे मराठेशाहीतील मोठी क्रांति होय त्यायोगें 'समाईक व व्यक्तिगत' अशी भाषा निपजली आणि मराठेशाहीतील घटकास आपापले क्षेत्रापरी स्वतंत्रता येऊन त्या दिशेनें परस्पर व्यवहार होऊं लागले या राजकीय मंत्रतंत्राची सापेक्षता मननीय आहे वाटणीपासून 'सेवकत्वास'

हवालियानेच आला तर येईल. येविसी आज्ञा येईल तर निकाल करून घेउ म्हणून लिहीले. ¶ ऐसीयासी 'माहाराउ याशी अगत्य असेल तरी पैका देतील, नाही तरी फजीत पावतील तुम्ही हवाले घ्यावे, वाटेकराचा[३६] कजिया दफतरी घ्यावा [हा] लटकाच बोभाट कार्याचा नाही. वाटकरासी माहारायासी सर्वांसी गोर्डाने राहाणे. माहारायाचे पारपत्य या उपरी येना येइल. [चिंता] काय ? असो तुम्हास × × × काय ? तुम्ही सर्वांसीच स्नेह राखणे.' ¶ बहुत काय लिा हे विनंती. (श्री मोरेश्वर सुद) पोा छ २२ रबिलाखर जेष्ट वद्य ९ गुरुवार.

[ २४ मई १७४४ ]

---

भागीदार या नात्यानें 'समानत्व' स्वरूप आले व तें नवचे क्वचित् बहुना छत्रपतींच्या संमतीनें प्राप्त झालें 'सामदामदंडभेदादि चतुर्विध सूत्राधिकार उद्भवला' निदान शिंदेशाहीपुरता तरी प्रचार पावला असें पत्राधारे कळतें उदाहरणार्थ रामचंद्र मल्हार सुखठणकर पेशव्याकडून दिवाण होते असा सर्व साधारण ग्रह च नाय पण सिद्धांत होऊन बसला आहे, तो इतका की शिंदेशाही ही त्यांचीच करामात समजली जाते [राजाध्यक्षकृत जिवबा बक्षी २५] पण खरा प्रकार अगदीं निराळा आहे ते पेशवाईत राणोजींचे समकालीन होते त्याचे 'चातुर्य व महानुभव' पाहून शिंद्यांनी एका प्रसंग विशेषी निवडक शिपायांसह त्यास पेशव्यापासून आपल्या तैनातीस मागून घेतले' [राजवाडेकृत शिंद्यांची अप्रकाशित फारसी बखर] आणि पुढे ते कर्तबगारीच्या जोरावर दिवाणगिरीपावेतों पोहोचले घटकाभर या बखरकराचा गाशिया गुंडाळला आणि संशोधकाच्या दृष्टीनें पाहिले तरी 'मुतालकी व वाटणी' मिळाल्यानंतर रामचंद्र बावास दुसरी 'पालखी' मिळालेली आहे [शकावली पान १] दिवाणगिरीचा कोठेच दाखला मिळत नाही वाटणीपासून शिंदे स्वतंत्र कामदार नेमू लागले [लेखांक १, १३, २२, २७, ३८, १०२, १२२] समाईक कामदारांची योजना देखील पेशव्यांनी आपल्या स्वाधीन ठेविली नव्हती [लेखांक ६०, ६१, १२१, १२४] शिंदे पेशव्याचे नोकर खरे पण राजवाडे सांगतात त्याप्रमाणे केवळ मामलतदार होते की काय ? [ऐ० खंड १ पान ४९] असे असते तर कोट्याकडील ४० लक्षाच्या नजराण्यासंबंधी पेशव्यांनी १० लक्षावर फारखती मामलेदारास कशी दिली ? [लेखांक १७९, १८०] तसेच मारवाडच्या 'रणबंका राठोरांशी' दोन हात केल्यावर मराठेशाहीची सर्व खंडणी एकट्या शिंद्यासच देण्याविषयीं आग्रह कोणी केला होता ? [भाऊसाहेब बखर २२] व त्यावरून काय निष्कर्ष निघतो ? या बखरकारावर इतिहासाचार्यांचा बराच विश्वास होता [खंड १ लेखांक १६५ टीप २३९] तथापि 'तिखट मिठाचा' काही प्रकार भासत असल्यास Aitchison Treaties vol. III page 159, 160 वरील तहनाम्याची कलम ६ व ७ पहावी

(३६) होळकर व पवार.

लेखांक [२०] ॥ श्री ॥ * संवत् १८०१ जेष्ट वद्य ९

[२४ मे १७४४]

तेरीज वाटणी प्रांत कोटे वगैरे वाकी ता। आखेर सन सलास सुहूरसन × × ×

| | ऐनजमा रुपये. | राजश्री मल्हारजी होलकर. | राजश्री राणोजी सिंदे. | यशवंतराव पवार. | तुकोजी पवार. |
|---|---|---|---|---|---|
| प्रा। खैराबाद बकानी ... | १०,५०० | ५,२५० | ... | ३,६५२ | १,५९८ |
| प्रा। भीलवाडी ... | २,४०० | १,२०० | १,२०० | ... | ... |
| प्रा। कोटे ... | ७५,१०० | २८,९१३॥ | २८,९१३॥ | १२,०१६ | ५,२५७ |
| | ८८,००० | ३५,३६३॥ | ३०,११३॥ | १५,६६८ | ६,८५५ |

---

लेखांक [२१] श्री * संवत् १८०१ जेष्ट वद्य ९

[२४ मे १७४४]

हिसेब प्रा। कोटे बाकी ता। आखेर सन सलास १,७६,००० रूपये.

पैकी पेशजी वाटणी परभारे महाली होउन यैवज ज्याचा त्यास पावला हाफ्ता ८८,००० „

बाकी ... .. .... ८८,००० „

पैकी वजा वाटणी प्रा। खैराबाद व बकानी व भीलवाडी यैन खंडणी सन सलास कुली प्रा। कोटे रूपये १,५०,००० यास दर हजारी रूपये ८६ प्रा। १२,९०० „

यासी वाटणी ... .... .... ...

प्रा। खैराबाद बकानी दर हजारी रूपये ७० प्रा। यो रूपये १०,५०० यासी वाटणी.

५,२५० रा। मल्हारजी होलकर निमे वाटणी.

प्रा। भीलवाडी दर हजारी रूपये १६ प्रा। रूपये २,४०० यासी वाटणी.

१,२०० रा। मल्हारजी होलकर निमे वाटणी.

५,२५० पवार उभयता निमे वाटणी.    १,२०० रा। राणोजी सिंदे निमे वाटणी.

३,६५२ यशवंराव पवार दर १६.

१,५९८ तुकोजी पवार दर ७.    २,४००

५,२५०

१०,५००

येकुण येकदर तपसील    रूपये

६,४५० राजश्री मल्हारजी होलकर वाटणी.

५,२५० खैराबाद बकानी निमे.

१,२०० भीलवाडी निमे.

६,४५०

१,२०० राजश्री राणोजी सिंदे भीलवाडी निमे.

५,२५० पवार उभयेता प्रा। खैराबाद बकानी पैकी निमे वाटणी.

३,६५२ यशवंतराव पवार.

१,५९८ तुकोजी पवार.

५,२५०

१२,९००

बाकी यैवज प्रा। कोटे    ७५,१०० रूपये.

यासि वाटणी पवार उभयेता दर सदे २३ प्रा।    १७,२१३ „

तपसील.

यशवंतराव पवार दर सदे १६ प्रा। रूपये १२,०१६.    तुकोजी पवार दर सदे रूा। ७ प्रा। रूपये ५,२५७.

बाकी .... .... ..    ५७,८२७ रूपये.

तपसील.

वाटणी निमे सिंदे रूपये २८,९१३॥.    वाटणी निमे होलकर रूपये २८,९१३॥.

लेखांक [२२] श्री * संवत् १८०१ माघ शुद्ध ४

[२५ जनवरी १७४५]

चिरंजीव राजश्री खलोजी सिंदे यासी प्रति राणोजी सिंदे आशिर्वाद उपरी. महमद मुराद दिा राजश्री सिवदासजी[३७] याची घोडी कुंमेद पहिले लांकडा [?] बदल गेली होती ते तुमच्या लोकांनी [धरून] घेतली, त्याबदल चिठी पा होती तिचा जाबच तुम्ही उडवाउडव करून लिात. हाली महमद मजकूर याणे घोडी आपली तुमच्या ठाण्यांत वोळखोंन ठिकाणी लाविली आहे म्हणून सांगितले तरी 'त्यांचा आमचा सला मामला असता हे गोष्ट तुम्ही मकराईची करिता तरी आम्हास पुरवणार नाही.' या उपरी देखत कागद तटाणी तुमच्या जवळ आहे ते त्याची त्यास देणे. वारंवार वोभाट कामास येणार नाही. घोडी देउन पावल्याचे कवज घेउंन लौकर पाठवणे. फिरोन वोभाट येउ न देणे. छ * २ मोहरम. हे आशिर्वाद.

(श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [२३] श्री * संवत् १८०१ फाल्गुन वद्य १

[७ मार्च १७४५]

(श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जनकोजि सु त राणोजि सींदे नीरंतर)

राजश्री बाळाजी येगवंत प्रां कोटे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्रो राणोजी सिंदे दंडवत. खमस आर्बेन मया अलफ. राजश्री त्रिम्बक संभाजी[३८] [?] तुम्हाकडे पेशजीपासून आहे त्या प्रमाणे करार असे. यांसि वेतन रूपये २०० दोनशे करार केले असे ते पावते करणे. जाणिजे रा छ * १४ सफर. ।' बहुत काय लिा हे विनंती.

(श्री मोर्तब सुद)

---

(३७) या नावाच्या अनेक व्यक्ती होत्या (१) सिवसिंग पिपल्या वादेकर, जागीर बागली, परगणे सोनकछ उर्चोदच्या समीप हा पिपल्या आहे. (२) सिवसिंगजी मेवाडकर (३) सिवसिंग राठोड आणि (४) सिवसिंगजी झाला कोठेकर बागली व मेवाड बरेच अतरावर असल्यामुळें ते दोन्ही संभवत नाहींत गुलगुल्याच्या समीपच कोणीतरी असावे सिवसिंग राठोर किंवा झाला कोठेकराचे अधिकारी म्हणावें तर त्याच्याशीं निराळा 'सला मामला' वाक्य असेल काय ? बरोबर काही तर्क चालत नाहीं

(३८) बाळाजीपताच्या हाताखालीं काम करीत होते. पण तें काम कोणतें ? हें समजत नाहीं

लेखांक [२४] श्री * संवत् १८०१ फाल्गुन वद्य ४

[१० मार्च १७४५]

श्री जोति
स्वरूप चरणि त
त्पर जनकोजि सु
त राणोजि सींदे
नीरंतर

राजश्री मालाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दंडवत. सुमा खमस अर्बैन मया अलफ. माधोराम तिवारी कोट्यास आले आहेत. भला माणूस आहे तुम्हारा दखलच असे, तर हरयेकविसी याचा गौर करून चालवावयासी अंतर न करणे. जाणिजे छ :- १७ माहे सफर. |' मानिलेंचे अगत्य आम्हास आहे हे तुम्ही जाणतच अहां, तर हरभात[३९] याचे उर्जित होय ते करावयास सर्वथा न चुकणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [२५] श्री * संवत् १८०१ फाल्गुन वद्य ४

[१० मार्च १७४५]

श्री जोति
स्वरूप चरणि त
त्पर जनकोजि सु
त राणोजि सींदे
नीरंतर

[सिक्का फाटला आहे]

राजश्री मालाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गो यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दंडवत. सुमा खमस अर्बैन मया अलफ. गुदस्ताच्या यैवजामधे तुम्ही 'पाळणा'[४०] येक आणिला होता त्याची मखलासी करिना तगल्फी निघाले वीना.

---

(३९) भात म्हणजे प्रकार राजपुतांशी परिचय व पत्रव्यवहार हिंदीत होत असल्यामुळें हा शब्द मराठीत आला पण उर्दूपेक्षा हिंदी शब्दांचें प्रमाण फारच कमी होतें कारण उघड आहे की उर्दू शासकाच्या शकीवर शिरली तसा योग हिंदीस लाभला नाही स्नेहाच्या नात्यानें जेवढी देवघेव झाली तेवढीच काय ती

(४०) हा पाळणा कोणासाठी असावा बरें ? जनकोजी साठी तर नव्हे ? छे ! बखरकार पानिपतच्या समयीं २० वर्षांचे वय देतो [भाऊबखर पान ५७] जोतिबा निसंतान वारले दत्ताजीस केवळ एक मुलगी होती तुकोजीच्या मुलांपैकीं खलोजी तर कर्तेसवरते होते [लेखांक २२] केदारजी, आनंदराव अथवा कोण्या मुलीसाठीं हा पाळणा केला असेल.

सांखळ्या तांब्याच्या मुलामगिरी वजन रुपये ८१ भार.	कोईडे व हलगे रुपाचे वर मुलामा वजन रुपये ३५॥ भार.

येकुण येकसे साडे सोळा भार माघारे रा नारो विठल याज बा पाठविले आहे. ते घेणे आणि त्याचे त्यास देणे. बाकी वजन केले बीनपसील वजन रुा भार

५६८॥ सोने रुा भार ५६८॥ मंद असे

६२१ रुपये तोळे दर वजन

सदरहू प्रो जमा केले असे. त्याची कीमत उदमी या ×× मासे रुा ७५०० ×× ×× येणे राहिले. ते घे ㄹ उन हुजूर पाठवणे. जाणिजे छ ※ १७ सफर. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

(श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [२६]	श्री	※ सवत् १८०१ फाल्गुन वद्य ९
[१५ मार्च १७४५]

(श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जलकोजि सु त राणोजि सींदे नीरंतर)

राजश्री बाळाजी येशवत पा कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दंडवत. सुमा खमस अर्बेन मया अलफ तुम्ही पत्र पाा ते पावले. [तुम्हीं] लिाा की राजश्री माहाराउजी करारा प्रो रजावद आसता आपले मुकाम मार्गात होतात, मोजे रळावल [न][४१] वगैरे यास उपसर्ग लागला म्हणून लिाा. येसीयांस 'श्रीमंताकडे राजश्री बापूजी[४२] [?] मेघशाम याची रवानगी करणे होती म्हणून मुकाम जाला होता. रळावलवालेसी व महीवालेसी[४३] कटकट जाली. अधी तर गाउ उजाड होता कडवळ [?] पळोन गेले. हे वर्तमान कळलीयावर आम्ही कूच दर कूच करून शाहबाद[४४] देखील टाकली. येसे असतां तुम्ही त्याचेच सांगितल्याप्रमाणे

---

(४१) रलावन कोटा राज्यातर्गत किशनगंज तहसीलीत कूल नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर हा मोठा गाव असून तो या वेळी महारावजीच्या भाऊबंदाकडे होता

(४२) हे बापूजी मेघशाम कोण ?

(४३) महीवाले म्हणून कोणी कोट्यात नाहीत मउवाले या नावाचे बूंदीकराकडील एक भाऊबंद मात्र होते [ Tod Rajasthan vol. ii page 389 ].

(४४) शाहाबाद या नावाची कोट्यात एक तेहसील आहे हे ठाणे या वेळी कोटेकराकडे असावे असे दिसतें पुढें ते मराठ्याकडे आलें. शिवाजी विठ्ठल राजे बहादराकडे तें फार दिवस होतें

मानिता हे अपूर्व आहे ! जो करार जाला त्यांत आम्हापासून अंतर तिलप्राय होणार नाही. लष्कर मुकामातून जाता येता [थोडा बहुत] उपसर्ग[४५] लागतच आहे. पुढे तम्ही त्यानी तुम्हास अतर न करावे म्हणजे सहजच मुलकाची आबादी होईल. वायदा चुकल्यावर [परिणाम] कळतच

---

(४५) उत्तर हिंदुस्थानी राजेरजवाड्याचा वाटणीपासून मराठ्याशी प्रत्यक्ष सबंध आला आणि पुढे तो दिवसेदिवस घनिष्ट होत गेला त्या वेळी प्रत्येकाशी निरनिराळे जे तह झाले त्यात मर्वांनी खंडणी देण्याचें ठरविलें व आपापले सोईप्रमाणें ही खंडणी नगदी किंवा मुलकाचे स्वरुपात लावून दिली आपलें धोरण सरळ ठेवून जे वेळशीर खंडणी देत गेले त्यास काडीमात्र उपसर्ग मराठ्याकडून लागला नाही उभयपक्षीं झालेल्या करारात तफावत करण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती किंबहुना स्वत करार पाळण्याची प्रवृत्ति असून द्वेश वाढविणें त्यास मनापासून इष्ट नव्हतें नीतीच्या सरळ व शुद्ध राजमार्गानें वर्तन करण्याचे ते आपले आद्य कर्तव्य समजत असत आणि त्या भावनेनेच प्रेरित होऊन ते सर्वांशीं सलगी ठेवून आपला कार्यक्षेम चालवू पहात होते, असे आता साधार सिद्ध करिता येतें त्या कामी गाठची चर्पटपंजरी न लाविता तत्कालीन मार्मिक व मित भाषेतच संक्षेपाने दिग्दर्शन करणें सोईस्कर वाटतें × × 'वसूलाची विल्हे काय जाली ? दोन हप्ते येणे [ ८, ९ ] पुढे नीमे साल गेले मागती पूर्व वृतावरे आले असो आमचे काय गेले ? करतील तसे पावतील ते नष्टाई करीतां राहत नाही आणि मग शब्द ठेवितात लिहावे तर अधिकोतर द्वेश करतील तरी सामोपचारे पैशाची सुरळीत वाट होत असेल तर करुन घेणें मुदत च्यार रोज जादा लागली तर पुरवेल पण दिकत न पडे ते करणे [ १०, १४, १९ ] जो करार जाला त्यांत आम्हापासून तिलप्राय अंतर होनार नाही त्यांनी तरी अतर न करावे नीतिच्या युक्तीने चालेत म्हणजे सहजच मुलकाची आबादी होईल बोध मात्र विवेके करून, सागून पाहणे. नाईके तरी केले पावतील [ २६, २९, ३० ] पैशा साठीं हवाले टवाले बाहेरचे ठेहलवे करुन चालकाईस अंतर करीत नाही मागे लबाडी केली त्याचा सेवट काय जाला ? त्यासच प्रतिबंध होईल तरी सामदाम दंडभेद विचारे चार गोष्टी सागोन देहावर आणने [३१, ३२] हुंल्या माघाऱ्या फिरल्या राज्य करणे, सलूक राखणे आणि आबादी करणे असेल तर कराराप्रमाणे पैसा आमचे वारे न येता टाकून द्यावा नाहीतर फौज येईल त्यास आमचा उपाय नाही लक्षप्रकारे येणे न होय ते करणे रयेतचा भोग सरला असेल तर ईश्वर त्यास बुध देईल स्मरणास मात्र न चुकणे वसूल होतसे उत्तम आहे संतोषे पैका देतील तो घेणे [ ४१, ४४ ] हवाले टवाले करुन पाहिले वसुलात येत नाही [४५] बरे वाट पहातो, सचोटीस उतरले तर बरे नाहीतर मालवियांत पोट भरावयासी जागा तेवढीच आहे वजाउन सांगत जाणे [४७] × × कडे बाकीं येणे सबब मोर्चे लाविले [४९] हाच प्रकार त्यास घडेल [५३] काल हरण करितात बरें एक वरीस सरल देउन पहातो पुढे कर्तुत्वानुरुप होणे ते होईल [५३] आपला कारभार अवघाच अकुत्रिम [५१] स्नेह करणार ते सतप्रमाण असावे प्रामानिकता धरलिया येथून ही अतर होनार नाही. [५५] सुरळीत वर्ततात येसे असतां येकायेकी उपसर्ग करावा ! येणेकरुन श्रीस व सर्वास माननार नाही आजपावेतो मार्ग पाहिला [५७] सर्वा गोष्टीची गोष्ट केल्या कारभाराचा निर्गम जाल्याने चिंता काय ? [ ६५ ] निकाल करून दिला तरी उत्तम [ ७२ ] उगेच गोड गोष्टी कार्याच्या काय ? [ ७३ ] थोर आहेत. उत्तम तेंच करतील [ ७७ ] सालेसाल देतात देतातसे लिहिता ! सत्यच मानावें ? [८३] हिंदुस्थानात × × येथीलच काम आहे येक वेळच सर्व बाकी

आहे. [हे] ते [ही] जाणतात.' जाणिजे रा छ * २२ सफर. ॥' बहुत काय लिहिणे हे विनती.




---

लेखांक [२७] श्री *संवत् १८०२ चैत्र वद्य ७
[ १२ अप्रैल १७४५ ]




राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार पा कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दंडवत. सुमा खमस अर्बैन मया अलफ. राजश्री यशवतराउ पवार याजकडील मामलेदार राघो हरी पा मारी आहेत त्याजकडे ऐवज येणे प्रा पावले वीा रुपये.

४॥ साल मजकूरी जो वसूल आम्ही आल्यापासून होईल त्यास दर सदे देणे ४॥ रुपये हुजूर पेसजी पावले त्याची वाटणी येथे केली जाईल, तुम्हाकडील वसूलास नेमणूक करार

१६ सनवाद बाकी देखील आर्वा येणे त्यापैकी शिरस्ता दरसदे पेसजी प्रा

---

घेतली जाईल [८६] कराराप्रमाणें **वसुलात अद्यापी येत नाहीं अगर मुलकाची वाटणी द्यावयाचा विचार दिसेत नसे** करारास अंतर करितात यास सरकारचा नफाच असे **अत:पर आम्हावर शब्द नाही** मुलुक ताराज केला जाईल [९०] कार्यभाग निर्वाह करुन दिला तरी रहावे नाही तरी फळ काय ? **बादशाही मुलुक सरकार अमल होत आला. मधेच × × इनामदार आहे की काय ?** [९२] आमचा कारभार येकवचनी ज्याणे बोलावे तेणे प्रोन करून दाखवावे नाहींतरी कारभारांत कशास यावे ? [९२] दर मजलीने येतो. दिल्हे तर उत्तम आहे [९५] न देतील तऱ्ही आडवे येणे. [९६] आपली फळे पावतील [११३] शरीराम सावकास नव्हते प्रस्तुत समाधान आहेत ताकीद दंडदोर होतो अद्याप रुपये न दिले येणे करून **स्नेह कसा राहतो ?** [१४४] जाते समई निर्वाह करुन जातील [१४५] है गै न करणे [१५१] ढील कराल तर व्याज लागेल [१५४] वोढी बहुतच जाली हर प्रेत्ने × × रिकामा नये ते करणे [१६६] फोजेची समजावीस जाली [१७०] त्या प्राते येत असो [१८३] आम्ही कर्ज कहाडून **फौजा ठेवाव्या** आणि × × **पैका देत नाही** याजकरिता मुलुक सोडवाव लागतो. [१८४] जवळ **पैका आहे तो सिबंदीस खर्च** करितात सिबंदी मातबर ठेवितात आणि **आपसमध्ये** भांडणे भांडतात. **सरकारच्या पैक्याची काळजीच नसे.** तसदी जाली म्हणजे राहजच देत जाते [२१७]

सदरहू प्रा करार केले आसे. तर वसूला प्रा याची वाटणी यास पावणे. जाणिजे रा छ। २० रौावल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री मोतेब सुद

लेखांक [२८] श्री *संवत् १८०२ चैत्र वद्य ११
[ १६ अप्रैल १७४५ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवंत का। प्रांत कोटे गोसावी यांसि.

दंडवत सुमा खमस अर्बैन मया अलफ. 'कोट्यास प्रथम युध्य[४६] झाले तेव्हां आम्हा कडील गरूडांची घोडी गावांत पाडाउ होउन गेली आहे, तिजविसीं तुम्हास वारंवार रूबरूच तेथे असता सागितले होते परंतु तुम्ही हैगईच करून विसरलेत. अपूर्व आहे! या उपरी तर्‍ही यांसी धरून ते घोडी सें दोनसें रुपये पावेतो देउं करून आपल्या हाताखाले घालणे. गै न करणे. 'घोडी[४७] आपल्याजवळ आणउन हुजूर लेहून पाठवणे.' रा छ* २४ रबिलावल.

लेखांक [२९] श्री *संवत् १८०२ वैशाख शुद्ध ६
[ २६ अप्रैल १७४५ ]

श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जनकोजि सु त राणोजि सींदे नीरंतर

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रात कोटें गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो। राणोजी सिंदे दंडवत सुमा खमस

(४६) कोटेकराशीं प्रथम युद्ध केव्हा व कोणत्या कारणामुळें झालें ते काही कळत नाही. 'मागे लबाडी केली त्याचे काय जाले जे आता करतील' असा ओझरता जो उल्लेख आला आहे [लेखाक ३२] त्या प्रसंगीं ही गरूडाची घोडी तर गेली नसेल?

(४७) पैशापेक्षा घोड्याची किंमत मराठ्यास ज्यास्त होती ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे घोड्याच्या निमितानें पैसा उकळण्याची मराठ्याची दृष्टि नसून किमानपक्षी पैशावर तडजोड करीत असत असें स्पष्ट दिसतें

अर्बैन मया व अलफ. पा पाटण[४८] देखील करबे येथें कोण्ही मातब्बर वगैरे रयेत लोक संतोशास्तव येउन राहतात व पुढे ही राहतील, त्याजकरिता कोटेकर यासी विशाद येतो म्हणून कोण्ही थोडे बहुत आले आहेत त्यास जबरदस्तीने [धरून] नेणार म्हणून कळले. दुसरे 'प्रांत इद्रगड व खातोली सोपार[४९] व करवाड पिपळेदे सरकारचे महाल त्यांतही स्वाऱ्या पाठउन धामधूम माडिली असे. तरी येविसी त्यांस बरासा बोध करून सरकारच्या महालांत अगर बूंदी[५०] प्रांते बावगी[५१] वर्तणूक न करीत ते करणे. त्याचा प्रांत जो आहे तेवढेच आपले अनभउन सुखरूप राहोन आपल्याच प्रांताची लावणी संच म[?] णी करींत येसे करणे. तुम्ही त्यांस सांगावयास गै न करणे. नीतीच्या युक्तीने चालेत ते करणे.' आपले वर्तमान व सरकारच्या येवजाचे तपसीलवार लेहून पाठवणे. जाणिजे छ* ४ रबिलाखर. [*] बहुत काय लिहिणे हे विनती.

श्री मोर्तब सुद

---

लेखांक [३०] श्री * संवत् १८०२ जेष्ट शुद्ध १

[ २१ मे १७४५ ]

श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जनकोजि सु त राणोजि सींदे नीरंतर

राजश्री म्हाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दंडवत. सुमा

---

(४८) हें शहर कोट्याच्या ईशान्य दिशेस ५ कोसाच्या अंतरावर चंबल नदीच्या काठीं असून मराठे त्यास 'किशोरी पाटण' म्हणत असत [ लेखांक १२४ ] आणि हा महाल शिंद्याची जागीर होती असें समजतें [ लेखांक ३८ ] याच स्थलीं बाजीराव पेशवे, शिंदे व होळकर यांची सवाई जयसिंगजी जयपूरकरांशीं प्रथम भेट होऊन माळवा 'दक्षिणा' दाखल मिळाला असें रानवडे सांगतो या भेटीचें विस्तृत वर्णन त्याने दिलें आहे [ शिंद्याची फारसी बखर ]

(४९) याचे खरें नाव शिवपूर असे असून प्रचारात शोपुर असे म्हणतात मराठी पत्रव्यवहारांत सोपार असे सर्वत्र म्हटलें आहे त्या शहरावरून जिल्ह्यास हे नाव पडले गौड राजपूतांचें तें वसतिस्थान असल्यामुळें प्राचीन काळी त्यास 'गौडवाना' असें नाव होतें तेथील राज्याच्या ऱ्हासाबरोबर नावाचा ही लोप झाला बडोदकर राजे हे अद्याप शोपूरकर म्हणविले जातात [तारीख जागीरदारान भाग २ पान २२५ ते २३४]

(५०) बूंदी राजपुतान्यातील हे शहर हाडा रजपूताची मुख्य गादी होय. [ Tod Rajasthan vol ii page 355, 386-87 ] हें कोट्याच्या नैऋत्य दिशेस १२ कोसांवर आहे.

(५१) शिंदेशाहीत दंगा केला असता शासन करण्यापेक्षा समेट करण्याचे धोरण यावरून स्पष्ट दिसते [ लेखांक ३२ ]

खमस अर्बैन . मया अल्फ. 'फ़िरवाड पिंपळोदे येथें मो।पतराग चरण' फौजसुधां जाउन येकावन हजार रुपये घेतले व पा। सिरसी[53] पाडोन[54] वमये तालुका देवीसिग घदोरियाचा [?] येथेही उपद्रव करून मौजे करडखो[55] हा गाव ठाणे हिरोन घेतले व गुरे दोन तीन से नेली आहेत.' तरी त्यास येविसी सदरहू प्रो 'त्याच्या अंगी तपसीलवार त्यावोन सांगणे आणि आपला प्रांत जो आहे त्याचीच लावणी करीत सुखरूप आपल्या जागा राहेत ते करणे. तुम्ही त्यास बोध मात्र विवेके करून, सागोन पाहणे. नाईकेत तरी पुन्हा आपले केले पावतील. चिंता काय आहे! लि॥ प्रो त्यांजला सांगून ठाणे घेतले आहे ते व गुरे व पैका व जागा देत येसे करून या उपरी तऱ्ही विचारे वर्तत ते करणे.' तुम्ही आपल्या कारभाराचे वर्तमान तपसीलवार लेहून पाठवणे जाणिजे छ * २९ रबिलाखर पाटणच्या नावा माहारायानी नेल्या ते आहेत त्या त्यास सागोन नावा पाटणच्या पाटणास जात ते करणे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




लेखांक [३१] श्री * संवत् १८०२ जेष्ट वद्य १४

[ १७ जून १७४५ ]




राजश्री बालाजी येशवत प्रात कोटे गोसावी यासी.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्रो॥ राणोजी सिंदे दडवत सुमा सिन अर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले लि॥ वर्तमान कळले. 'कोटेवाला अद्यापि वरी चालकाईस अंतर करित नाही. सरकारचा पैका करारा प्रो॥ द्यावा म्हणून लौकि-

(५२) कोठेकराकडून हे मल्हारजी होळकराकडे राजकीय कारभारात होते

(५३) शिंदेशाही जिल्हे इसागडातील ही जागीर सिरसी होय येथील ठाकुरास 'दिवाण' अशी पदवी असून त्याजकडे अद्याप जागीर चालत आहे

(५४) जिल्हे नरवरपैकी ही पाडोन असून येथील कछवाय जातीचे रजपूत राजे हल्ली तेथे राहतात मराठ्याशी स्नेह न राहिल्यामुळें त्याला हे स्थलांतर करावे लागले

(५५) करडखो या गांवाचा पत्ता लागत नाहीं. पण सिरसी व पाडोणच्या समीपच कोठेतरी हे गाव असले पाहिजे असे वाटतें

कार्थं मात्र म्हणतात परंतु वाहेर वाहेरच टेहलवे वगैरे धुडून सांप्रत ती लाखांची मात्रं पटी[५६] केली असे' म्हणून तपसील लिहीलांत तो कळो आला. वरे ईश्वर इच्छेने संकट आहे यैसे नाहीं. 'तुमचा इलाज साम दाम दंड भेद विचारे त्यासी च्यार गोष्टी सांगोन साहेब कामास न चुका हा भरवसा असे. करार वायदे वरहुकुम अमलात येउन वसूल सत्वर होय ते गोष्ट करणे.' येविसी गै न करणे. जाणिजे छ * २७ जमादिलावल. तुम्हीच वायदेवंदी करते समई बोलले होतेस की खांमखा[५७] हप्त्या प्रो। वसूलांत आणितो ऐसे आणि आतां तपसील लिहितां हे गोष्ट तुम्हासच तरी बरी दिसतें की काय ? हा विचार आपल्या चित्तांत शोधून वालोन गेलेसे त्या प्रो। विल्हे सत्वर होय ते करणे. छ * मजकूर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




लेखांक [३२] श्री * संवत् १८०२ आषाढ शुद्ध ४
[ २२ जून १७४५ ]




राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राणोजी सिंदे दंडवत. सूमा सित आर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिा वर्तमान कळले. प्रांत मजकूरच्या करार प्रो। माहाराउ पैका देतो [असें] मात्र म्हणतांत परंतु निकाल होउन येत नाही; टेहलवे वगैरे त्यांजवरी बाहेर बाहेर पटी कांही करून देवणार, थोडक्याच दिवसांत थोडा बहुत पैका वसूलांत येईल, म्हणून कितेक तपसीलें वर्तमान लिा. तरी जे समई वायदे करार तुम्ही केलात तेव्हां वोललेस की निःसंषये मुदती प्रो। पैका खांमखा येईल. याप्रमाणे वोलोन आतां यैसे लिहितां अपूर्व असे! वरे संकट काय आहे! तुम्ही वोलल्या प्रो। वायदे चुकोन गेले. या उपरी 'त्यास परिछिन्नवादे वोध करून सरकारचा पैका लौकर वसूलांत येई तें

(५६) पटी म्हणजे कर, फाळणी.

(५७) खामखा म्हणजे अकारण, व्यर्थ, उगीच असा मूळार्थ आहे. पण मराठी पत्रव्यवहारांत भलत्याच अर्थी उपयोगांत आला आहे वेळशीर, विनचोभाट, विनचूक अशा अर्थी प्रयोग केला आहे

करणें. वरकड त्यांणी जागां जागां हंगाम करून खेळ करिता राहत नाहीं. तरी मागे लबाडी[५८] केली त्याचा सेवट काय जाला जे आता करितील! तरी त्याचे [?] त्यासच प्रतिबंध होईल. नुकसानी त्याचीच होईल. येणे प्रो विचार सामोपचारे सांगोन देहावर आणून स्वामीकार्य करारा प्रो अमलात येईल ते गोष्ट करणे. ढील न करणे.' जाणिजे छ २ माहे जमादिलाखर. माधोराम तिवारी याजकडील हवाला बाबत रुपये येक हजार हुजूर

---

(५९) त्याचा आमचा सला मामला असतां हें मकराई करितां तरी पुरवणार नाहीं [२२] × × कडे रवानगी करणे होती म्हणून मुकाम जाला × × सी कटकट जाली आधी तर गाव उजाड होता कडवळ (?) पळोन गेले हे वर्तमान कळलीयावर कूच करून × × देखील टाल्ली येसे असता त्याचेच मानिता? हे अपूर्व आहे! लष्कर जाता येता उपसर्ग लागतच आहे. जो करार जाला त्यात अंतर तिलप्राय होणार नाहीं [२६] रयेत लोक संतोषास्तव येऊन राहतात × × यासी विशाद येतो आले आहेत त्यांस जबरदस्तीने नेणार दूसरें सरकारचे महाल त्यातही त्याच्या पाठउन धामधूम मांडली असे येविसी बराच बोध करून वावगी वर्तणूक न करीत ते करणे त्याचा प्रांत जो आहे तेवढेच अनभऊन सुखरूप राहोन लावणी संचणी करीत येसे करणे नीतीच्या युक्तीने चालेत ते करणे [२९] × × येथे × × फोज सुधा जाऊन × × रुपये घेतले तालुक्याचा उपद्रव करून ठाणे हिरोन घेतले, गुरे नेली, नावा नेल्या तरी येविसी त्याचे अंगी तपसीलवार लावोन पैका, ठाणे, गुरे, नावा व जागा देत येसे करणे या उपरी तरी विचारे वर्तन करणे नाईके तरी केले पावतील [३०] जागा जागा हंगाम करून खेळ करिता राहत नाही मागे लबाडी केली त्याचे काय काय जाले? जे आता करतील त्यासच प्रतिबंध होईल सामोपचारे सांगोन देहावर आणणे [३२] मुलकात धामधूम करितात × × चाही उपद्रव लागतो सरकारची जागीर आहे तेथील लोक वसवास खातात [३८] गाव उजाड जाले × × येथील कमाविसदार आम्हाकडे आले त्याचे साहित्य करणे रयेतीची दिलभरी करून आबादी करणे मेणेचा उपद्रव लागतो तो न लागे ते गोष्ट करणे [४०] जेथवरी पुरवानी होई तेथवरी करणे थोडक्याच दिवसात पारपत्य होईल चिंता न करणे [४४] येथील राज्यास दंड बांधोन आमचे नामास ललल केले येसे असता दुसरा मनसबा योजोन × × पाठवितात त्याची सिद्धता करतच आहे? [५१] ज्या मध्ये लटिक दूर होय आण मुलकाचे संरक्षण होय ते करणे × × स गेले [५५] त्याचे सारष्ये कसे कोण प्रकारे जाले [५९] गावचे साहिल पुरवावे [त्यात] थोरपणच आहे. (६६) साहित्य केल्याने स्लाघ्येता असे [६७] × × चे येणे प्राते जाले त्यामुळे चार दिवस राहणे जाले तर फार उत्तम बंदोबस्त उत्तम प्रकारें करून घेणे [६८] रखवाली हरतऱ्हेने करितां फार उत्तम असे पुढेही न चुकणे [६९] येक निष्ठतेने साभत आहेत तरी बहुत उत्तम आहे यापेक्षा विशेष काय पाहिजे? [७२] यात त्याचेच कल्यान असे [७२] कदाचित त्या प्राते येणे झाले तर रखवाली केली जाईल [७३] थोर मनसूब्यामुळे या प्राते छावणी करून रहाणे जाले त्या प्राते आल्यावर जे जे मस्ती करितात त्याचे ही पारपत्य ईश्वर ईच्छेने होईल [९०] मराठेशाहींत दगा केला असता शासन करण्यापेक्षा समेट करण्याचे धोरण मराठ्यांच्या राजनीतीचे केंद्र होते असें म्हणणें निराधार होईल काय?

ण्याचे म्हणून लिा तरी ।' तो येथे दृष्टी पडत नाही. भेटल्यास उपरी दिल्हे तरी घेउं. बहुत काय लिहिणे हे विनंती.




लेखांक [३२] श्री * संवत् १८०२ आषाढ शुद्ध ६
[२४ जून १७४५]




राजश्री बाळाजी येशवंत पाा कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेाे राणोजी ।सिंदे दंडवत सुमा सित [अर्बैन] तुम्ही माधवराम त्रिवाडी बाा पत्र पाा ते पावले. 'राजश्री माहाराउजी वसूलाचे तरतूदेत आहेत म्हणून लिा. अपूर्व गोष्ट आहे! आज ताा तरतूद केली तिचा परिणाम हा जाला! पुढें जे जे करितील ते त्यासच कामास येईल. तुम्ही ही करारदाद केला तोही त्याच्याच भाषणांत मिळविला. उत्तम आहे. जेणे करून परिणाम वरा होईल ते [उभयतानी] करणे. माधवरामास कायसी [ली] त आणून पैका मागनात म्हणोन लिा. तर तेथें तुमचा यत्न काय! याविसी त्यारा लेहावे तर अधिकोतर द्वेश करणार. तुमच्या पैशाची वाट होत असेल तर करून घेणे.' जाणिजे राा छ * ४ जमादिलाखर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




लेखांक [३३ अ] श्री ~ संवत् १८०२ आषाढ शुद्ध ६.
[२४ जून १७४५]




राजश्री नारो विठल पो पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राणोजी ।सिंदे दडवत सुमा सित अर्बैन मया अलफ. राा माहाराउजी कोटेकर यानी माधवराउ ।त्रिवाडी येथे पाठविले सबब

की कोळ्याच्या आसाम्या पळोन पाटणास गेल्या त्यास समजाउन आणिनो परंतु कमाविसदार येउ देत नाहीत. तर येविसी पूर्वीच तुम्हास लि॥ आहे. त्याचे ते समजाउन नेत असतील आण आसाम्याही राजी होउन जातील तर आपण मना करावेसे नाही. त्यास जेथे सुख[६०] होईल तेथे जाउन राहतील. जाणिजे रा छ ४ जाखर. बहुत काये लिहिणे हे विनती.

श्री
मोर्तब
सुद

---

(६०) गुळगुळे संग्रहातील 'हिंदी व फारसी पत्रव्यवहाराच्या' रुमालात हें पत्र पहिल्या मोजणीत हातीं न लागता फार उशिरा म्हणजे राणोजीचीं सर्वं पत्रे छापली गेल्यानंतर सापडलें म्हणून लेखाक साधिता आला नाहीं सुयोगाने ते क्रमानुसार जमलें ही गोष्ट वेगळी स्वराज्यातील सौख्याच्या बळावर रयतेस पोटी धरण्याची मराठ्यांची नीति या पत्रावरून स्पष्ट होते हे निराळे सांगावयास नको



श्री राणोजी शिंदे यांची छत्री, मौजे मिर्जापूर समीप सुजावलपूर, प्रांत माळवा.
( लेखाक ३७ )

ॐ



# श्रीमंत जयाजी आपा शिंदे

## यांचा असल पत्रव्यवहार.

१८०२–१८१२ विक्रमी.

लेखांक [ ३४ ] श्री * संवत् १८०२ आषाढ

[ जून १७४५ ]

राजश्री[६१] नारो विठल कमाविसदार प्रो पाटण गोसावी यांसि

---

(६१) या पत्रात मिति किंवा संवत् जरी दिलेला नसला तरी 'तीर्थरूप बाबाचे पत्री वर्तमान लिहिलें आहे' एवढ्या संदर्भावरून हें पत्र राणोजी शिंदे जिवंत असता लिहिले असावे असें वाटते आणि त्या अनुरोधानेच ही तारीख ठरविली आहे पत्र असल आहे याविषयी मुळीच शंका नाहीं त्यावर सिक्का अथवा मोर्तब असते तर खात्री झाली असती 'तीर्थरूप बाबा' हें विशेषण पुढें आलें आहे, [ लेखांक ५० ] ते पाहता तत्संबंधींच मागील पुढील हें पत्र असावे व 'तीर्थरूप बाबा' ह्मणजे राणोजी शिंदेच होत अशी कल्पना होत नाहीं असें ह्मणण्यास सकृद्दर्शनी सबब असली तरी जरा खोल दृष्टीनें पाहूं लागलें असता कळून येईल कीं, त्या पत्रावर मोर्तब जयाजीचें आहे, अर्थात् राणोजीच्या पश्चात् जयाजींचे सिक्कामोर्तब तयार झाल्यावर 'तीर्थरूप बाबा' ह्मणजे राणोजी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ जयाजी[६२] सिंदे दंडवत विनती उपरी. येथील कूशल जाणून स्वकीये कूशल लेखन करीत जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले. येसेच आपणाकडील सकूशल वर्तमान लिहून सतोषवित जाणे. वरकाउ सर्व वर्तमान 'तीर्थरूपाचे[६३] पत्री लि॥ आहे त्यावरून कळो येईल.' या ननरी तुम्हास कागद दिल्हा होता त्याचे कांहीं वर्तमान लि॥ नाही, तरी ते लिहून पाठवणे. कळले पाहिजे. वहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ ३५ ] श्री *- संवत् १८०२ आषाढ वद्य ७
[ ९ जुले १७४५ ]

जमा पोते प्रांत कोटे गु॥ विसाजी पुंडलीक सुमा सित आर्बा मया अलफ. साल गु॥ पैकी जमा पोते रूपये २२,२७५ वावीस हजार पावणे तीनशे जमा जाले. छ* १९ जमाखर मु॥ उजन.[६४]

वार

---

शिंदे नव्हत तर अन्य कोणी तरी व्यक्ती त्याने वडील असली पाहिजे हा युक्तिवाद जसा विचारणीय आहे त्याबरोबरच जयाजींचें सिक्कामोर्तव तयार झालें नसता जें हे पत्र आलें त्यातील 'तीर्थरूप बाबा' म्हणजे राणोजी शिंदेच होत असें निश्चित होत नाहीं काय ?

(६२) हेच जयाजी आपा शिंदे राणोजींच्या पाच पुत्रांपैकी वडील पुत्र होत राणोजींच्या चिरंतपणींच त्यांच्या समागमें राहून यांनी अनेक शौर्याचीं कार्यें केलीं पण तत्संबंधीं पत्रव्यवहार सांप्रत उपलब्ध होत नाहीं.

(६३) 'तीर्थरूप बाबा' म्हणजे खात्रीने राणोजी शिंदेच होत [ लेखांक ३४ टीप ६१ ]

(६४) ही रसीद महत्वाची नव्हे पण यातील मुक्कामाचा निर्देश अत्यंत महत्वाचा असून त्यामुळे एक ऐतिहासिक कोडें उलगडणार आहे.

लेखांक [ ३६ ]  श्री  * संवत् १८०२ श्रावण शुद्ध ३
[ २० जुलै १७४५ ]



६५

राजेश्री बाळाजी येशवंत पो कोटे गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो  जयाजी सिंदे दंडवत सुमा सित आर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पा ते पावले. येवज पाठविला त्याची रसीद पोताची आलाहिदा दिली असे. येवज पाठवला त्यांत श्रीमंताचे [ पेशवे ] काय आमचा काय हे लिहिलेच नाही. येसे करित नव जाणे. दूरचा प्रसंग ज्याचा त्यास येवज द्यावा लागतो तर मुजर [द] घेऊन पाठवणे. वरकडही वसूलाची ताकीदीस न चुकणे. पूर्वी हुंड्या फिरल्या आहेत त्याचा निकाल करून घेउन येवज पाठवणे. जाणिजे रा छ १ रजबु. ॥ रा मेघशामजीनें लिा ले आहे त्यावरून कळेल. जाणिजे. बहुत काय लिा.




---

लेखांक [ ३७ ]  श्री  संवत् १८०२ श्रावण शुद्ध ४
[ २१ जुलै १७४५ ]




राजेश्री बाळाजी येशवत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो  जयाजी सिंदे दंडवत सुमा सित

---

(६५) हे पत्र जयाजीचें असून त्यावरील सिक्कामोर्तब राणोजीचे आहे अर्थात् राणोजी वारल्यानंतर हें पहिलें पत्र जयाजी शिंदे यांनी स्वतःचें सिक्कामोर्तब तयार झालें नसल्यामुळें वडीलाचा सिक्कामोर्तब वापरला आहे नवीन मुद्रा तयार होईपावेतो जुनी मुद्रा वापरण्याचीच पद्धत होती असे कळतें. [ लेखाक ३७, १४०, २२३ ते २२७ ] राणोजी शिंद्याचा पहिला सिक्का [ लेखांक ३३ ] पर्यंत संपला. हा दुसरा सिक्काही त्याचाच असून आकारानें पहिल्यापेक्षा किंचित् लहान आहे. [ लेखांक ३७ ] सिक्कामोर्तबासंबधी स्वतंत्र विवेचन करावयाचें आहे म्हणून येथें विशेष पाल्हाळ करीत नाहीं तथापि इतकें सांगावेसें वाटते कीं 'सिक्का आणि सिक्का स्वारी' असे जे दोन भेद केलेले आहेत त्याचा हा प्रकार पहावयास सापडतो [ लेखांक १०५, २५७, २५९ ]

अर्बैन मया अलफ. 'मौजे मिरजापूर[६६] प्रांत सुज्यावलपूर येथें तीर्थरूपास कैलासवास जाला. त्यास तेथे छेत्री त्या स्थलावरी करावयासी राजश्री गोरखोबा[६७] यासी सागितली असे. त्यास कारगर सिलाट उत्तम पाहिजे. तरी येक दोघे जण सिलाट जे मशारनिले आणवितील ते चौकससे पाहून सुजावलपुरास पाठवणे.' जाणिजे छ॰ २ रजब. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.

मोर्तब
सुद

---

(६६) मौजे मिर्जापूर उर्फ सुलतानपूर हा गाव परगने सुजालपूर [ हल्ली शुजालपूर ] शिंदेशाहींत असून हें त्याचें जुनें नाव होय हल्ली त्यास राणोगंज असें म्हणतात त्याचे कारण असें कीं, कस्बे शुजालपूरचे पश्चिमेस नेवाज नदीच्या काठी या गावात मुकाम असता राणोजी शिंदे [ याच्या पायास ] व्यथा होऊन तेथेंच त्यानी देह ठेविला त्याजागी त्याची 'ही जी छत्री' जयाजी शिंदे यानी बाधण्याची योजना केली त्या 'छत्रीबदल व तिचे समीप गंज आबादकरून' स्मारक अखंड राहावे म्हणून हा सबंध गाव पेशव्यांनी इनाम दिला [ शकावली ४ ] तेव्हापासून हें नवीन नाव प्राप्त झालें या पत्रावरून राणोजी शिंद्याच्या मृत्यूचा महिना निश्चित होतो खरा पण तिथि अनिश्चित राहते याविषयीं विचार केला तर राणोजीचे शेवटचें पत्र [लेखाक ३३] २४ जून १७४५ चे असून त्यानंतर जयाजींची पहिली रसीद ९ जुलै १७४५ मुकाम उज्जैनची आहे [लेखाक ३५] आणि हें पत्र, 'मिर्जापुर येथे कैलासवास झाला' असें स्पष्ट सागत आहे तेव्हा ९ जुलैच्या पूर्वी ही तिथि जाते उज्जयनीहून मिर्जापूर उर्फ राणोगंज ३० कोसाच्या अतरावर आहे तेथून उज्जयनीस येण्यासाठी निदान २ किंवा ३ दिवस तरी लागले असावेत आणि राणोगंज येथे अग्नि दिल्यानंतर रक्षा घेऊन जयाजी हे बहुधा उज्जयनीस राजधानीत तीर्थाच्या ठिकाणी उत्तरकार्य करण्याच्या हेतूने आले असे गृहित धरिले तर ६ किंवा ७ दिवस वजा करावे लागतील व तसें केलें तर ही तिथि २ किंवा ३ जुलै येईल या पलीकडे मात्र ती जात नाही असें सुचविण्यास सबळ कारण आहे, ते हें कीं 'तीर्थरूप राणोजी बाबा सुभेदार याची छत्री उजेन शहरी श्रीक्षिप्रा नदी तीरीं आहे,' असे स्वत जनकोजी व महादजी शिंदे [२२ सितंबर १७६३] स्पष्ट सागतात [ लेखाक १५६ ] देहावसान मिर्जापुरास झाल्याची साक्ष जसें हें पत्र देत आहे तसेंच [रक्षा घेऊन उत्तरकार्य] राजधानींत, तीर्थाच्या ठिकाणी 'क्षिप्रातीरी' होऊन ही निराळी छत्री बाधण्यात आली हें निर्विवाद आहे तेणेकरून वरील तर्क खरा ठरतो आजपावेतो या विभूतीच्या मृत्युसंबंधीं जो घोटाळा होता तो सपुष्टात येऊन एकदोन दिवसाची काय ती भानगड राहते प्रसंगवश काहीं दिवस अवंतिकावास घडला तेव्हाच हे गूढ उमजले होतें पण लेखी आधार त्यावेळी मिळाला नव्हता अलीकडे वरील असल पत्रें लाभली व गुळगुळे संग्रहाशींही संबंध जुळला त्यामुळे हें कोडें उलगडलें त्याबद्दल स्वर्गीय माधवरावमहाराज शिंदे विद्यमान असते तर खचित आनंद झाला असता आणि पुष्कर, शिवपुरी, बानवडीसारखें अवंतिकेंतील क्षिप्रातटाकीं रामघाटी या छत्रीचे भाग्य उदयास आलेलें पाहून डोळ्याचें पारणें फिटलें असतें अस्तु बाल महाराजाच्या हस्ते हा सुयोग यावा असा ईश्वरी संकेतच असेल !

(६७) गोरखोबा उपनाव भापकर याची कन्या भागीरथीबाई दत्ताजी शिंदे याना दिली होती या नात्याने ते श्वशुर होत वंशावळीवर याचा प्रकाश कसा काय पडतो हे वाचक वर्गांनी लक्षात घ्यावें

लेखांक [ ३८ ]                श्री            * संवत् १८०२ श्रावण शुद्ध १३
[ ३० जुलै १७४५ ]




६८

राजश्री बालाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो    जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन सित अर्बैन मया अलफ. 'रा म्हाहराउ याजकडून बुंधीच्या मुलकांत धामधूम करितात व रा उमेदसिंग याचाही उपद्रव लागतो. येसीयासी प्रां पाटण सरकारची जाहगीर[६९] आहे तेथील लोक वसवास खातात. तर तेथे रा नारो विठल याच्या तर्फेने जिवाजी अनंत आहेत ते तुम्हांस लिहितील. त्याचे हरयेकविसी साहित्य करित जाणे. प्रा मजकूरास उपसर्ग न लागे ते गोष्ट करणे. तुम्ही तो परामृप करीतच अहां, पुढेही न चुकणे.' जाणिजे रा छ· ११ रजब. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.




---

(६८) या तारखेच्या सुमारास जयाजीचे हे सिक्कामोर्तब तयार झाले. शिंद्यांचें कुलदैवत जो रत्नागिरीचा **'श्री जोतिबा'** त्याचेंच स्मरण सिक्यात सर्वांनी स्वीकारले आहे **'स्वरूपाच्या'** जागी **'लिंगाचें'** ध्यान केवळ जयाजीनीच धारण केले आहे या सिक्यासंबंधी दुसरी एक महत्वाची गोष्ट ओघाने निष्पन्न होते ती ही कीं, शिंदेशाही राज्यारोहणप्रसंगी मुद्रा स्वतंत्र तयार होत असून त्याविषयी कोणाची अपेक्षा करावी लागत नसे [ लेखांक १४०, २२३ ते २२७ ] जनकोजीचे पश्चात् हा प्रकार जरी दृष्टोपत्तीस पडत नसला तरी त्यात कोणी विशेषत्व नाही. गादीविषयी वाद उपस्थित झाल्यामुळे केवळ दिरंगाई झाली आहे, पण त्यावरून कोणाला पराचा कावळा करिता येणें शक्य नाही कारण हे प्रकरण चालू असताही पूर्वापार चालत आलेली मुतालकी सुरळीत कायम राहिलेली आहे [ शकावली ८ ] वारिस निर्णयासाठी जर मुद्रा स्तंभित राहू शकत होती तर मुतालकीसही तोच नियम लागू व्हावयास पाहिजे होता पण तसे काही झाले नाही यावरून वाचकानीच आपापलेपरी विचार करून पहावा

(६९) जयाजीनी नुसते जागीर म्हटले आहे पण महादजी शिंद्यांनी तर या पाटणास स्वराज्य असे नाव दिले होते कोट्याबरोबर बूंदीचाही संबंध शिंदेशाहीशीं झाला पण ही जागीर कशी मिळाली याचा सुगावा तूर्त तरी लागत नाही चर्मनवतीच्या काठी भेटी होऊन ' दक्षिणेचा ' थाट झाला त्यांत हा प्रसाद झाला असावा की काय ? [ फारसी बखर ] अस्तु याच जहागीरीची फडणीसी शिंद्यांनी बाळाजी गुलगुले यास प्रथम दिली होती तिजवर आपल्या समक्षतेत बाळाजीनें लालजीस दत्तक घेऊन कायम केलें होतें. [ लेखांक १०२ ]

लेखांक [ ३९ ] श्री * संवत् १८०२ श्रावण वद्य ८

[ ९ अगस्ट १७४५ ]




राजेश्री बाळाजी येशवंत कामदार प्रांत कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा सित अर्बैन मया अल्फ. प्रांत 'बूंदी व पाटणाकडील साकल्य वर्तमान रा जिवाजी[70] अणाजी याणी हुजूर तपसीलवार लिहून पा। त्यावरून कळले. ऐशास त्याच्या साहित्यास तुम्ही सर्व प्रकारे अहाच. त्यापेक्षा अधिकोत्तर माया धरून पाटणची आबादी राहे आणि पेस्तर ज्या कीर्दी होय ते करणे.' जाणिजे छ॥ २१ रजब. [71] वरकड विचार तरी जो जसे करील तैसे पावेल. बहुत काय लिा हे विनंती.




---

(७०) याच जिवाजीस 'जिवाजी अनंत' ही म्हटलें आहे [ लेखाक ३८ ] हे नारो विठ्ठल याच्या वतीने बूंदीस काम करीत असून त्याचा जयाजीशी प्रत्यक्ष पत्रव्यवहारही होता पण त्याचें एकही पत्र उपलब्ध होत नाही

(७१) जयाजीचे 'मोर्तब' ३० जुलैचे सुमारें तयार झालें होतें [ लेखाक ३८ ] मग हे मोर्तब कसें आलें असा स्वाभाविक प्रश्न उद्भवतो त्याविषयी फारसा विचार करावयाचें कारण नाही शिंद्याकडे जी मुतालकी चालत होती तिचे हें 'मोर्तब' आहे मुतालकीचा 'सिक्का' व 'मोर्तब' वेगवेगळें होतें व तीं क्वचित प्रसंगी उपयोगात आलेली आहेत असें पुढील भागात पहावयास मिळेल त्या मुतालकीचें हें मोर्तब असल्यामुळे शंका घेण्याचें प्रयोजन नाही हें पत्र पाठविण्याचे वेळीं जयाजीचें मोर्तब [सकारण] जवळ नसेल म्हणून हे मुतालकी मोर्तब वापरलेले आहे यात काही वावगें झाले नाहीं स्वत चा आणि मुतालकीचा सिक्कामोर्तब वापरण्याचा अधिकार शिंद्यास होताच पण या [ दोषयुक्त ] प्रकारावरून शिंदेशाही व मुतालकी सिक्क्याचें अन्योन्य महत्त्व जाणणाऱ्या अधिकाऱ्याचे हस्तलाघवाच्या प्रादुर्भावाबद्दल थोडा विचार करण्यासारखा आहे 'मनुष्य स्खलन शील' या मानवी स्वभावाची प्रचिती तर होतेच पण इतिहास क्षेत्रांतील नाना प्रकारच्या तर्कवितर्कचमत्कारांचें मूळही यात पहावयास मिळतें इतकेंच नव्हें तर प्रसंग विशेषी 'शिष्यापराधे गुरोर्दण्ड.' या न्यायाची फळें भोगणारीं उदाहरणें कधीं दृष्टीस पडतात आणि स्नेहाची सागड विस्खळित होऊन ममतेचा व स्वधर्माचा कसा लोप होतो याची चागलीच कल्पना होते अस्तु. शिंदेशाहीत असले अप्रासंगिक प्रमाद फार थोडे घडले किंबहुना हा एवढाच अपवाद आहे व तो सिक्का लावणाऱ्या अधिकाऱ्याचा दोष आहे हे निराळें सागावयास नको.

लेखांक [ ४० ] श्री * संवत् १८०२ भाद्रपद
[ सितंबर १७४५ ]




राजश्री बाळाजी येशवंत कादार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन सित अर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. 'रा उमेदसिंग हाडे [ वूंदीकर ] याने येउन वूंदी प्रांत धामधूम केली त्यामुळे पाटण व कापरण[७२] वगैरे सरकारच्या गावास उपसर्ग लागला म्हणून तेथील कमाविसदार आपणाकडे आले त्याचे साहित्य करणे ते वरचेवर करितो म्हणून लिा. तरी तुम्ही साहित्य केले त्याचे अपूर्व काय आहे ! तुम्हास साहित्य करणेच पडले. पुढे जेणेकरून गावाची आवादानी राहे आण निरोपद्रव होय ते गोष्ट करणे. मौजे दुवलाणा[७३] उज्याड जाले म्हणून वर्तमान ऐकले तर तुम्ही तेथवर जाउन रयेतीची दिलभरी करून गावची आवादानी करणे. मेणे वगैरे [चा] उपद्रव गावास लागतो तो न लागे ते गोष्ट करणे,' बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [ ४१ ] श्री * संवत् १८०२ आश्विन वद्य ४
[ ३ अक्टुबर १७४५ ]




राजेश्री बाळाजी येशवंत पा कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा सित अर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पा ते पावले. 'पा पाटण येथील साहित्ये तुम्ही आपले

---

(७२) कापरण हें गांव केशवराय पाटणच्या पूर्वेस सहा कोसांचे अंतरावर चंवलनदीचे पश्चिमेस आहे व तें हल्लीं वूंदी राज्यात आहे

(७३) दुवलाना हा गाव मेज नदीच्या उत्तर किनाऱ्यावर वूंदी राजधानीपासून ईशान्येस सहा कोसाचे अतरावर आहे

तर्फेने वर्तुतसे केले व पुढेंही करिना म्हणून जिवाजी अणाजींनी लिहिले तर ये गोष्टी चे अपूर्व नाही स्वामीकार्य जेथे ज्याने दर्टीस पडेल त्याने करावे. याचमध्ये सेवेचा मजुरा आहे. पुढेंही अंतर न करणे. कोटेकरानीं पटी करून दिली ते वसूल करितो' म्हणोन लिहा. 'तर त्यास राज्य करणे आण आम्हासी सलूख राखणे, परगणाची आबादानी करणे तर आमचा पैसा करारा प्रो आमचे न वारे येता टाकून द्यावा; नाही तेव्हा परिणाम कळतच आहे. साल मजकूरीही त्या प्राते यावेच लागते. ते पैका लौकर न देत [तर] फौज मुलकात येईल, खराबी होईल, लोकास नष्ट लागेल. [त्यास] आमचा उपाय नाही. ल्य प्रकारे रा। सुभेदारायानी आमचे येणे न होय ते करावे. रयेतीचा भोग सरला असेल तर ईश्वर त्यास तशी बुध देईल. तुम्ही [मात्र] स्मरणास न चुकणे. तुम्ही पूर्वी हुंड्या शाहरास पा। त्या माघारिया रा। फिरल्या. त्याची वाट करून घेणे पाटणकर जमीदार उमेदसिंगा वा। गेले. त्याणी लबाडी केली ते केली. तो प्रसंग तैसाच होता. याउपर ताकीद करून [ त्यास ] पाटणास पाठवणे. तुम्हाकडे वसूल जाला असेल तो आमचा वाटा व सरकारचा समाईक येवज असेल तो उजनीस पाउन देणे आण तपसीलवार लिहित जाणे. पाटण व कापरणे व दुबलाणे येथील परामृषास अंतर पडो देत नव जाहे.' जाणिजे रा। छ. १८ रमजान. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती. (श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [ ४२ ] श्री

* संवत् १८०२ आश्विन
[ अक्टुबर १७४५ ]

(श्री ज्योति लिंग चरणि त त्पर राणोजि सु। जयाजि सिंदे निरंतर)

राजेश्री शाळाजी येशवंत पा। कोटे गोसावी यासि

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहा। जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन सित अर्बैन मया अलफ. साधोराम त्रिवाडी याने हुंडी येक हजाराची दिल्ही होती ते शाहरीहून माघारी आली. कोट्याचा कारभार तीच्या झटा. वरे ईश्वर पारपत्य करील. हुंड्या साधोरामास देऊन त्याचे घरी माणसे बसऊन सर्वाईनी रुा खडाखडी घेणे. तैसेच तुम्ही गुदस्ता हुंड्या गोविंदरामाकडे पा। होत्या त्या माघाऱ्या फिरल्या त्याची वाट करून

घेतली असेल तो येवज व अलीकडील वसूल येसा सत्वर पाठउन देणे. आम्ही नरमदा[७४] उतरोन देशास गेलो. तिकडील वर्तमान घडीघडी लिहित जाणे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [ ४३ ] श्री * सवंत् १८०२ मार्गशीर्ष शुद्ध १
[ १३ नवंबर १७४५ ]




राजेश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा सित अर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाो ते पावले. जाल्या वसूलाचा हिशेब लिहून पाठविला तो कळला. परंतु त्याचा अर्थ येणें प्रमाणें आहे बितपसील.

पेसजी रूपये २३,००० तेवीस हजार पाठविले त्यामध्ये कनोजे-वोटके रूपये आठसे माघारे फिरविले ते तुमच्या मेघशामानी नेले नाहीत. त्याचे वट करून चालविले त्यास तोटा रूपये दोनसे आला तो येवज येणे. कलम १.

मागून दाहा हजाराचा भरणा लिहिला परंतु अदलबेगा[७५] चा अथवा गोविंदबाबा चा दोहीतून येकाचाही जाव नाही. तो आलियावर लेहून पाठउ. कलम १.

---

(७४) या पत्राचे साल आहे पण महिना नाहीं किंवा संदर्भ जुळण्यासारखा कांहीं मजकूरही नाहीं दसरा केल्यावर बहुधा नर्मदापार गेले असावे या अनुमानावरच केवळ महिना ठरविला आहे तो कदाचित् मागें सरेल पण पुढें जाणार नाही कारण १७४६ च्या एप्रिल महिन्यात जयाजी बुंदेलखंडाच्या मोहिमेस लगेच परत आले होते [लेखांक ४९]

(७५) हे मिर्जा अदलबेग उज्जैनवाले होत हे काही नवखे दिसत नाहीत उलट बराच परिचय प्रतीत होतो यावरून अवंतीकेत शिंदेशाहीचें ध्वजारोपण झाल्यापासून या घराण्याचा संबंध आला असावा असें वाटतें शिंदेशाहीच्या शीतल छायेत असली मोगल घराणी वास करीत असल्याची अन्य उदाहरणेंही आहेत हें घराणे महादजी शिंदे यांच्या वेळीं पुढें फार नावलौकिकास आलें याचा चिरंजीव मिर्जा अवदुल रहीमबेग महादजीच्या रंगीन दरबारी चित्रात बाळाराव दिवाणाबरोबर मागे बसलेला आहे हें मिर्जा घराणें जागीरदार असून हल्ली ग्वाल्हेरीस आहे

या खेरीज गुदस्ता हुंजूर झडतीस खर्च लेहून दिल्हा त्यांपैकी येवज येणे. कल्मे वितपसील.

रु २,५०० खासगत येवजपैकी तुम्हीं खासगत हुंडी केली ते परतली तो येवज येणे.
१४,००० समाईक हुंड्या पा त्या परतल्या. तो येवज येणे
१०० माधोराम त्रिवाडी याच्या मारफतीची हूंडी परतली ते येणे.

तीही कल्माचा दाखलाच पुरला नाही. तुमच्या हिसेबी मात्र जाणतो

सदरहू कल्माच्याविसीं येकदोन वेळां तुम्हास लिहिले परंतु जाबच लिहित नाही. अपूर्व आहे ! तुम्ही जमाखर्च लेहून दिल्हा त्यात जे रसदेकडे कल्मे लिहिली त्याचा परिणाम लागत नाही. तर हे गोष्ट कार्याची नाही. तर सदरहू कल्माचा पैका व जाबसाल पाठवणे. पुढें दुराशा लिहिली कीं मातबर येवज येईल त्याचा भरवसा काये धरावा हे कळतच आहे. स्वामीकार्यास तुम्ही चुकणार नाही. फौजही उत्तर प्राते सत्वरीच येती जाणिजे रा छ* २९ सवाल. ।* बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [ ४४ ] श्री * संवत् १८०२ मार्गशीर्ष
[ डिसेंबर १७४५ ]




राजेश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यासी.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेो जयाजी सिंदे दंडवत सुमा सित अर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लि॥ वर्तमान कळले 'दूदीस उमेदसिंग आला. त्याणे त्या प्रातात दंगा माडिला आहे म्हणून त्याजला कोटेकर याची पत्रे पा॥ आणि त्याजवळ वकीलही पा॥ असे' म्हणून लि॥. 'उत्तम केलेत. तुमच्याने जेथवरी पुस्तवानी होईल जेथवरी करणे. तो थोडक्याच दिवसात त्याचे पारपत्य ईश्वरकृपेने होईल. चिंता न करणे. कोटेकर याणी पटी करून दिली आहे. त्याचा वसूल होत असे' म्हणून लि॥. 'तरी उत्तम आहे. जेथवरी तुमच्या विच्यारे व त्याच्या संतोष करून पैका देतील तो घेणे. पेशजी तुम्ही जमाखर्चीं हुंड्या समाईक चौदा हजाराची येक रु व आमची

खासगत अडचा हजारांची या दोहींचा थाक शेहरी लागत नाही. तुम्ही याच्या मुबदला येवज पाठविलात नाही. हे अपूर्व असें ! या उपरी त्यांचा मुबादल्याचा येवज पाठऊन देणे व टिपेचा वसूल जाला असेल तो पाठवणे. पूर्वी पैका पाठविलात तो सरकारचा काय व आमचा काय तो तपसीलवार लिहिणे.।' बहुत काय लिहिणे हे विनंती




---

लेखांक [ ४५ ] श्री ∗ संवत् १८०२ मार्गशीर्ष वद्य १३
[ १० दिसंबर १७४५ ]




राजेश्री बाळाजी येशवत पा कोटे गोसांवी यांसी.

अखंडीत लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा सित अर्बैन मया अलफ. तुम्ही येकदोन पत्र पा ते पावली. 'रा महाराउ कोटेकराचे नष्टाईचे वर्तमान लिा की वसूला साठी जितके प्रयेत्न करायाचे तितके केले. कबज दो लक्षाचे दिल्हे. हवाले, [ट]वाले पटिया करून पाहिले परंतु कांही केल्याने पैसा वसुलांत येत नाही' म्हणून लिा. 'तर कबज लेहून देता. पैशा आगर माहाराउ दोनी हाती नाही. येसे असतां कबज देणे कोठील विचार ? दरबारात वदलामी. बरे पुढें तरी शाहणे होणे. वरकड त्याचे पारपत्य लष्कर आलियावरी जे होणे ते होईल. तुमच्या यु ∴ क्तिने जेथवर साहेब काम होईल तेथवर करणे. कसवे पाटण येथील साहित्य करून यात्रा भरविली. उत्तम केले. पुढेही हरयेकविसीं पाटणच्या साहित्यास न चुकणे. तुम्हांपासी पाटणचा येवज जमा असेल तो व कोट्याचा येवज आसेल तो उजनीस पाउन देणे.' जाणिजे रा छ∗ २७ जिलकाद. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती




पैवस्ता पुष्य वद्य दसमी. छ २३ जिल्हेज.
[ ५ जनवरी १७४६ ]

---

सांगत जाणे की केल्या करा नि॰ रांत तफावत जालिया मुल्काची आबादी राहू पावणार नाही. जो वसूल घाल तो घेतच आहो. याप्रमाणे त्यास वरचेवर सावध करीत जाणे.' आज ता। वसूल जाला त्यापैकी आपल्या वाटणीची हुडी दाहा हजार येक रुपयाची उजनीची केली म्हणून लि॥. तर तेथे जमा येवज जालिया चिंता नाही. पुढेही वसूल येईल तो वरचेवर तेथे पावीत जाणे. जाणिजे रा। छ * २६ मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती. (श्री मोर्तब सुद)

पैवस्ता छ ८ सफर फाल्गुण शुध १०.
[ १८ फरवरी १७४६ ]

---

लेखांक [ ४८ ] श्री संवत् * १८०२ चैत्र शुद्ध ८
[ १९ मार्च १७४६ ]

(श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जनकोजि सु त राणोजि सींदे नीरंतर)

राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुहूरसन [ सित ] आर्बा मया व अलफ. राजश्री तुकोजी पवार व जिवाजी पवार[७७] याच्या वांटणीच्या येवजाविसी तुम्हास रूबरू सागितले आहे की साल मजकूरचा जो येवज वसूल होईल त्याची वांटणी हिसेरसीद देत जाणे. हाली मारनिल्याच्या कमाविसदारास वांटणी देत नाही म्हणून विदित जाले. त्यावरून नि॰ हे पत्र सादर केले असे. जो येवज साल मा[ री ]वसूल जाला असेल त्याची वांटणी दर सदे रुपये ७ सात प्रमाणे देत जाणे. येविसीचा बोभाट फिरोन येउं न देणे. आमच्या रूबरू लाखा रुपयाची निशा केली होती त्याचा येवज वसूल जाला असेल त्याची वांटणी हिसे माफक देणे. जाणिजे छ * ७ रविलावल. ॥ याची वांटणी वावयासी अनमान सहसा न करणे. बहुत काय लिहिणेहे विनंती. (श्री मोर्तब सुद)

---

(७७) तुकोजी व जीवाजी पवार हे उभयता सख्खे बंधु असून तुकोजी वडील व जीवाजी धाकटे होते तुकोजी हे देवास मोठी पातीचे व जीवाजी धाकट्या पातीचे संस्थापक होत

लेखांक [४९]

श्री ⊱ संवत् १८०३ वैशाख शुद्ध ११
[ २० अप्रेल १७४६ ]




राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जयाजी शिंदे दंडवत सुमा सित अर्बैन मया अल्फ. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाले लिहिले की आपण कोणत्या प्रांते आहेत. काय वर्तमान हे तथ्ये लेहावयासी आज्ञा केली पाहिजे म्हणून लि॥. 'तरी सांप्रत बुंधेलखंड[७८] प्रांते असो. राजे जगतराज[७९] व सभासिंग[८०] दोघेही डागेमध्ये डोंगर राने पळत फिरत असेत. त्याजकडील सरकारचा अमल हली सालचा व गुदस्ताची बाकी येणे [ आहे ] सबब त्याचे ठाणे मातबर जेतपुर[८१] आहे तेथे मोर्चे लाविले आहेत आठां चौरोजा सत्वरिच सर होईल. या प्रांतेच याचा [ महाराव ] प्रांत कुली सोडउन सरकारचा ॥ अमल बसवणे [भाग] आहे.' तुम्हास कळावे म्हणून लि॥ असे. जाणिजे छ ९ माहे रविलाखर. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

(७८) या बुंदेलखंड प्रकरणासंबंधीं कांहीं असल कागद काव्येतिहाससंग्रहात प्रसिद्ध झाल्याचें समजतें [ राजवाडे ऐप्र खंड पृष्ट ५ ] परंतु ते दुर्मिळ असल्यामुळें वाचावयास सुद्धां मिळाले नाहीत तसेंच राजवाडेकृत मराठ्यांच्या इतिहासाची साधनें [खंड २,३,४,६,८,९], पारसनीसकृत 'भारतवर्ष' व विविधज्ञानविस्तारांतील 'पत्रें' व यादी हीं, देखील पहावयास मिळालीं नाहींत म्हणून संग्रहांतील पत्राधारेंच टीपा देणें भाग पडलें हें वाचकांनी लक्षात असू द्यावें

(७९) हे जगतराजसिंग सुप्रसिद्ध राजा छत्रसालसिंगजी बुंदेले याचे द्वितीय पुत्र असून त्यांचा मराठ्यांशी अति सलगीचा व्यवहार होता [ ब्रम्हेंद्र लेखांक २७ ] पण या वेळी खंडणीत कुचराई केल्यामुळें ही मोहीम करावी लागली असें स्पष्ट म्हटले आहे

(८०) हे सभासिंग राजा छत्रसालसिंगजी बुंदेले याचे नातु होते असें पारसनीस सांगतात [ ब्रम्हेंद्र लेखांक ३२ ]

(८१) जेतपूर हें शहर बुंदेलखंडात छतरपूर राजधानीच्या उत्तरेस १२ कोसाच्या अंतरावर आहे

लेखांक [५०] श्री * संवत् १८०३ वैशाख वद्य २
[ २६ अप्रेल १७४६ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसी

दंडवत सुमा सित [ अर्बैन. ] 'प्रांत बुधेलखंडचे वर्तमान तरी आम्ही जेतपुरास आलो. बुंदेले दोघे राजे डोगर राने डांगेमधे पळो लागले सबब ठाणे मारी मोर्चे लाविले. त्या उपरी राजश्री मल्हारजी होलकर व तीर्थरूप[८२] राजश्री बाबाही फौजेसुधां आले . सुरूंग लागोन ठाणे जेर जाले. येक सुरूंग तयार होता तो उडउन [ दिले ] त्याणेच ते घाबरे होउन कोल मागत असेत. परंतु वरकडही सुरूंग तयार जाले आहेत. सत्वरीच ठाणे मजकूर सर होउन प्रांत मारी सरकारचा अमल दरोबस्त करणे जरूर आहे.' तुम्हांस कळावे म्हणून लिा असे. जाणिजे छ * १५ रविलाखर. हे विनंती.

(श्री मोर्तब सुद)

---

(८२) राणोजी शिंदे तर जुलै १७४५ त वारले तेव्हां हे 'तीर्थरूप बाबा फौजेसुद्धां' कोणते आले ? राणोजीस कनिष्ठ अथवा जयाजीस ज्येष्ठ बंधु नव्हते अशी सर्वसाधारण समजूत आहे तेव्हा हें रहस्य, तसेच जयाजीच्या पश्चात् दत्ताजीनी 'श्रीमंत पाटील बाबा' या नावाने संबोधिलें आहे त्याचें सूत्र कसें लागावे ! [ लेखांक २६० ] वंशावळीचा आश्रय घेतल्यावाचून आणि राणोजी शिंदे यास साबाजी नावाचे कनिष्ठ बंधु होते असें मानिल्यासिवाय गत्यंतर नाही तसें ग्रहित धरल्याने ही दोन्ही कोडी सहज उलगडतात तीं साधार की निराधार आहेत एवढी खात्री मात्र करून घेतली पाहिजे त्या दृष्टीनें पाहिलें तर क्षीरसागरकृत वंशावळींत त्याचा उल्लेख नाहीं, राणोजींनी खत त्याचा उल्लेख करतांना हा संबंध दर्शविला नाहीं. [ लेखांक ४, ५ ] ही जी अडचण भासते ती लक्षात घेण्यासारखी आहे वंशावळीविषयी विवेचन करते वेळीं उलगडा होईलच पण राणोजींच्या संदिग्धतेवर विशेष जोर देण्याचे प्रयोजन नाही असें मला वाटते राणोजींनीं हें नातें दाखविलें नसलें तरी त्यांचे उभय चिरंजीव तर तसें दर्शवितात व त्यामुळें शंका निरसन होते की नाहीं ? दत्ताजी, केदारजी व महादजीप्रमाणेंच साबाजींनीही जनकोजीचाच सिक्का वापरला आहे [ लेखांक २६८, २६९, २७० ] अशा प्रकारे राजघराण्यातील पुरुष सिक्के वापरीत होते [ लेखांक २८२, २८३ ] यासिवाय विशेष विवेचन पुढे योग्य स्थली केले जाईल

लेखांक [५१]　　　　श्री　　　　+ संवत् १८०२ वैशाख वद्य २

[२६ अप्रैल १७४६]

पुरा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसी

दंडवत सुमा सित [अर्बैन]. तुम्ही येकदोन वेळा लिा की ' आम्हास व आपले कारभारी यासी राजश्री माहाराज विदा करून आपणाकडे पाठवणार आहेत म्हणून लिा तरी प्रान दुगाड ब्रातोनी व खिनाड पिंपळोद येथील राज्यास दड बाधोन आमचे कामास ललेल केले व आपणाकडील ताल्लुक्याचा कारभार अगत्राच अकुत्रिम येसे असता दुसरा गनमुबा योजोन तुम्हास येथे पाठवितात. त्याची सिधता होणे ते कळलच आहे.' जाणिजे छ * १५ राखर. हे विनती.

(श्री मोतिब सुद)

लेखांक [५२]　　　　श्री　　　　* संवत् १८०३ वैशाख वद्य २

[२६ अप्रैल १७४६]

राजश्री बाळाजी येशवत कमाविसदार प्रात कोटे गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुरसन सित अर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाा ते प्राा जाले. लिा वर्तमान कळले. ' कोटेकर याणी वराता करून दिल्ह्या आहेत. त्यास त्याचा गला जागांजागां त्याच्या राउताच्या हाते जमा करून विकरी त्याजकडूनच होऊन जो पैका वसूल होतो तो करून त्याच्याच मर्जीने असो. स्वामी सेवेसी अतर करीत नाही ' म्हणून लिा. तरी साहेबकाम जेथवरी होईल त्यास तुम्ही अंतर न करालच. येवज येतो तो उजनीस मिर्जा अदल्बेग यांजकडे पाठवितो म्हणून लिा ते कळले. उत्तम असे. छ * १५ रा [ खर. ] ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.

(श्री मोतब सुद)

लेखांक [५३] श्री * संवत् १८०३ श्रावण वद्य १४
[४ अगस्ट १७४६]




राजश्री बाळाजी येशवंत पा। कोटे गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो। जयाजी सिंदे दंडवत सुमा सबा आर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. रा। श्रीपतराम याज बा। सेरगड[३] प्रांतें गेलो होतो. जागा जागा वराता दिल्या होत्या त्यापैकी जो वसूल जाला तो वरचेवर उजनीस पावितो म्हणून लिहिले ते सविस्तर कळले. 'तर त्याजकडे वाकी काय आण सन सितचा करार काय? त्यामध्ये आज ता। वसूल काय जाला हे जाणत अहां. कालहरण मात्र करितांत. बरे. आम्हींही येक वरीस सरल देऊंन पाहतो. पुढे पारपत्य उत्तम प्रकारेच केले जाईल'. चिंता नाही. तुमच्याने युक्तीप्रयुक्तीने जे स्वामीसेवा होईल ते करालच. पुढें त्यांचे कर्तुत्वानुरूप होणे ते होईल. आमची छावणी येदा बुधेलखंडांत जाली. तमाम मुलकास कोल देऊन अमलाची जप्ती केली आसे. याच प्रकारे त्यासही [कोटेकरास] घडेल' जाणिजे. रा। छ * २७ रजबु. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




पो छ २१ माहे रजब. श्रावण वद्य ८ गोकुळाष्टमी
[२९ अगस्ट १७४६]

---

लेखांक [५४] श्री * संवत् १८०३
[१७४६]




राजेश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

(८३) पार्वती व पारवान या दोन नद्यांच्या मधील हा शेरगड तालुका पूर्वीपासून कोटा राज्यात आहे या तालुक्यात वाघ जास्त असल्यामुळें त्यास शेरगड असें नाव पडलें

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ जयाजी शिंदे दंडवत सुमा सबा आर्बैन मया अल्फ. तुम्हीं पत्र पाठविलें ते प्राप्त जाले. लिा वर्तमान अवगत जाले. 'रा भोपतराम यांसी पत्रे समाधानाची पाठवावी. त्याचा हेत आपल्या ठाई बहुतसा आहे' म्हणून लिा. 'येशास साकल्ये वृत्त राजेश्री मल्हारबानीं लिहिले आहे त्यावरून कळेल. इकडील वर्तमान तरी आमची छावनी येहा बुधेलखंड प्राते आली. जैतपूर तो अगोदरच घेतले असे. त्या उपरे ?? त्यांस गाठून अंतास माहग केले. तेव्हां मिनतवार होउन बोली चाली केली. कारभारी वेलेस [ वोलीस ] दिल्हे कुवर[८४] द्यावे तो दुर्बुध मनात आणून पळाले. त्याजमुळे इकडेच राहून त्याची पुर्तीं निगा करणे लागली.' तुम्हास कळावे म्हणून लिहिले असे. ॥ माहाराव स्नेह करणार म्हणून लिहिले तरी [ते] करतील तसे पावतील. बहुत काय लिहिणे हे विनंती.



लेखांक [५५] श्री * संवत् १८०३ कार्तिक वद्य ९
[ २७ अक्टुबर १७४६ ]

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रात कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन सबा आर्बैन मया अल्फ. तुम्ही पत्र कार्तिक सुध ७ † सप्तमीचे पाठविले ते कार्तिक वद्य ७ † सप्तमीस पावले. [त्यांत] लिहिले की 'राजश्री माहारावजी नाथद्वारास[८५] गेले आण

(८४) राजपूत लोकांत मुलास 'कवर', [ कुंवर ] नातवास 'भंवर' आणि पणतूस 'टवर' असे म्हणण्याची चाल आहे खंडणीसंबंधी सलगीनें समेट करण्याची सधी देऊन ओलीस कवर घेऊन हें प्रकरण आटोपावें असा भाव शिंदेहोळकराचा होता, पण ही अट बुंदेल्यास मान्य झाली नाहीं एवंच प्रकरण युद्धावर गेलें असें कळतें.

(८५) राजपुतान्यांतील वल्लभ सांप्रदायी लोकांचें नाथद्वारा हें केंद्र होय किंबहुना ही त्याची पंढरी म्हटली तरी चालेल बहुधा सर्व राजेरजवाड्याकडून या देवस्थानास वार्षिक देणगी मिळत असते तेणें करून याची सांपत्तिक स्थिति बरीच समाधानकारक आहे शिंदे सरकारातूनही या देवस्थानास वार्षिक उत्पन्न आहे [ ताजा भाग ४ पान १६५ ] मुख्य स्थान उदेपूर राज्यात आहे श्रीच्या दर्शनासाठीं महारावजी कोटेकराप्रमाणेंच इतर राजे [ उदेपूर, जयपूर व जोधपूरादि ] तीर्थयात्रें निमित्त तेथें जाऊन राजकीय उलाढालींचा खल करीत असत [ लेखांक ५९ ]

‡ १० अक्टुबर १७४६. † २५ अक्टुबर १७४६

रा भोपतरामास व आग्हास आपणाकडे रवाना केले असे. त्याची निष्ठा वहुत वहुतसी आहे की श्नेह करावा. तर याहून उत्तम काय आहे [ ! ] परंतु ज्याप्रमाणें बोल्तांत व लिहितात ते सत्प्रमाण असावे. तूर्त [ तुम्ही ] येणार तेव्हां सद्या रोकड येवज मातवर पाच ( येथून पुढील मजकूर गहाळ झाला आहे ). × × ×

पावेतो समागमे घेउन येत ते गोष्ट करणे. रिकाम्या गोष्टी कार्याच्या नाहीत. त्यानीं येकनिष्ठा प्रमाणिकता धरलिया येथूनही अंतर होणार नाही.' जाणिजे रा छ॰ २२ स[वाल] ‖ वहुत काय लिहिणे हे विनंती. 


पो छ २ जिलकाद. मार्गशीर्ष शुद्ध ४ बुधवार
[ ५ नवंबर १७४६ ]

---

लेखांक [५६] श्री * संवत् १८०३ कार्तिक वद्य १२
[ ३० अक्टूबर १७४६ ]




राजश्री बाळाजी येशवत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा सबा आर्बैन मया अल्फ. 'रा भोपतरामजी व तुम्ही समागमे हाजूर भेटीस येणार अहा. येशास खासा आम्हास घोडे उत्तम जरूर पाहिजेत. तरी भोपतराम यांसी तुम्ही सांगोन घोडे चांगले खासालायेक येथे आम्हा [ स ] वसावयाल्याख कार्यास येत, पसंत पडेत येस तुमच्या त्याच्या पारखीने योजोन अगत्य अगत्य वराबरी घेउन येणे. घोडे सुमारे २ दोन वहुत वहुत उत्तम अनवा. येसे जरूर योजोन वाा आंणणे. जाणिजे' छ॰ २५ सवाल. ‖ सदरहू घोडे नजरे वाबत आणणे. जर नजरेचे फुकट येतील तर आणणे. पैसा पडेल तर न आणणे. वहुत काय लिहिणे हे विनंती. 

लेखांक [५७] श्री * सवत् १८०३ माघ वद्य १३

[ २७ जनवरी १७४७ ]




राजश्री बाबाजी येशवत गोसावी यासि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुमा सबा आर्बेन मया अल्फ. तुमचे पत्र आले ते पावोन लेखनार्थ अवगत जाले 'येसीयासी येसीच तुमची पत्रे सरसाल पाच सात येउन चुकली की राजश्री मोपतरामजी भेटीस येतात. च्यार पाच लाख रूपये नख्त आणितात, पुढें जे आज्ञा होईल ते मान्य करितात तर यास खानरेजमेची पत्रे पाठवावी, मुलकारा उपसर्ग न द्यावा याकरिता आज ता दरगुदर करित गेलो की पैका मातबर येतो, पुढे सुरळित वर्ततात, येसे असता येकायेकी जाउन उपसर्ग कराया येणेकरून श्रीस व सर्वास माननार नाही. परतु कोटेकराचा कारभार [अ] विस्वासुक. तुम्हीही त्याचप्रमाणे लिहिता. गुदस्ताचे साल जाउन यदाही आज ता पावेतो मार्ग पाहिला. साप्रत दतिया[८६] वर आलो. दतियेकर जुजतील ते कळतच आहे रोख होताच येउन सलूख केला. पुढे दर मजल तुम्हाकडे यावे, तो मागती पत्र आले. हे जरूर जाणून साप्रतही तिकडे येणे मोहकूब करून तर्त कोच[८७] कनार प्राती काल क्रमणा करणे लागली. याउपर तुम्ही जरे येणे असेल तर मातबर पैका व रा मोपतरामजीस घेउन सत्वर येणे. के ता वळ वाफ्कळच धातुपोशणच करावेसे असिले तर परिणाम लागणे कलतच आहे. ज्यामध्ये त्याचा लटिक दूर होय आण मुलकाचे सरक्षण होय ते करणे'. ॥ मिती माघ वद्य * १३ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखाक [५८] श्री * संवत् १८०३ फाल्गुन शुद्ध ५

[ ३ फरवरी १७४७ ]

हिसेब प्रा कोटे येथील करार [ केला ] त्याचा तपसील सुमा सबा अर्बेन मया अल्फ

---

(८६) दतिया हें संस्थान बुंदेलखडात ग्वाल्हेर व झाशी याच्या मध्यभागी आहे

(८७) कोचकनार ह्यास अलीकडे कोचकाल्पी असेंही म्हणतात समथर राजधानीचे ईशान्येस आठ कोसांचे अतरावर जालोन जिल्यात हे गाव हल्ली आहे

कुल पंधरा १५,११,३०८।.

सोला लाख खंडणी पैकी बाकी राहिली. ७,६१,३०८।. हाती पाच दर १० हजार प्रा रूपये ५०,०००.

खडणी दर साल रुा साडे चार [लाख] पैकी सोडिले रुा लाख १,००,००० बाकी ३॥लाख दुसाला रूपये ७,००,००० हाती देणे नग २.

रुा १५,११,३०८।.

करार केला ता

स[वत] १८०३. ५,११,३०८। रूपये स[वत] १८०४. ५,००,००० रूपये. स[वत] १८०५. ५,००,००० रूपये

ऐकुण रुा पंधरा लक्ष अकरा हजार तीनसे सवा आठ किस्त प्रा देणे. सवाई [सिवाय] स[वत] १८०४ की खडणी साडे तीन लाख देणा. साल दर साल मि[ति] फा[ल्गुन] सुद ५ स[वत] १८०३.

---

लेखांक [५९] श्री * संवत् १८०४ वैशाख शुद्ध १
[ २९ अप्रेल १७४७ ]




राजेश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यांसि

अखडित लक्षी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुरसन सबा आर्बेन मया अलफ तुम्ही पत्रे अधिक वद्य नवमीची † पा ती छ २७ रबीलाखरी † प्रा जाली. लिा वृत कळले. बरे जे जाले ते जाले. त्याउपरी त्याचे सारथ्ये⁸⁸ कसे कोण प्रकारे जाले ते तपसीलवार लेहून पाठवणे. तुम्हाकडीलही कारभार काय कोणे रितीने

(८८) कोटेकराप्रमाणे या वेळी नाथद्वाऱ्यास आणखी कोण कोण राजे आले होते व त्याचें काय खलबत झालें हें कळत नाहीं

† २३ मार्च १७४७ † २७ अप्रेल १७४७.

करीत अहां हे लिहिणें'. आमचे वर्तमान तरी 'बंगाले'" प्रांते जावयाचे प्रयोजन नाहीसारखे जाले. त्या प्रांते फौज कोणाची न गेली म्हणून माघारे फिरोन बघेलखडातून दर मजलीने उजेनीकडे येत न्ह असो' कळावे. म्हणून लिहा असे. जाणिजे छ * २[९] रावर ।" बहुत काय लिहिणे हे विनती.




(८९) 'पूर्वेकडील काशी बंगाला हा प्रदेश घेण्याचा बाळाजीचा [ पेशवे ] १७४२ पासूनच प्रयत्न चालला होता १७४७ त स्वत बाळाजी काशीत जाऊन आला, असें राजवाडे म्हणतो [ ऐप्र. पृष्ट ३८ ] मग या वेळी शिंदेहोळकराची विजयी जोडी अगदी सरहद्दी समीप आली असता व इंग्रजी सत्तेनें नांवही नसता अशी अमोल संधी वाया कशी गेली ? या पत्रातील शब्द योजना फार विलक्षण आहे त्याचे सरळ सार सागणें कठिण आहे 'प्रयोजन' मुळीच सभवनीय नसेल किंवा असून ही तें कदाचित् नाही सारखे झालें असेल या पत्रावरुन बाळाजींच्या या प्रयत्नाची कल्पना जयाजीस होती असे निष्पन्न होते की काय ? कदाचित् बाळाजीचा हा अप्रगटित अतिम हेतु असावा असें धरुन चाललें तर अशा प्रकारचा रंगपट पाहून बाळाजीनें प्यादा वाढवून शह देण्यास कमी केलें असतें काय ? 'त्याप्रातें फौज कोणाची न गेली म्हणून माघारे फिरोन येत असो' याचा मतितार्थ तरी काय ? अथवा सफदरजंग वजीर यानें १७५०त शिंदेहोळकरास अवदालीला तंबी देण्याकरिता बोलाविलें व त्यांनी अवदालीचा सरहिंदास पराजय केला हे उपकार स्मरुन सफदरजगानें काशी व प्रयाग ही दोन क्षेत्रें देण्याचें वचन दिले तेव्हापासून ही कल्पना उद्भवली ? [ ऐप्र पान ६५ ] याविषयी हे पत्र बरेच मननीय वाटतें सफदरजंग 'श्रीक्षेत्रीची पैरवी होऊ देत नाही' या एका पत्रातील वाक्यावरुन राजवाड्यानें केलेली दोन्ही विधाने निराधार वाटतात [ राजवाडे खड १ लेखाक २९ ] असल कागदपत्राच्या अभावाचा हा प्रभाव होय 'सर्व फौजा दिल्लीस जमा झाल्याचें वर्तमान अवदालीस कळताच कूच करुन माघारा गेला [ लेखाक ८६ ] दिल्लीस राहून आपले गुते उगवून घेतले क्षेत्र काशी दरोबस्त जागीर आपल्याकडे दिली फर्मान जालें महोलोमहाली मामलेदार ठेऊन मुलकास कौल देऊन वसाहत करवीत असो वजीर व जाठ प्रयागाकडे छावणीस राहिले' [ लेखाक ९० ] यावरुन 'क्षेत्र' म्हणजे '**काशीच**' व ती जागीर बादशाही फरमानाची ठरते 'प्रयागाचा' समावेश त्यात नव्हता रघुनाथराव दादाच्या पत्री 'श्रीक्षेत्री' चा जो अनेक वचनी प्रयोग आला आहे तो सार्थ आहे. काशी सिवाय 'वृंदावन' या क्षेत्राचे फर्मान बादशाहानी मराठ्यास या वेळी दिले होतें त्यासर्वात काशीचे महात्म्य जास्त म्हणून जयाजींनी तेवढाच उल्लेख केलेला आहे. चिंतोकृष्ण प्रभुने यानें जें या प्रसंगाचे वर्णन दिले आहे ते नि शंसय निर्णयात्मक वाटते.

लेखांक [६०] श्री * संवत् १८०४ वैशाख शुद्ध ३

[१ मे १७४७]

श्री जोति
लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
जयाजि शिंदे
निरंतर

राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी शिंदे दंडवत सुमा संमान अर्बैन मया अलफ. राजश्री सिवाजीपंत आवा यांजकडे पां मारची मजमूची आसामी समाइक साल दर साल चालत आहे. त्याप्रमाणे साल मजकूरीं करार असे. तरी सालाबाद ज्या प्रों मजमूचे वेतन समाइक चालते त्याप्रमाणें हलींही पावतें करणे. जाणिजे छ * १ माह जिल्काद. [?] ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

पैा छ १४ माहे जमादिलावल. वैशाख वद्य प्रतिपदा.

[१४ मे १७४७]

---

लेखांक [६१] श्री * संवत् १८०४ वैशाख शुद्ध ३

[१ मे १७४७]

श्री जोति
लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
जयाजि शिंदे
निरंतर

राजेश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी शिंदे दंडवत सुमा समान अर्बैन मया अलफ. राजश्री कासी नानाजी याजकडे आसामी पां मजकूरीं समाइक यैवजी सन सित व सन सबां दुसाला रूपये ६०० स[हा]से करार असेत. सदरहू ची सनद समाइक अलाहिदा आहे तरी स[हा]सें रूपये समाइक यैवजांत उगऊंन घेऊंन हजूर पाठवणे. सरकारांत आल्यावरी त्यांचे त्यांस पाठविले जातील. जाणिजे. छ* १ जिल्काद. [?] ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

पैा छ १४ माहे जमादिलावल.

---

लेखांक [६२] श्री * संवत् १८०४ आषाढ शुद्ध ५

[ १ जुलै १७४७ ]




राजश्री रामराव जिवाजी ज्ञानी महापुरुष[९०] गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत. सुमा समान आर्बैन मया व आलफ. तुम्ही क्षेत्र अवंतिकाचे मुकामी सरकारात येऊन विदीत केले की आम्ही कुटुंववच्छल क्षेत्री वास्तव्य करून आहोत परतु उपजीविकेस ठिकाण नाहीं. याजकरिता सरकारातून कृपाळू होउन काहीं उपजिविकेची योजना करून दिल्हिया स्वस्थ क्षेत्री स्नानसध्या करून सरकारची शुभचिंतन करीत जाउ. म्हणोन त्याज वरून मनात आणिता तुम्ही थोर महापुरुष कुटुंवसहित क्षेत्री वास करिता. तुमचे चालविले श्रीयस्कर जाणोन तुम्हाकडे क्षेत्र मजकुरी चौऱ्हशी जोतलिंगांचे पुजादीपकाचे काम सागोन वेतन वगैरे नेमणूक सालिना रूो १०० महाल मार वा ७५ रुपये धर्मादाये वार्षिक १७५.

येकूण पौणे दोनशे याची नेमणूक सरकारातून सालीना आसामी करार करून भोगवटी यासी वर्तमान भावी कादार प्रो हवेली उजन याचे नावे अलाहिदा सनदा भोगवटी यासी करून देऊन हे सनद तुम्हास सादर केली आसे. तरी तुम्ही सदरहू पाणे दोनशे रुपये सालिना घेत जाऊन चौऱ्हासी जोतलिंगाचे चौकसी राखीत जाउन व्राम्हणास धर्मादाय वाटीत जाणे सरकार सनदेपैकी वेतन व धर्मादाव तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादिवंषपरंपरा आनुभव घेत जाणे जाणीजे छ॰ ३ माहे रजव. बहुत काय लिहीणे हे विनती.




---

(९०) या ज्ञानी महापुरुषाचा वृत्तात काहीं कळत नाहीं जयाजी शिंदे याची साधुसंतावर भक्ति होती एवढी गोष्ट मात्र उघड होते [ या पत्रातील सिक्कामोर्तबाची रुजुवात पूर्णपणें केलेली नाही ]

लेखांक [६३] श्री * संवत् १८०४ आषाढ वद्य २
[ १२ जुलै १७४७ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा समान अर्बैन मया अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें ते प्रा जाले. तेथे लिा की कांही येवज घेउन आपण व रा भोपतराम येसे मुहूर्ते करून निघालो असो. लवकरीच उजेनीस येतो म्हणून लिा. तरी आम्ही आशाढी ⇡ आमवाशेपर्यंत उजेनीस असो. आमावाष्य आलिकडेच येउन पोहोचाल तरी बहुत जल्दीने येणे म्हणजे गांठ पडेल. नाहींतर येथून स्वार[११] होउन आमवाष्या जाल्यावरी जाणे होईल. जाणिजे छ * १४ माहे रजब. ⇡ बहुत काय लिहिणे हे ॥ विनती.




पैवस्ता छ २१ रजब. आषाढ वद्य ८ शनवार.
बरोबर कासीद रा बाबूराउ महादेव दूतलाणा.
[ १८ जुलै १७४७ ]

---

लेखांक [६४] श्री * संवत् १८०४ आषाढ वद्य ३
[ १३ जुलै १७४७ ]

पुरवणी राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गो यांसि.

दडवत सुमा समान आर्बैन मया अलफ. तुम्ही श्रावणच्या [ ? ] मुक्कामी आल्यावरी हिशेब लेहून दिल्हान त्यामध्ये औरंगावाधेच्या हुंड्या छेतीस हजार कांही जाजतीच लेहून दिल्हा. येशास तेथोन जाब आला त्यामध्ये तीन चार हजार कमी याचा विचार काय ? तुम्हाकडे जाब पूऱ्या हुंड्याचे आले असतील तरी ते जाबच [ येथें ] पाठऊन देणे.

---

(११) जयाजी दक्षिणेकडे चाभारगोधास या वेळां निघाले [ लेखांक ६६]
⇡ २६ जुलै १७४७

नाहीतर कोठे पैका भरला असेल त्याजपासून त्याजांनसी यैवज घेऊन पाठवणे. ये विसी ढील येकंदर न करणे. उजेनीस कांहीं येवज पाविला आहे म्हणून पत्रात तुम्ही लिहिलेत. तरी किती पैका पाठविलात तो तपसीलवार लेहून पा. त्या प्रा घेउंन को।त्याचा कारभार लटका. त्यामध्ये तुमच्या हाते जो पैका पाठवाल तो तम्ही चौकसी करून पाठवित जाणे. जाणिजे छ * १५ रजबु. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




लेखांक [६५] श्री * सवत् १८०४ आषाढ वद्य ३

[ १३ जुलै १७४७ ]




राजश्री बालाजी येशवत प्रांत कोटे गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा समान आर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते प्रा जाले लिा वृत कळले. लिहिले कीं रा 'मोपंतरामजी दर्शनास यावयास येतात. यैशास आमचा चलचलाव आहे. गांठ पडेल न पडे, न कळे. म्हणून जरूर जाणून सांडणी स्वार पा. [आहे] तरी त्यांची आमची गाठ पडला दिसत नाही. त्यांणीच यावेसे काय आहे ? सर्वा गोष्टीची गोष्ट जे केल्या कारभाराचा निर्गम मुदती प्रो जाल्याने न आले तरी चिंता काय ! बरे तूर्त तुम्हापासी लक्ष रुपये दिल्हे आहेत. त्यामध्ये होलकर पवार तेथील तेथेच देउन वरकड आमचा यैवज आग्हा कडे पावता करणे. तुम्ही श्राव णाच्या तळावरी [१२] करार केलात काये आणि आता लिहिता काये ? तरी केल्या करारा प्रो अमलांत येई ते करणे. लटक्या गुल्या [ग] पाडी मध्ये नफा काये असे ? ' जाणिजे छ १५ रजेब. ।' बहुत काय लिहिणे हे विनती.




पैा छ २० रजेब. आषाढ वद्य ७ शुक्रवार.

हाा सुतर स्वार.

[ १७ जुलै १७४७ ]

(१२) श्रावणाचा तलाव हें गाव कोठे आहे ते मिळत नाही

लेखांक [६६]　　　श्री　　　* संवत् १८०४ भाद्रपद शुद्ध ६

[ ३० अगस्ट १७४७ ]




राजश्री बाळाजी येशवत प्रात कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो　　जयाजी सिंदे दंडवत सुमा समान अर्बेन मया अलफ. तुम्हीं पत्र पों ते प्रा जाले. लिा वृत कळले. तुम्ही हुंड्याचा हिशेब पा तो पावला. वरकड लिा की आपण येवज घेउंन चांभारगोंदास [९३] यतों म्हणून लिा. तरी बहुत उत्तम असे. त्याचे त्याणीं आपले वोझे करारा प्रो हलकें केले तर त्यांचेच बरे असे. दुसरे साल मजकूर सन सबा पैकीं येक [१] रुपया वसूल जाला म्हणून पूर्वी लिा होतेंत. येशास त्यापैकीं कांही येवज पाठविलांत नाही यावरून अपूर्व वांटले ! तरी सदरहू येवज परभारेंच गवदाराचा [९४] त्यांचा त्यांस देउन आमच्या वांटणीचा पैका सत्वर पाठवणे. पाटण व कापरणच्या गांवचे साहित्य बरेसे करित असतासे रा पांडुरंगराम याणी लिा. तरी सरकारचा मामला सर्वत्र येक. जो माया धरून सरकार कां 卍 [मा] ची पेरवी करील तोच आमच्या मायेचा. ज्यांच्या हाताखाले जें असेल ते त्याणे साहित्य पुरवावें [त्यात] थोरपणच आहे. जाणिजे छ * ४ माहे रमजान. ‖ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

(९३) चाभार गोंदें हे जुनें नाव होय यास हल्लीं श्रीगोंदें असे म्हणतात दक्षिणेंत या वेळी शिंद्याचें हें मुख्य ठिकाण होतें. तेथील पाटिलकी पूर्वपार शिंद्याची होती पुढें हा सबंध गांव पेठ मकरंदपूर सुद्धा १७५० त इनाम मिळाला तेव्हापासून आजपर्यंत तो शिंदे सरकारांकडे चालत आहे. [ शकावली पान ५ ] शिंद्याच्या कुलदेवतेच्या नावावरुन हें नामकरण झालें असावें व तें पानिपतचे पूर्वी झालेलें होतें [ चिंतोकृष्ण १५ जनवरी १७५७ ]

(९४) गवदार म्हणजे भागीदार असा बोध होतो.

लेखांक [६७] श्री ∻ संवत् १८०४ आश्विन वद्य ४

[ ११ अक्टूबर १७४७ ]

श्री जोति
लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
जयाजि सिंदे
निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा समान आर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते प्रा जाले. लिहिला अर्थ अवगत जाला. राजश्री माहारांवजी काही यैवज देउंन रा करणार दसरा जाल्यावरी स्वार होउन येनो म्हणून लिा. 'तरी बहुत उत्तम असे. येणेप्रमाणेच दोन च्यार वेळा लिहिलेत परंतु अमलात आणाल तेव्हा खरेसे दिसोन येईल. जेथवरी होइल तेथवरी येत्न कारालच. तुम्ही अळस न करासा भरवंसा असे. पा पाटण व कापरण व दुवलाणे वगैरे सरकारचे गाउ याच्या पुस्तवानीविसी तुम्ही रा महाराव यास व उमेसिंगजी यासी सांगोन तसदी त्याजकडून लागो देत नाहीतसे रा पांडुरगराम याणी लिा. तरी सरकारच्या कामास त्या प्राते तुम्हीच असा. न कराल तर अपूर्व आहे. साहित्य केल्याने स्लाघ्येता असे. या उपरीही हरकोणा कडून उपसर्ग काडी इतका न लागे ते करणे. भरवसा तुमचा आहे' जाणिजे छ * १७ सवाल ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [६८] श्री ∻ सवत् १८०४ कार्तिकमास

[ नवंबर १७४७ ]

श्री जोति
लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
जयाजि सिंदे
निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार रास्थान कोटे गोसावी यासि.

---

(९५) ईश्वरसिंगजी हे सवाई जयसिंगजी जयपूरकराचे वडील पुत्र असून वडिलांचे पश्चात गादीवर आले परंतु त्यांची कारकीर्द फारच लौकर संपली त्यानंतर त्याचे धाकटे बंधु माधवसिंगजी राज्यारूढ झाले [ Tod Rajasthan vol. ii. 298–99 ]

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य रनो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन समान अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. 'येक लाख रुपये दिल्हे. आणखी सरजाम करून द्यावा आण आपल्याकडे अम्हांस रवाना करावे यैसे रा माहारावजी यांच्या चित्तांत होते. यैसे जाणोनच अम्हीही कार्तिक वद्य ¶ दशमीचे. प्रस्थान करून राहिलो असतां रा ईश्वरसिंगजी[९५] बूंदीस आले त्यामुळे च्यार दिवस राहणे जाले.' म्हणोन लिहिले ' तर पा पाटण व तालुका कापरण येथील वदोबस्त उत्तम प्रकारेच करून घेणे. ' दुसरे येवज जमा जाला होता त्यापैकी तुर्त हुंड्या करून पाठविल्या त्रि तपसील रुपये.

| | |
|---|---|
| ३१,७९१॥= | यैवज उजनीस जमा केला. |
| १८,००० | हुंड्या रवाना औरंगाबाद. |
| ४९,७९१॥= | |

॥ येणे प्रमाणे येकुण पनास हजार सातसे येक्याणो रुपये दाहा आणेच्या पाठवल्या म्हणोन लिा तर अद्याप अम्हाकडे उजनीचा जाब व औरंगाबादेचा जाब आला नाही. जाब आल्याउपर तुम्हास लेहून पाठउ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

(श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [६९] श्री * संवत् १८०४ मार्गशिर्ष शुद्ध १४

[ ४ दिसंबर १७४७ ]

(श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर)

राजश्री बालाजी यशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्यं. स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा समान आर्बेन मया अलफ. तुम्ही पत्रे पाठविली ती प्राा जाहली. कितेक वर्तमान लिहिले ते कळले, राजश्री माहारावजीनी आपणाकडे यावयासी राा केले आहे. सत्वरिच येतो म्हणून लिा. तरी बहुत उत्तम असे. पौष्य मासातच इकडे आलेस तरी रेवे[९६] अलिकडे

---

(९६) नर्मदा नदी 'रेवाया उत्तरे तीरे कालिया दक्षिणेतीरे' हा पौराणिक मंत्र महाराष्ट्रियाच्या नित्य परिपाठातला आहेच.

¶ १६ नवंबर १७४७.

कटके [?] आहेत तो आलेस तरी भेटी होईल. नाही तरी रेवेपार उस्करे जाल्या नंतर तुम्हास मार्ग फुटणार नाही. अटपेल तरी सत्वर येणे. पा पाटण व दुबलाणे व कापरणचे रखवालीचे साहित्य हरतऱ्हेने कारितां म्हणून रा पांडुरंगराम याणी लिा तरी फार उत्तम असे. सरकारकामास तुम्ही है गै न करालसा भरवसा आहे पुढेही साहित्यास न चुकणे. छ + १२ जिल्हेज. ॥ फौजाही त्या प्राते सत्वरिच येतात. जे जे लव्हाड्या करितील त्यांचे पारपत्य येथायुक्त होईल. चिंता न करणे'. ॥' बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [७०] श्री * संवत् १८०४ पौष शुद्ध १

[२१ दिसंबर १७४७]




राजश्री बालाजी येशवत गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन समान आर्बेन मया आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिा की आपण स्वार होउन भेटीस येत होतो तो राजश्री ईश्वरसिंगजीचे येणे बूंदी प्राते जालें म्हणोन राहणे जालें. तर उत्तम गोष्ट केली. पा पाटण व ताा कांपरण वगैरे गांव आहेत येथील बंदोबस्त उत्तम प्रकारे करणें. दुसरे लिहिले की यैवज उजनीस पाठविला व औरंगाबादेस हुंड्या रवाना केल्या म्हणोन लेखन केले. तर आम्हाकडे जाब उजनीचा अथवा औरंगाबादेचाही नाही. तर तुम्हापासी जाब आला असला तर लेहून पाठवणे. नाहीतर ज्याचा दुकानची हुंडिया करून पाठविल्या आसतील ॥ त्यास तगा लाउन जाब आणून लिहिणे. याउपर जे वर्तमान होत जाईल ते वरचेवर लिहित जाणे. जाणिजे रा छ - २९ जिल्हेज. ॥' बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [७१] श्री * संवत् १८०५ चैत्र शुद्ध १३
[ ३१ मार्च १७४८ ]




राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसंन समान अर्बेन मया अलफ. रा लाला भगवानीदास व जोतसिंग वकील[९७] दिा माहाराव यांसी रूपयाचे वसुलाविर्सी सांगितले आहे. तर तुम्हीं रा माहाराउ यांसी माकूल करून सांगणे. जेणेकरून वसूल होउन रूपये हातास येत ते गोष्ट करणें. जाणिजे रा छ * १२ माहे रविलाखर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती. उभयताचे हरयेकविसीं साहित्य करणे. हे विनंती.




---

लेखांक [७२] श्री * संवत् १८०५ चैत्र वद्य १
[ २ अप्रैल १७४८ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा संमान अर्बेन मया अलफ. तुम्हीं पत्र पाा तेथें लिा की 'राजश्री माहांराउजी सरकारच्या कामाकाजास येकनिष्ठतेने सांप्रत आहेत. पैक्याचा निकाल करून देतों येैसे कित्येक तपसीले लिा. तरी बहुत उत्तम आहे. यापेक्षां विशेष काय पाहिजे ? यांत त्यांचेच कल्याण असे. आम्हीं तो तूर्त इंद्रप्रस्ता[९८] कडे गेलो. तुम्ही त्यास सांमदांम विचारे करून सरकारचा पैका वसूलात त्वरेने ये ते करणे.' वरचेवर वर्तमान तपसीलवार लिा जाणे. रा छ * १५ माहे रविलाखर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

(९७) कोटेकराकडील या उभयता वकीलांपैकीं कोणाचाही पत्रव्यवहार मिळत नाही
(९८) इंद्रप्रस्थ हे दिल्लीचें पौराणिक नावही मराठ्यांनी बरेंच वेळा वापरलें आहे.

लेखांक [७३]   श्री   * सवत् १८०५ वैशाख शुद्ध ११
[२८ अेप्रिल १७४८]




राजश्री बालाजी येशवत गोसावी यांसी.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य. स्नो   जयाजी सिंदे दडवत सुहूरसंन समान आर्बैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. 'रा महारावजी यानी कित्येक सामान व येक मातवर माणूस तयार केला आहे. आज्ञाप्रमाणे सरजाम करून द्यावा या तजविजेत आहेत. त्याची रखवाली केली पाहिजे' म्हणोन लिहिले. 'तर प्रस्तुत आमचा मुक्काम बनास नदी[९९] वरच आहे. येथून दो चो रोजा मनसबा करून कूच होईल. कदाचित कोटे प्राते येणे जाले तर रखवाली केली जाईल परंतु उगेच मुखे लाउनच गोड गोष्टी सांगतात हे कार्याच्या काये आहेत.' आज ता रूपये किती वसूल जाले ते लेहून पाठवणे जाणिजे. रा छ १० जमादिलावल. † बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [७४]   ॥ श्री ॥   * सवत् १८०५ आषाढ शुद्ध ५
[२० जून १७४८]




राजश्री बालाजी येशवत प्रात कोटे गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमांन्य स्नेह   जयाजी सिंदे दंडवत सुमा तिसा आर्बैन मयां अलफ. तुम्ही पत्र पाठविले. ते प्रविष्ट जाहले लेखनार्थ अवगत जाला. 'श्रीमंत साहेबी धार मांडवा सरकार खालिसा ठेऊन पवारास चाकर ठेविले. थोडिसी त्यास जागीर दिल्ही. हली बदनावरांत[१००] कविलसुधां पवांर राहिले. श्रीमत स्वांमी छ ३० ‡ जमादिलाखरी

(९९) बनास नदी राजपुतान्यातील ही नदी रामेश्वराजवळ चवळ नदीस मिळते

(१००) बदनावर हा महाल धारकर पवाराकडे पहिल्यापासून चालत आहे माळव्यात शिंदेशाही तहसील वडनगरचे पश्चिमेस व रतलामचे दक्षिणेस हा महाल आहे

‡ १६ जून १७४८

नालशां[१०१] हूंन कूच करून देशास गेले. आम्हांस हुजरातचा पथकें यैसे छावणीस राहवयाची आज्ञा केली. छ ४१ रबेवी चंद्रवारे आम्हीं उजेनीस फौजेसुधां आलो.' तुम्हांस कळावे यारतव लिा असे. प्रांत मां[र]च्या करारप्रमाणे पैका लौकर उजेनीस छांवणीमधे येई तें करणे म्हणजे तुमच्या चाकरीचा मजुरा असे. नाहीं तरी आम्हांस शब्द नाही. येविसी तुम्हांस निरोपाचे समई सांगणे ते सांगितले न्ह आहे. त्या प्रांतीचे वृत तपसीलवार लेहून पाठवित जाणे. जाणिजे. छ * ४ रजेव. ॥' राजश्री मल्हारबाकडील वर्तमान वरचेवरी लिहित जाणे. बहुत काय लिहिणे हे विनंती




---

लेखांक [७५] श्री * संवत् १८०५ आषाढ शुद्ध ६
[२१ जून १७४८]




राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुहूरसन तिसा आर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. 'राजश्री मल्हारजी होळकर याच्या लस्करांतून रा आबाजी[१०२] रघुनाथ आले. त्यानी वर्तमान सांगितले ते लेहून पाठविले त्या वरून सविस्तर कळो आले. याउपरही आणखी माणसे त्याच्या लस्करात पाठऊन खबर येत जाईल ते वरचेवर लेहून पाठवित जाणे.' येथील वर्तमान तर 'श्रीमंत तर देशास गेले.

---

(१०१) नालशा हें मराठी नाव होय माळवी लोक याला नालछा म्हणतात विंध्याद्री पर्वताच्या माथ्यावर असल्यामुळें हा महाल डोंगराळ असून तो धारचे राज्यात आहे

(१०२) याचें उपनांव निगडीकर. शिंदेशाहींतील सुप्रसिद्ध आबाजी रघुनाथ चिटणीस तो हाच होय. यावेळीं तो होळकराचे कमावीसदार कृष्णाजी गोविंद याच्या वतीनें गुमास्तेगिरीवर प्रथम कोट्यास आला [ ८ दिसबर १७४३ ] आणि तेव्हापासून सुमारें २० वर्षे त्याचा होळकराशीं संबंध राहिला पुढें याच्या स्वभाविक गुणाची पारख करून आलीजाह बहादुर महादजी शिंदानी त्यास आपल्या पदरी ठेवून घेतले व १७६८ त त्याला चिटणीशी दिली त्या पुढील त्याचा प्रकर्ष इतिहासभक्ताच्या परिचयाचा आहे ज्या वयोवृद्ध व अनुभवसिद्ध मुत्सद्यानें सतत पाच तपें मराठेशाहीची निस्सीम सेवा केली व राणोजीपासून दौलतरावपावेतों कारकीर्द पाहिली, त्या थोर पुरुषाविषयीं आपल्याला किती अल्प माहिती होती बरें ?

आमची छावणी उजनीस जाली आहे. तुम्ही कोटेकरासी साम दाम दंड भेद करून ज्या प्रमाणे रा अखेरामजी करार करून गेले आहेत त्याप्रमाणे वसूल करणे.' जाणिजे रा छ * ५ माहे रजब. ।' बहुत काय लिा हे विनती.




---

लेखांक [७६]                    श्री                    ॰ सवत् १८०५ आषाढ शुद्ध ६
[२१ जून १७४८]

पुरा राजश्री बाळाजी येशवत गोसावी यासि.

दंडवत सुहूरसन तिसा आर्बैन मया अलफ. वेदमूर्ति राजश्री विश्वनाथजी शास्त्री कासीकर यांचे सनदेचेविसी लिहिले. त्यावरून श्रीमताच्या सनदा करून पुर्वीच घेतल्या होत्या. त्या हाली पाठविल्या आसे. सनदा पत्रे २.

वार्षिक पत्र भटजीचे नावे १

वरात रा गोविंद कृष्ण कमाविसदार सस्थान उदेपुर रूपये ५० पनास रूपये सनद १

येणे प्रमाणे दोन सनदा पाठविल्या आसे, त्या वेदमूर्तीस पावत्या करणे. जाणिजे रा छ * ५ माहे रजब. ।' हे विनती.




---

लेखांक [ ७७ ]                    श्री                    ॰ आषाढ वद्य १२ संवत् १८०५
[ ११ जुलै १७४८ ]




राजश्री बाळाजी येशवत गोसांवी यांसि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमांन्य स्नो     जगाजी सिंदे दंडवत सुहूरसन तिसा आर्बैन अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री मल्हारजी होळकर यांचे

वर्तमान लिहिले ते सविस्तर कळो आले. याउपरीही त्याच्या लष्करांत कासिद पाठउन खबर आणून तपसीलवार लेहून पाठवणे. जाणिजे रा छ * २५ रजब. ॥ॱ खबर वरचेवरी लिहित जाणे. यानंतरी येदा छयावणीस राहिले. खर्चास नाही. माहाराव आमचा येवज देतील असे म्हणत होतो. पर ईश्वर त्यासी यश न देई. असो. थोर आहेत. उत्तम [दिसेल] ते करितील. हे विनंती

श्री मोर्तब सुद

लेखाक [ ७८ ]

श्री * श्रावण शुद्ध ३ सवत् १८०५
[ १७ जुलै १७४८ ]

श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन तिसा आर्बैन मया आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री मल्हारजी होलकर याचे वर्तमान लिहिले ते कळो आले. याउपरही कासिद जोडी त्याच्या लष्करांत पाठउन खबर आणून लेहून पाठवणे. रा अखेराम करार करून गेले आहेत त्याप्रमाणे अमलात आणून येवज पाठवणे. येदा छावणी माळव्या प्रांते जाली त्यामुळे खर्च भारी लागला आहे. तर येवज सत्वर यउन पोहचे ते गोष्ट करणे. जाणिजे रा छ * २ माहे सावान. ॥ॱ बहुत काय लिहिणे विनती.

श्री मोर्तब सुद

लेखांक [ ७९ ]

श्री * श्रावण वद्य ८ समत् १८०५
[ ५ अगस्ट १७४८ ]

श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुहूरसंन

तिसा अर्बैन मया अल्फ. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले. राजश्री मल्हारजी होळकर याचे वर्तमान लेहून पाठविले ते सविस्तर कळो आले. याउपरही त्याच्या लष्करांत कासिद जोडी मुजरद पाठउन खबर ठीक आणून लेहून पाठवणे. जाणिजे रा छ॰ २१ माहे रात्रान. ॥ खबर तहकीक होत जाईल ते वरचेवरी लिहित जाणे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती

श्री मोर्तब सुद

लेखांक [ ८० ] श्री + भाद्रपद शुद्ध ९ सवत १८०५
[ २१ अगस्ट १७४८ ]

श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवत गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुमा तिसा अर्बैन मया अल्फ. तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले. तेथे राजश्री मल्हारजी होळकर यांजकडील युद्धाचे[१०३] वृत लिहिले ते कळले आणखीही तत्वता वर्तमान वरचेवरी आणवीत जाऊन लेहून पाठवित जाणे. पैक्याचा विचार कांहीच साप्रत लिहित नाही. तरी काये तरदुद करित असा हे लेहून पाठविणे. जाणिजे छ॰ ७ रमजान. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.

श्री मोर्तब सुद

लेखांक [८१] श्री + सवत् १८०५ भाद्रपद वद्य ४
[ ३१ अगस्ट १७४८ ]

श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवत प्रांत कोटे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुमा

(१०३) मल्हारजी होळकर यावेळी कोठे व कोणत्या मोहिमेवर होते तसेच हे युद्ध कोणाशीं झाले हे कळत नाही

तिसा अर्बैन मया अलफ. तुम्हीं पत्र पां ती प्रा जालीं. सविस्तार वृत्तांत कळों आला व राजश्री नारो विठल याणींही सांगितले त्यावरून कळले. याऊपरीही तत्वता वर्तमान वरचेवरी [होळकरांचें] आणवित जाउन जलदीने लेहून पाठवित जाणे. वरकड राजश्री माहाराव्रजी याजकडील येकनिष्ठतेचा अर्थ लिहिला तरी बहुत उत्तम असे. या गोष्टीत त्याचेच कल्याण आहे. कराराप्रमाणे सरकारचा पैका सत्वर देत ते करणे. ॥ रा छ * १७ रमजान. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री मोर्तब सुद

---

लेखांक [८२] श्री * संवत् १८०५ भाद्रपद वद्य १४

[ १० सितंबर १७४८ ]

श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुमा तिसा आर्बैन मया अलफ. राजश्री येशवंतराव पवार याच्या तर्फेने साल मजकूरी राजश्री कृष्णाजी तानदेव याणी पा मां[र]च्या हिस्याची कमाविस केली असे. तरी पा मारच्या येवजी साल मा[र] सन तिसा बावत यैवजपैकी साल दर साल वांटणी बमोजिब हिसा त्यांजकडे देवणे. जाणिजे - छ २७ माहे रमजान. ॥ कृष्णाजीपंत आपले आहेत. तुम्ही व हे येकचित्त राहणे. विषेश काय लिहिणे हे विनंती.

श्री मोर्तब सुद

पौ छ २२ माहे शौवाल. आश्विन वद्य ९. बरोबर लक्ष्मणपंत.

[ ५ अक्टूबर १७४८ ]

लेखांक [ ८३ ]                श्री          * सवत् १८०७ आषाढ शुद्ध १०
[ ३ जुलै १७५० ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो     जयाजी सिंदे दंडवत सुमा इहिदे खमसेन मया अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें ते पा जालें. तेथें प्रांत मा[र]च्या पैक्या बाबत लिहिलें की 'राजश्री माहाराउजी याणी तफरीक करून दिल्ही होती त्यास राजा [ ले ] वगैरे प्रांत मारीं आले त्याजमुळें जो कारभार वसूलात यावा होता त्यास अटकाव जाला' म्हणून कितेक तपसीलें लिहिलें. तरी माहाराव साले साल पैका देतात देतात से तुम्ही वारवार लिहितच असता. आणि रूबरूही सांगत असता. त्याजप्रो हे ही गोष्ट सत्यच मानवी ? असो. याउपरी माहारायास पष्टच च्यार गोष्टी सागोन पैका सरकारचा कुली झाडयानसी करारा प्रो त्याजवळ ?? मागोन घेउन आम्हाकडे सत्वर येणे. राजश्री मल्हारराव होळकर व आम्हांस फौजसुधा त्या प्रातास[१०४] श्रीमत राजश्री पंत प्रधान स्वामी याणी रवाना केले असे. जलदीनेच त्या प्राते येणे असे. तरी तुम्हीं पत्र पावताच लिहिले प्रो सरकारचा यैवज कोटे बाबत करार बमोजिब झाडियानसी घेउन आम्हाकडे अडवे[१०५] येणे. ढील सहसा न करणे. जाणिजे छ॰ ९ माहे साबान. बहुत काय लिहिणे !' हे विनती.




---

लेखांक ( ८४ )                श्री          * संवत् १८०७ पौष शुद्ध १३
[ २९ दिसंबर १७५० ]

यादी जिनस प्रा कोटेपैकी गुा बाळाजी येशवत मा त्रिम्बक सभाजी सुा इहिदे खमसेन मया अलफ सन हजार ११६०. डागीणे रूपाचे वजन करून पोत्यास घेतले बारमासी तोळ.

---

(१०४) उत्तर हिंदुस्तान.

(१०५) सामोरे

८०९ बाजवट. ३

| | क्रोटेचे वजन. | पाटणीभार. | बारमासीतोले. |
|---|---|---|---|
| प्रा १ | २५८ | २६८ | २५७ |
| प्रा १ | २७१ | २८२ | २७० |
| प्रा १ | २८४ | २९३ | २८१ |
| | ८१३ | ८४४ | ८०९ |

पैकी वजन करारी बारमासी तोले.

३३२ कमल समेत वाटी व घोडा कुली वजन कोथ्याचे तोले ३३४
येकुण पाटणी साडे अकरा मासी वजन ३४८ यो बारमासी तोले. ४

११४१

येणे प्रमाणे वजन करून घेतले असे. छ * १० सफर. मुा घाट कुसला चमेली.[१०६]

---

लेखांक [८५] श्री * संवत् १८०७ माघ शुद्ध ७
[२२ जनवरी १७५१]




राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि:

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन इहिदे खमसेन मया आजफ. जखमी[१०७] तुम्हा समागमे दिल्हे त्यास खर्चास रूप्ये.

---

(१०६) घाट कुसला चमेली शिंदेशाहीतच चर्मनवतीचे काठी कोठे तरी असला पाहिजे पण तूर्त त्याचा पता लागत नाही

(१०७) हें युद्ध केव्हा, कोठे व कोणाशी झाले हे कळत नाही जखमी मात्र जयपुरास बाळाजी गुलगुल्याचे हवाली केले, असें समजते [लेखांक ८७] बनास नदीच्या मुकामाहून आलेल्या चितोकृष्णाच्या पत्रावरुन कळते की शिंदेहोळकर या वेळीं बुंदी व जयपूर या राज्यात असून त्यांनी सवाईजीपासून माधवसिंग व उमेदसिंग याचे गूते उरकून घेतले व इसरदे सनिध मुकाम केला [२५ मार्च १७५१] अर्थात युद्ध जयपूरकराशी झाले असावें.

३१ बारगीर.

१६ चांदखान जावगी.

१२ जखम वरी होय तो पावेतो दर माह द्यावे.

४ रो वीस रोजा छ १५ रविलावली.

१६

१२॥ राजजी गायकवाड बारगीर.

१० जखम वरी होय तो पावेतो दरमाह द्यावे.

२॥ रो छ १५ रविलावलपासून देत जावे वीस रोजा.

१२॥

२॥ निंबाजी जाधव रो छ १५ रविलावल वीस रोज देत जावा.

३१

६ हयात मोहलाददार.

५ जखम वरी होत तो पावेतो दरमाह

१ रो छ १५ रविलावलपासून वीस रोजा.

६

१० पाहुणा लष्करचा जखम वरी होय पावेतो देखील पोट दरमाह.

२३॥ सिलेदार.

१० राणोजी ढवळे जखम वरी होय तो पावेतो दरमाह देखील पोट रुप्ये.

१३॥ हरबाजी पवार.

१० जखम वरी होय तो पावेतो दरमाह.

३॥ रो छ ५ रविलावलपासून आठ रोजा देत जावा.

१३॥

२३॥

७०॥

हरवाजी पंवार येथेच राहील याचे रूपये तुम्हीं कोणांस कांहीं न देणे. वरकाडाचे देणे नेमणूक प्रमाणें पाठवणें.

येणे प्रमाणे जखमेस खर्चास व रोजमरा देत जाणे. दररोज खबर वखबर घेउंन + परामृप[१०८] करणे. जाणिजे रा छ * ५ रविलावल ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

(श्री मोतंब मुद्र)

---

लेखांक [८६] ॥ श्री ॥ * संवत् १८०८ जेष्ट वद्य ५
[ ३ जून १७५१ ]

(श्री जोति लिग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरतर)

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार सां कोटे गो यासि.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुहूरसन इसने खमसेन मया व आलफ. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले. आज ता वसूल जाला त्याचा हिशेब लेहून पाठविला आहे. पेस्तरही माहारावजी तरदुदेत आहेत. अखेरामजीस समागमे देउंन रवाना करितो म्हणोन म्हणतात, यास्तव येकटे येतां नये. त्यास समागमे घेउन येतो म्हणोन लिहिले. तर जो करार केला त्याचे साल गुदरोन गेले. दुसरे साल आले हेही अखेर साल जाले. अद्याप गत वर्षीचेंच रूपये वसूल जाले नाहीत. हे कोण गोष्ट आहे? या उपर त्‌हीं पत्र पावताच त्यास तष्ट लाउन दोन्ही सालचा वसूल करून घेणे. येथील वर्तमान विसी लेखन केले [पाहिजे म्हणून लिहिले.] 'तर दिलीस येउन नबाब वजीर व नबाब बहादर[१०९] याची भेट जाली. सर्व फौजा दिलीस जमा जाल्याचे वर्तमान आब्दालीस[११०]

---

(१०८) जयाजी शिंदे आपल्या पदरच्या माणसाची किती काळजी वाळगीत असत हें निराळें सागवयास नको भाऊबखरकाराने शिंद्याचे हे गुणानुवाद अनेक वेळा गाइले आहेत पदरच्या माणसाची ही गोष्ट झाली इतराचीदेखील इतकी काळजी वाहिलेली दिसते कीं प्रसंग आला तर प्रत्यक्ष पेशव्याची मनधरणी करुन त्याची असाध्य कार्येंही साध्य करुन देवविली याच गुणावर लुब्ध होऊन जो तो आपला जीव हातावर घेऊन शिंदेशाहीसाठीं झटत असे शिंदेशाहीचा केवळ स्तुतीपाठ गावयाचा उद्देश नसून जी कल्पना कागदपत्रावरुन झाली तिचे येथें दिग्दर्शन करीत आहे संपूर्ण पत्रव्यवहार प्रकाशित झाल्यावर हा प्रकार कितपत खरा आहे हें आपोआप उघड होईल

(१०९) नवाब वजीर म्हणजे सफदरजंग [ लेखाक ९६ ] नवाब बहादुर म्हणजे नवाब गाजीउद्दीन खान [ लेखाक ९८ ]

(११०) एहमदशाह अबदाली.

कळतांच कूच करून माघारा गेला. पंधरा रोजपर्यंत दिलीस राहून सर्व आपले गुंते[111] उगउन घेतले. त्याचा निरोप घेउन छ † १४ रजबी कूच केले. समागमे नबाब गाजुदी [ न ] खान यासही दक्षिणच्या सुभेदारीची वस्त्रे देउन घेतले आहेत. याउपर कांही गुंता राहिला नाहीं. सत्वरिच मजल दर मजल त्या प्रांतास येतो. तुम्हीं दोन सालचें रूपये वसूल करून ठेवणे. कराराप्रमाणे महाराव याणीं वर्तणूक केली तर उतमच आहे. आम्हासही हिन्दुस्थानात कोटे येयीलच काम आहे. येक वेळच सर्व बाकी भरून घेतली जाईल. चिंता काय आहे.' जाणिजे रा छ * १९ रजब. ‡ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [८७] श्री * संवत् १८०८ जेष्ट वध ५

[ ३ जून १७५१ ]

पुरवणी राजश्री दालाजी यशवत गोसावी यांसि.

रामराम सुमा इसंने खमसेन मया आलफ. यैवज वसूल जाला समाइक हिशेब लिहिला

---

(१११) अहदनाम्याचे ' १७५० ' म्हणून जें साल राजवाडे याने दिलें आहे [ खड १ लेखाक १ ] त्याची खरी तारीख आता या पत्रावरून स्पष्ट होऊं पाहते नक्की तारीख जरी आज ठरविता येण्या सारखी नसली तरी पंधरवडा मात्र निश्चित ठरविता येतो व तो १४ ते २८ मे १७५१ चा येईल यापूर्वी म्हणजे १७५० त तो जाऊं शकणार नाहीं कारण शिंदेहोळकरास जुलैचे आरंभी ' श्रीमंतानीं रवाना केलें ' [ लेखाक ८३ ] ते उभयता दिसंबरअखेर ' चंबल नदीचे कुमला घाटावर आले ' [लेखाक ८४] अर्थात् १७५० चा उत्तरार्ध चर्मनवतीचे काठींच सपला जनवरी १७५१ मध्यें चंबलचे उत्तरेस जयपूरासमीप कोठेंतरी युद्ध झालें [लेखाक ८५] त्यानंतर ' नवाब वजीर व नवाब बहादुर ' याच्या मध्यस्थीनें सुगळ 'बादशाहाशी शिंदेहोळकराची भेट झाली' त्या वेळी 'उभयतानीं पंधरारोजपर्यंत दिल्लीस राहून आपले सर्व गुंते उगवुन घेतले ' हे 'गुंते' म्हणजेच राजवाड्याचा 'करारनामा' होय असें चिंतो कृष्णाच्या पत्रातील सार व ह्या अहदनाम्याच्या अटी ह्याच्या साम्यतेवरून कळतें यालाच जयाजीचे फर्मान समजावयाचें कीं काय? [ लेखाक ९० ] तें निराळें असावें असें वाटतें जयाजी शिंद्यानी करार-नाम्याचा उल्लेख न करिता गुंत्याचा व फर्मानाचा नुसता निर्देश केला आहे पण चिंतोकृष्णानें जो साराश दिला आहे [ ३ जून १७५१ ] तो पुढें येणारच आहे त्यावरून याचा पूर्ण उलगडा होईल ' नवाब वझीर व नवाब बहादर ' हीं दोन्ही नावें एकाच व्यक्तीची होती असें राजवाड्यानें जे अनुमान केलें आहे तें योग्य वाटत नाही ह्या व्यक्ति एक नसून भिन्न होत्या ' नवाब वझीर ' म्हणजे सफदरजंग [ लेखाक ९६ ] व ' नवाब बहादर ' म्हणजे गाजीउद्दीन खान होय [ लेखांक ९८ ]

† २९ मे १७५१.

यापैकी आपली वाटणी किती. त्यापैकी ऐवज उजनीस[११२] किती पाविला हे तपसीलवार लेहून पाठवणे. जे लिहिणे ते तपसीलवार लेहून पाठवणे. त्यासारिख्या येथून वराता उजनीवर कराव्या लागतात. यास्तव सत्वर तपसील लेहून पाठवणे. जखमी जेनगरीहून समागमे दिल्हे त्यापैकी चांदखान व राजजी गायेकवाड दोघे मृत्य पावले. राणोजी ढवळे व शिवाजी जाधव उभयतां मृत्य पांवले त्यांची तटे येथे आहेत, त्यास खर्चास द्यावे लागते. न द्यावे तर कजिया करितात. येविसी आज्ञा काये म्हणोन लिहिले. तर त्यास आपल्यापासी न ठेवणे. उजनीस[११२] वाटे लाउंन देणे. याउपर त्यास आपल्याजवळ न ठेवणे. खर्चास देउंन आपल्याजवळ ठेवाल तर मजरा पडणार नाही. ऐसे जाणोन त्याची रवानगी करणे. जाणिजे रा छ * १९ रजब. ॥ हे विनंती.




---

लेखांक [८८] श्री * संमत् १८०८ जेष्ठ वद्य ५
[३ जून १७५१]

पुा राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यासि.

दंडवत सुमा इसने खमसेन मया अलफ. राजश्री यशवंतराव पवार व रा तुकोजी व जीवाजी पवार याजकडून प्रस्तुत कमाविसदार आले. त्यानी श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीची पत्रे आणिली आहेत की वाटणी दर सदे

१६. यशवतराव पवार वाटणी दर सदे.

७. तुकाजी पवार, जिवाजी पवार दर सदे.

---

२३

येणे प्रमाणे तेवीस रूपये दर सदे वाटणी देणे ह्मणोन लिहले आहे. येविसी आज्ञा

---

(११२) १७३१ पासून शिंदेशाहीची राजधानी अवंतिका नगरी झाली ती पुढें १८१६ पावेतो राहिली त्यानंतर लष्कर [ समीप ग्वाल्हेर ] राजधानी झाली ह्मणूनच या वेळीं शिंदेशाहीतील सर्व कमाविसदार तेथें भरणा पोहोंचवीत होते, युद्धातील जखमीही तेथेंच पाठविले जात असून दारुगोळा व बाण तेथेच तयार होत असत उत्तर हिंदुस्थानातून उजनीपावेतों येण्याजाण्यास कोटा हा नेहमींचा पडाव होता.

काय ह्मणानि लखन केले. तर को।त्याची खंडणी सोळा लाख जाल्यापासून आज ता। चालत आले आहे त्याप्रमाणेच हालीही चाटणी त्यास देणे. पुढे त्याची आमची गाठ पडल्याउपर समाजोन घेतच आहो. नर्त चालते त्या प्रमोच चालू देणे. जाणिजे रा छ ✻ १९ रजबु ।' हे विनंती.

श्री
मोगंब
मुद

---

लेखांक [८९] श्री संवत् १८०८ जेष्ट वद्य १२

[ ९ जून १७५१ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवत गोसावी यासि

सुमा इसने खमसेन मया अलफ. महाराज राजश्री रामसिंगजी[११३] याची कुमक करावी येविसी कोटेकर व सोपारवाले बूदीवाले यास पत्रे लेहून कासिद जोडी तुम्हा कडे पाठविली असे. बुंदीची पत्रे पावतील. सोपारकराचे पत्र तेली पावती करून उत्तर आणऊन पाठवणे जाणिजे छ ✻ २५ रजेब. ।' हे विनंती

श्री
मोगंब
सद

---

लेखांक [९०] श्री संवत् १८०८ आषाढ शुद्ध ६

[ १८ जून १७५१ ]

श्री जोति
लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
ज्याजि सिंदे
निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यासि

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुमा इसने खमसैन मया अलफ. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान अवगत जाहले प्रान मारचा ऐवज कराराप्रमाणे वसूलात अद्यापि येत नाही. अगर मुलकाचीही चाटणी द्यावयाचा विचार दिसेत नसे. ह्मणून कितेक तपसीले लिहिले. दुसरे त्याजकडील कारभारी

---

(११३) हे मारवाडचे राजे रामसिंहजी होत याचा पक्ष उचलून मराठ्याच्या वतीनं जयाजी शिंद्यांनीं या वेळीं मारवाडचे गादीवर त्यास स्थापन करण्याचे कामीं कोटेकर, सोपार व बूंदीवाले यास साह्य करण्यासाठी हीं पत्रें पाठविली परंतु दडनीतीचें अवलंबन करण्यापेक्षा सामोपचारें हें प्रकरण आटोपतें घेण्याचा आग्रह या राजपूत राजाचा होता कीं काय हें समजण्यास तूर्त साधन नाही

ही त्यासि करारा प्रा कांही स्पष्ट बोलो पावत नाही. येणेप्रमाणे लिहिले ते कळले. येशास 'त्याचे वरे तें आ[प]ल्या चितांत समजोन करारास अंतर करितात. यांत सरकारचा नफाच असे. परंतु तुमच्यानेंही त्यांसिं सरकारच्या आज्ञेप्रमाणे न बोलवे हे अपूर्व दिसोंन आले ? वरे. थोरा मनसब्यामुळे यदा या प्रांते पठाणाच्या[११४] मुलकांत छावणी करुन राहवेसे जाले. प्रांत माार पठाणावावत तालुका व क्षेत्र कासी[११५] दरोवस्त जाहगीर आपल्याकडे दिल्हे. फर्मान जाले. माहालोमहालीं मामलेदार ठेउन मुल्कांस कौल देउंन वशा त्‍ हात करवीत असो. वजीर व जाट यसे प्रयागाकडे छावणीस राहिले. आम्ही उभेता[११६] फौजेसह मउसमसावादेस[११७] छावणी केली. पेस्तर त्या प्राते आल्यानतर जे जे मस्ती करितान त्यांचेही पारपत्य ईश्वर इछेने होईल.' जाणिजे छ ४- ५ माहे सावान. "वरकड कितेक मजकूर लिहिला येसियास तुम्हास जाउन सा महिने जाहले तेंव्हा तुम्ही टुटपी पुरवणी लिहिली. हे अपूर्व आहे ! कारप्रमाणे पैका वसूलात अद्यापवर येत नाही तस्मात त्याच्या चितात सुरळित पैका द्यावयाचे दिसत नाही. अतःपर आम्हावरी शब्द नाही. अखेराम यासही पत्र पाठविले आहे. त्यास देउन जाबसाल करून उत्तर सत्वर पाठविणे. त्यासारिखी पैरवी करणे ते केली जाईल. करारा प्राो पैका ये [त] नसेल तरी

---

(११४) पठाण म्हणजे नजीवखान व त्याचे अग्रेसरत्वाखालील इतर रोहिले

(११५) 'सफदरजंग श्रीक्षेत्रीची पैरवी होऊ देत नाही' [ खंड १ लेखांक २९ ] या वाक्यावरून व ' श्रीक्षेत्री ' या अनेक वचनी प्रयोगावरून ' काशी व प्रयाग ' असें स्पष्टीकरण करून जी पूर्वपरपरा राजवाड्यांनें दिली आहे ती या पत्रावरुन निराधार ठरते 'क्षेत्र ह्मणजे काशी व ती जागीर वादशाही फर्मानाची' ठरते 'प्रयागाचा' समावेश त्यात नव्हता याची साक्ष हें पत्र देत आहे मग अनेक वचनी 'श्रीक्षेत्रीची' वाट काय ? तर तो प्रयोग निरर्थक नाहीं पण त्याचा अर्थ मात्र निराळा आहे, इतकेंच काय ते दाखवावयाचे प्रयोजन आहे राजवाडे याचे अनुमानानुसार काशी हे फर्मानातील एक क्षेत्र ह्मालें दुसरें मात्र ' प्रयाग ' नसून ' वृंदावन ' होतें त्यापैकी काशी मुख्य ह्मणून जयाजींनी तिच्यापुरताच उल्लेख केला आहे वास्तविक वृंदावनाचाही उल्लेख पाहिजे होता तो 'श्रीकाशी व वृंदावन येथील सनद पातशाहाची करुन घेतली' या चिंतो कृष्ण प्रभुने याच्या वाक्यात पुढे पहावयास मिळणार आहे [ जून १७५१ ]

(११६) शिंदेहोळकर

(११७) मउसमसावाद हें गाव फरुखावादच्या वायव्य दिशेस गंगेच्या पश्चिमेस ६ कोसाचे अतरावर आहे

दाहा हजार फौज पाठउन त्र्प मुलूक मारुन ताराज केला जाईल.' उत्तर सत्वर पाठविणे ।' बहुत काय लिहिणे हे विनती.




लेखांक [९१] श्री संवत् १८०८ श्रावण शुद्ध १३

[ २५ जुलै १७५१ ]




राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडीत लक्षमी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन इसने खमसेन मया आलफ. राजश्री मोहनलाल साहुकार उजेनकर निा लालजी सेठ औरंगाबादेकर याचे रूपये बिसभरजी सूरजकर्ण साहुकार कोट्यामध्ये राहातात त्याजकडे याचे रुपये किसनसाहे दरम्यान याबाबत हुडीचे रूपये १४०० चौदासे येणे आहेत [ ते ] तो देत नाही. नवदीगरीच्या[११८] गोष्टी सागतो म्हणाने साहुकार मजकूर यानी लेहून पाठविले. त्यावरून हे पत्र सादर केले आसे. तर तुम्ही माहाराव याच्या कानावर घालून बिस्वंभर सूरज कर्ण यासी ताकीद करून चौदासे रूपये वसूल करून देणे. 'साहुकाराचे साहुकारानी बुडविले हे कोठेही त्र्प येकिले नाही ! येसेच होते तर पृथ्वीचा नेव्हार कैसा चालता. यास्तव कोटेकर साहुकार यासी जरब देउन चौदासे रुा वसूल करून देणे. येविसीचा बोभाट फिरोन न ये ते गोष्ट करणे. जाणिजे रा * १२ माहे रमजान. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




(११८) नवदीगरी म्हणजे अधिकरणें.

लेखांक [९२] श्री * संवत् १८०८ श्रावण वद ९

[ ४ ऑगस्ट १७५१ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा इसंने खमसैन मया अलफ. जैनगर प्रांते तुम्ही व अखेराम बकसी यैसे येउन सरकारच्या यैवजाचा करार मदार वायेदा करून कितेक विचार बोलोन गेलेस. यैशास 'कोटे येथे गेल्यानंतर अवघ्याच गोष्टी विसरोन सरकारच्या कामाची कांहीच पैरवी न करितां सुस्ती करून त्या ग्रहस्तासी कांही बोलला न बोलेला. त्याचा जाबसालही फुकाचा न पाठविलात. हे अपूर्व आहे ! तुम्ही सरकारचे चाकर असोन त्यासी बोलावया तुम्हास त्याची भीड काय ? कार्यभाग आज्ञेप्रमाणे करार केला त्या प्रो त्याने निर्वाह करून दिल्हा तरी तेथे राहावे. नाही तरी तेथे राहावयाचे फळ काय होते ! हे आम्हास कळत नसे. पातशाही खालिसा मुलुक वगैरे तमाम श्रीगंगा वरपार[११९] सरकारचा अमल होत आला. मधेच कोटेवाला आम्हास इनामदार आहे की काय ! आमच्या मारफुतीने यैवजाचा वायेदा करार करून गेलेस तो चुकोन गेला. दसरा सनिध आला. याउपरी आम्हास शब्द नाही. येणे प्रमाणे त्यासी तुम्ही निर्भिडपणे बोलोन सरकारचा पैका झाडियानसी तुम्हाजवळ देतील तरीच तेथे राहाणे आणि तपसीलवार प्रत्योत्तर वसूल आल्याचे लेहून पाठवणे. यैवज तुमच्या हातास न येसे असेल तरी उठोन आम्हाकडे येणे. अखेराम ये येथे कितेक सचोटीच्या गोष्टी बोलोन समागमे गेला. त्याउपरी अखेराम यानी राजश्री नाहाराव यासी कांही भाषण जाहले न जाहले हे काहीच तुम्ही लिहिले नाही. तुम्ही गेलियास सा महिने जाले. येकदोन मात्र पत्रे आली. हे कोण गोष्ट आहे. आठ पंधरा दिवसाचे अंतरे सविस्तर वर्तमान लेहून पाठवावे. करारा प्रो देतात अगर नाही देत याचा कसा काय विचार तो लेहून पाठवणे. कराराप्रमाणे यैवज देत असतील तर तेथे रहावे, नाही तर तेथे हकनाहाक राहण्याचे प्रयोजन काय आहे ! अखेराम येथे आम्हाजवळी कितेक भाषण करून तेथे गेल्यावरी सारेच विसरले. त्याच्या चित्तात येत असेल की मागती फौज येईल तेव्हा त्यार

(११९) आरपार म्हणजे अलीकडे व पलीकडे हा हिंदी प्रयोग मराठीत घेतला आहे

गोड गोष्टी बोलोन काम करून घेउ. तरी आमचा कारभार येक वचनी. ज्याणे आम्हासी बोलावे तेणे प्राच करून दाखवावे. तरच बोलावे. नाही तरी कारभारात कशास यावे ! साहारायास पष्टवादे पुसोन तपसीले लेहून पाठवणे. तशीसारखी पैरवी करणे ते केली जाईल.' रा छ + २२ रमजान. |' बहुत काये लिहिणे हे विनती.




लेखांक [९३] श्री * संवत् १८०८ कार्तिक वद्य ६

[ २८ अक्टुबर १७५१ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यासि.

सुमा इसने खमसेन मया अलफ. 'आम्ही कार्तिक शुद्ध १३ । त्रयोदशीस श्रीगंगेस पूल बाधून पार उतरलो. पठाण व रोहिले वीस हजार फौज जमा जाहली आहे. रामगंगेचे[१२०] पलिकडे ते आहेत. आलीकडे आम्ही [आहोत.] त्याचे पायेदळ व काही फौज आलीकडे उतरून नदीच्या तीरी मोर्चे बदी केली आहे. नित्य त्याची आमची लढाई होत आहे. दाहा वीस घोडे नित्य पाडून आणितो, दाहावीस माणूस जिवेच मारितो. याउपर रामगंगेस पूल बाधून पार उतरोन ईश्वर कृपेने शत्रुचा नि:पात केला जाईल. पुढे जे वर्तमान होईल ते लेहून पाठउ.' जाणिजे रा छ * १९ माहे जिल्हेज. |' हे विनती.




लेखांक [९४] श्री * संवत् १८०८ कार्तिक वद्य ६

[ २८ अक्टुबर १७५१ ]




राजश्री बाळाजी येशवंत कारदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा

(१२०) रामगंगा ही नदी गंगेस कनोज जवळ मिळते

। २१ अक्टुबर १७५१

इसने खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले राजश्री महाराव श्री नाथद्वारास जाता समई कारभारी यास ताकीद करून गेले की कार्तिक ‡ पूर्णमे पर्यन्त याचे रूपये झाडून देणे त्यास वरून तहसील लागली आहे म्हणून लिा. तर पूर्णमा होउन चुकली यैवज ही तुमच्या हाताल असेल तो लेहून पठवणे. तपसीलवार वर्तमान रूपये किती आले पुढीस पैकी याची वाट काय केली हे लिहून पाठवणे. जाणिजे रा छ १९ * माहे जिल्हेज.  बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [९५] श्री * संवत् १८०८ पौष वद्य ११

[ १ जनवरी १७५२ ]




राजश्री बाळाजी शेशवंत गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नोा जयाजी सिंदे रामराम सुमा इसंने खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. माहारायाकडील तहसील चाली लागली आहे. पाहावे किती रूपये देतील हे नकळे म्हणोन लिहिले. तर करार बमोजिव रूपये दिल्हे तर उत्तमच आहे. नाही तर आम्ही त्या प्रांतास येतो. 'येथील वर्तमान तर पठान व रोहिले कोंडले आहेत. त्याची रदबदल लागली आहे की जीव[१२१] जगउन वरकड

(१२१) या अतर्वेदच्या मोहिमेचा 'वृतात यजमानाचें [ जयाजी ] पत्रीं बखरच पाठविली' होती असें रामाजी अनंत दाभोळकर सागतो. [ १७५१ ! ] ती बखर 'संग्रहात' सांपडती तर फार प्रकाश पडला असता शिंदेशाहीत बखरी लिहिल्या जात असत एवढी गोष्ट मात्र निश्चय होते. असली अमोल ऐतिहासिक रत्नें सांप्रत दृष्टीस पडत नाहींत ही गोष्ट वेगळी आहे अस्तु 'हिंदूधर्माभिमानी' मराठ्यानी शरण येणारास मरण न देता 'जिवदान' दिल्याचें हें एक उदाहरण झालें दुसरें हवें असेल तर तें कुंजपुऱ्याचें होय 'मुखीत्रण धरून तुम्हारी गौ येसे म्हणून [ सात आठ हजार ] निघोन गेले' असें चिंतो कृष्णानें त्या लढाईचें वर्णन दिलें आहे. [ ८ नवंबर १७६० ] राजकीय दृष्ट्या तें क्षम्य असो वा नसो याविषयीं प्रस्तुत विचार कर्तव्य नाहीं कपटघातादि कुटिलनीतीचे अवलंबन न करिता शूरवीरास शोभणारें हें अलौकिक औदार्य पाहून कोणत्या महाराष्ट्रियास गहिंवर येणार नाही ?

‡ २३ अक्टुबर १७५१.

सर्व घेणे येसी रदबदल लागली आहे. ते अद्याप आम्ही मान्य केले नाही. येथील निर्गम जाला म्हणजे तुम्हाकडे दर मजलीने येतो.' जाणिजे रा छ* २४ सफर. ।' बहुत काय लिहणे हे विनंती. 


---

लेखांक [९६]

श्री

* संमत् १८०९ चैत्र शुद्ध ६
[ १० मार्च १७५२ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा इसंने खमसैन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावलें. तेथे सरकारच्या पैक्याचा विचार काहींच लिा नाहीं. वारंवार तपसीलच लिहता. जे देउ दिलाउं म्हणतात तुम्हास आम्ही कितेक वेळां लिहित गेलो कीं कराराप्रमाणे येवज देतील तरी घेणे. पैका न देत तरी तुम्ही उठोंन हुजूर येणे. ते गोष्ट न करिता हरघडी मजकूरच लिहलें, लेहावे. हें अपूर्व असे, ।'आम्हाकडील कारभार इकडील गुंता उरकला साप्रत अंतर्वेदीत[१२२] आलो असो. नवाब वजीर अयोधेकडे गेले. पठान व रोहिले याचा सलूख नवाब्याच विचारें जाला. याउपरी येमुना पार होउन जलदीनेच येत असो. तरी तुम्ही सरकारचा पैका माहारावजी जवळ मागोन कुली झाडीयानसी घेउंन हुजूर लष्करास पुढे येणे. जरी येवज न देतील तरी आडवे लष्करास येणे. मग जे तरतूद करणे ते केली जाईल. याउपरी सुस्ती येकंदर न करणे.' जाणिजे छ * ४ माहे जमादिलावल. ।' बहुत काय लिहणे हे विनंती. 


---

(१२२) गंगा व यमुना या दोन नद्यांमधील प्रदेशास मराठे अतर्वेद म्हणत असत.

लेखांक [९७] श्री * संवत् १८०९ वैशाख शुद्ध ६
[९ अप्रैल १७५२]




राजश्री बाळाजी येशवंत पा कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा इसंने खमसैन मयां अलफ. हट्टु नाइक काहार नोकर सरकार याणे हुजूर विदित केले कीं आपण बेपारीपणा करित असतां माल घेउन प्रांत मजकूरीं गेलो होतो तेथें आपला माल निस्बत [जिनस]वार वितपसील.

१ रामकृष्ण चौधरी हवलदार दिा राजश्री माहारावजी वस्ती मौजे दिगोद[१२३] पां मार याणे खुशेरजावंदीने माल घेतला विताा रूपये.

४२५ नख्त रूपये ठेवीदाखल त्याजवळ.

१८०० माल दिल्हा येकूण किंाा रूपये.

११०० घोडा फुरोख्त कुंममेत सिकारपुरचा १ यो

४०० मसरू थान ४० यो रूाा

३० शालाजोडी ६ यो रूपये.

१८००

२२२५

असामी. १.

१. तुम्हाकडे काहार मजकूर याणे दिल्हे रूपये.

८३ रोख ८० जवळ तुम्हा दिल्हे ३

१||| कलमदान आगरे बाबत व नासदानी येाा

२५० बंगाली दाडी पालखीची १ यो किंाा

८ दोरवा जाम्यास घेतला किंाा रूपये मां इंद्रसिंग खीची असे.

३४२|||.

(१२३) दिगोद हें कोटा राज्यातील याच नावाच्या तेहसीलचें मुख्य ठिकाण असून तें कोट्या पासून पूर्वेस ६ कोसावर आहे

सदरहू खो कबज [ ? ]उमर २५ सालं तो तुम्ही फुसलाउन ठेविलात तो देणे

॥ तुमची आसामी १ सदरहू घेऊन दिगोढवाल्यापासून आपला पैका उगउंन द्यावा ह्मणून बोलते ते काम करणे.

---

२

येणे प्रमाणे सागितले तरी हा सरकारचा आहे. सदरहू लिहिल्या बमोजिब रूपये भरून हटु मजकूर याच्या पदरी घालून कबज घेणे. व पोरगा याचा यास देणे. ढील है गै सहसा न करणे. येविसी मौजे मारचा हवालदार चौधरी याविसी रा माहारायास हरे वजेने सांगोन त्यास जप्तीत आणून पैखा देवणे आणि तुम्हाकडे पैका व पोरगा आहे तेही देणे. जाणिजे छ :" ५ माहे जमादिलाखर. ॥' बहुत काय लिहिणे हे विनती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [९८] श्री * संवत् १८०९ जेष्ठ वद्य ३०
[ १ जून १७५२ ]

श्री जोति
लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
जयाजि सिंदे
निरंतर

राजश्री बाळाजी येशवत गोसावी यासी.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुहूरसन सलास खमसेन मया व आलफ. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले. पुर्वी कासिद पाठविला तो पावला नसल्यास्तव हाली कासिद पाठविला आहे. आज्ञाप्रमाणे वर्तणूक करू म्हणोन लिहिले. तर पुर्वी कासीद पाठविला तो पावला. त्याचा जाबसाल लेहून रवानगी केली. तो पावलाच आसेल. हालीचे वर्तमान 'तर राजश्री साबाजी पाटील [शिंदे] व राजेश्री राणोजी भोइटे[१२४] या समागमे फौज देउन ॥ मारवाडात रवाना केले आम्ही दिलीहून कूच छ १९ †रजबी केले. मजल दर मजल देशास जात आहो नवाब गाजुदीखान यासी दक्षिणच्या सुभेदारी[ची]वस्त्रे देउन समागमे घेतले आहेत. यास घेउन जात असो. तुम्हाकडे येदा येणे राहिले. तुम्ही मोघम लिहितां की बाहाराव यानी मुसदीयासि आमचे रूपये

---

(१२४) हा राणोजी भोइटे तडवळेकर बहुधा राणोजी शिंद्याचा आप्त असावा

† २३ मे १७५२.

द्यावयाची ताकीद केली आहे म्हणोन लिहिले. तर त्यानी कसी काय तजवीज केली ते तपसीलवार कांहीच वर्तमान न लिहिले. रा अखेरामजी करार करून गेले त्यास आज दोन वर्षे जाली. त्यामध्ये आज ता तीन रूपये मात्र वसूल दिल्हे. त्याचे प्रमाणिकपण कळू आले. बरे असो. ते गोष्टीची चिता काये आहे? येक वेळच पारपत्य केले जाईल. जाला वसूल यामधे आमची वाटणी किती यैवज उजनीस किती पावला हे तपसीलवार वर्तमान लेहून पाठवणे.' जाणिजे रा छ ~ २[८?] रजव. ।' वहुत काय लिहिणे हे विनंती. (श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [९९]

श्री * सवत् १८०९ अधिक आषाढ वद्य १२

[ २७ जून १७५२ ]

(श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरतर)

राजश्री बाळाजी येशवत गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दडवत सुहूरसन सलास खमसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. 'कोटेकराचे वकील समागमे आहेत. ब्यावऱ्यावर[१२५] मुकाम करून राहिलो आहो. पुढे कोणत्या मार्गे यावे म्हणोन लिहिले तर उदईक मुकाम आमचा लटेरीच्या[१२६] नजीक आहे. तुम्हीही त्याच मुकामी भेटीस येणे' जाणिजे रा छ * २५ साबान. ।' आम्ही दर मजल देशास जात आहो तरी सत्वर येणे. वहुत काय लिहिणे हे विनंती. (श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [१००]

श्री * संवत् १८०९ आषाढ शुद्ध ७

[ ६ जुलै १७५२ ]

जमा पोते प्रात कोटे गुा बाळाजी यशवंत सुहूरसन सलास खमसेन मया अलफ. सन

(१२५) ब्यावरा शिंद्याचे माडलिक राजे राजगडकर याचे राज्यातील याच नावाच्या परगण्याचे हे मुख्य ठिकाण आगरा मुंबई सडकेवर चाचड्यांचे दक्षिणेस १२ कोसावर आहे

(१२६) लटेरी. नवाब टोंक याचे सिरोंज परगण्यांतील हा एक मोठा गाव होय. हे सिरोंजचे पश्चिमेस १५ कोसाच्या अतरावर आहे

हजार ११६२. मा त्रिंबक संभाजी यैवजी सनवाद बाकी पैकी नख्त रूपये १५,००० अंखे पधरा हजार उत्तम पोत्यास भरले असेत. छ * ५ रमजान. मुकाम नजीक बेरसे[१२७] प्रा भुपालचा जिल्हा.

बार.

---

लेखांक [१०१] श्री * संवत् १८०९ आषाढ शुद्ध ११

[११ जुलै १७५२]

जमा पोते सस्थान कोटे गुा राजश्री बाळाजी यशवत सुहूरसन सलास खमसेन मया अल्फ सन हजार ११६२ यैवज सनवाद बाकी पैकी मा त्रिंबक संभाजी जमा नख्त रूपये १,००० येक हजार रूपयं पोत्यास चलनी भरले असे. छ * १० माहे रमजान. मुकाम नजीक बरखेडा.[१२८]

बार.

---

लेखांक [१०२] श्री * संमत् १८०९ आषाढ शुद्ध १२

[१२ जुलै १७५२]




राजश्री गोविंदराव सखाजी कमाविसदार पा पाटन गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन

---

(१२७) बेरसे यास हल्लीं बेरसिया असें म्हणतात पूर्वी हा परगना धारवाले पवार याजकडे होता. १८५७ च्या घालमेलीत धारकराकडून दूर करून भोपाळकर नबाबाकडे इंग्रजानी तो दिला तेव्हांपासून तो भोपाळच्या राज्यात आहे शिंदेशाहींतील जागीर मकसूदनगडचे दक्षिणेस व भोपाळचे नैऋत्येस हा परगना आहे.

(१२८) भोपाळ व बेरसियाचे मध्यें कोठे तरी हा असला पाहिजे. भोपाळराज्यांत सकर नदीचे कांठीं बरखेडा म्हणून एक गांव आहे खरें.



लालाजी वल्लाळ गुलगुले,
कोटा येथील शिंदे सरकारचे (दुसरे) वकील

सलास खमसेन मया व आलफ. राजश्री लालाजी[१२९] बलाल यांसी पशजीपासून 'फडनीसी' पा मारची आहे त्याप्रमाणे करार केली आसे. याचे हाते पा मारचे फडनीसीचे कामकाज घेउन यासी वेतन नेमणूकेप्रमाणे साल गुा खर्ची पडले त्या प्रोच साल मारी पावते करणे. पा मारचे यैवजी मजरा पडतील याचा हक दस्तूरी भेट पूर्वीपासून आज ता चालत आली आहे त्याप्रमाणे परभारे रयेत निस्बत साल गुा व साल मार चे देवणे. याचे वेतन साल गुदस्ताचे अद्याप दिल्हे नाहीं तेही पावते करणे. [पुढे] साल दर साल देत जाणे. नवीन सनदा [चा] उजूर न करणे. जाणिजे रा छ * ११ रमजान. १" बहुत काय लिहिणे हे विनंती.




बार.

[ सनद पाटण की फडनीसीकी छे ]

---

लेखांक [१०३] श्री संमत् १८०९ आश्विन शुद्ध ३

[ १० अक्तुबर १७५२ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोवी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा सलास खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे करार प्रा पैका माहाराया कडे मागत आहो. निशा जाल्यानंतर तांत्रार हुजूर लेहून पाठउ म्हणून लिहिले व बख्तसिंग[१३०]

(१२९) हा बाळाजी यशवंत गुलगुल्याचा दत्तक पुत्र यास बाळाजीनें आपले समक्ष स्वार्जित फडणीशी देवविली व स्वत वकीलीसहित कमाविसदारी करीत राहिला अशा प्रकारें लालाजीनें बरीच वर्षे वडिलाचे हाताखाली घालविलीं आणि अनुभव मिळविला. पित्याचे पश्चात् सर्व सूत्रें हातांत आल्याबरोबर त्यानें कारभार सुरळीत चालवून काहीं उणीव भासूं दिली नाहीं. किंबहुना 'बापसे बेटा सवाई' ही उक्ति खरी करून दाखविली, हें ह्या संग्रहातील १७६० पासूनच्या पत्रव्यवहारांवरून कळणार आहे.

(१३०) हे मारवाडचे राजे बखतसिंगजी राठोड होत याचे निधनानंतर मारवाडचे गादीविषयीं

राठोड मृत्यु पावला म्हणून लिहिले ते कळले. वहुत उत्तम असे. आणखीही जे वृत होत जाईल ते वरचेवरी लेहून पाठवित जाणे. व सरकारच्या पैक्याचा विचार वारंवार तोच लिहिता. तरी हे कार्याचे नाही. ज्या प्रो करार करून गेलेत त्या प्रो यैवज वसूलात येई ते गोष्ट करणे म्हणजे तुमचा मजुरा हुजूर आहे. जाणिजे छ * २ जिल्हेज. ॥ वहुत काय हे विनंती.

श्री मोर्तब सुद

---

लेखांक [१०४] श्री * संमत् १८०९ कार्तिक वद्य ११

[१ दिसंबर १७५२]

श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत ज्याजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा सलास खमसेन मया अल्फ. राजश्री येशवंतराव पवार याजकडून प्रांत मजकूरची कमाविस दूर करुन सो सोइराजी परशराम मशारनिलेनी पाठविले आहेत. यैगास गुदस्तापासून कमाविसदार त्यास असोन त्याचा हिसा त्यास पावला नाही म्हणून विदित जाले त्या वरून हे पत्र सादर केले असे. तरी राजश्री पवार यांचा हिसा जो वाटणी वसेल तेणे प्रमाणे सन इसनेपासूनच वाकी त्याजकडे वसूल पावे ते करणे येविसी ढिकत न घेणे. आकारास वसूलाच्या दर सदे रूपये १६ प्रो त्याचा हिसा आहे तेणे प्रो सन इसनेचे सालचे वाकीपासून त्यांची वाटणी होईल तो यैवज सोइराजी परशराम दिमत राजश्री घनसेट कुरंजे याजकडे पाववणे. जाणिजे छ * २४ माहे मोहरम. ॥ वहुत काय लिहणे हे विनंती.

श्री मोर्तब सुद

---

वाद उपस्थित होऊन विजयसिंगानीं गादी बळकाविली ती मिळविण्यासाठीं रामसिंगानीं मराठ्याशी राजकारण करुन स्नेह संपादून स्वपक्षास अनकूल करून घेतलें व हें कार्य सिद्धिस नेलें [लेखांक १३६]

लेखांक [१०५]  श्री  * संवत १८०९ जेष्ट शुद्ध ५

[ ६ जून १७५२ ]

राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसी

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो  जयाजी सिंदे रामराम सुा आर्वा खमसेन मया अल्फ. वो राजश्री भवानी शकर भठ तैलंग वर्णक्रमी यांची ठेवी· चिंतामण वोहरा याजकडे आहे. त्यास चार वर्षे जाली. रूपये अद्याप यांस पावत नाही म्हणोन वेदमूर्तीनी निवेदन केले. त्याजवरून हे पत्र तुम्हास लिा असे. वेदमूर्ती आमचे आश्रित यांचे परम अवष्यक जाणोन बोहरा मा[र] यास ताकीद हरवेजे करून साडे तीनसे रूपये यांचे वाजिवी आहेत ते यांचे यांस देवणे व भटजीची पावती घेउन येथे पाठवणे. ये विसी गै गुदर सहसा न करणे. फिरोन वोभाठ येउ न देणे. जाणिजे छ * ४ शावान. †[1] बहुत काय लिहणे हे विनंती.

†[1] हो रामाजी अनंत नमस्कार विनंती. सिका[131] पुढे गेला म्हणोन [या] कागदावरी न जाहला. तरी उजर न करावा. वेदमूर्ती वहुत थोर आहेत याचे कार्य अगत्यरुप करावे. आनमान कराल तरी तुम्हास बाबाच्या[132] पायाची शपत आहे. हे विनंती.

---

लेखांक [१०६]  श्री  * संवत् १८१० भाद्रपद १०

[ ७ सितंबर १७५३ ]




राजेश्री बाळाजी येशवंत कमाविसदार संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो  जयाजी सिंदे रामराम सुहूरसन आर्बा खमसेन मया व अलफ. राजश्री तुकोजी पवार व शिवाजी पवार वाटणी पेसजी दर सदे रूपये ७ प्रो आहे. आलीकडे कोट्याची खंडणी जाली त्यामुळे कमी वाटणी वसली होती. हाली खंडणी यैवज वसूल होउन चुकला आहे तर साल मा [र] जो वसूल येईल

(१३१) यशवंतराव पवार हे धारवाले होत

(१३२) पायाची शपथ देण्यासारखे हे 'वावा' वाळाजी गुलगुल्याचें कोण ?

†[1] हस्ताक्षर रामाजी आनंत दामोळकर.

त्याची वाटणी दर सदे रूपये ७ सात प्रमाणे देत जाणे. साल गुाची बाकी सन सलासची राहिली आसेल त्याची वाटणी लिहिल्याप्रमाणे पावती करणे. येविसीचा बोभाट फिरोन येउ न देणे. जाणिजे छ * ९ जिलकाद. ।' बहुत काय लिहणे हे विनती.



---

लेखांक [१०७] श्री * संवत् १७५२ कार्तिक वद्य ९

[ २७ अक्तुबर १७५२ ]

मा आनाम गोवर्धनदास विन रामचद चौधरी पा सुसनेर सरकार सारगपुर सूभा मालवा यांसि जयाजी सिंदे सुा आर्बा खमसैन मया व आलफ, समत १८१० निवाडपत्र[१३३] सादर केले येसीजे. तुह्मा व देवचद चौधरी उभयेताचा वडीलधाकुट पणाचा कजिया होता सबब हुजूर फिर्याद आला. त्यावरून तुम्हास पचाईत नेमून दिल्हे विताो.

१. हरबाजीराम कमाविसदार पा बडोद.
१. रामाजी दादाजी कमाविसदार पा. खिलचीपुर.
१. गिरमाजी जिवाजी कमाविसदार पा. सोयत
१. लाला भिकारीदास दिंमत लाल बोहरा साहुकार.
१. जीवाजी नरसिंह कुलकर्णी.

सदरहू पंचाइतानी कजिया मनास आणिला. गोवर्धनदास विन रामचद म्हणतो कीं महाददास देवचंदाचा पणजा याने आपल्या पणजास वडीलपण दिल्हे त्यावरून तीन पिढ्या खात आलो. साप्रत आठ दाहा वर्षे जालीं कजिया देवचद करू लागला. आम्हास खाउ देत नाहीं. येसे हुजूर विदित केले. त्यावरून पंचाईतास आज्ञा केली आसे तरी हरदोजणाचा कजिया मनास आणोन विल्हे लावणे. येसी आज्ञा जाहली. त्यावरून सदरहू पंचाईत याणी हरदो वादीयासी बोलाउन पुरसीस केली कीं येणेप्रमाणे सरकारातून आज्ञा जाली आहे. तरी तुम्ही आपलीयासी रजावंद आसाल तरी पचाईत करूं. येसे

---

(१३३) शिंदेशाहींत असलीं अनेक निवाडपत्रें असल्याचा शोध लागतो परंतु ती प्रत्यक्ष पाहावयास मिळालीं नाहींत हें निवाडपत्र बऱ्याच वर्षांपूर्वी सबंद पाहावयास मिळालें होतें व त्याची नकल ही करून ठेविली होती ती प्रस्तुत उपलब्ध झाली नाहीं ह्मणून मालकाजवळ जेवढें आता सापडलें त्याचीच नकल दिली आहे

बोलिल्यावर उभयेता वादे रजावंद होऊन जामिनकतबे व राजीनामे लिहून दिल्हे बितपसील.

राजीनामा बो. देवचंद

लिखतंग चोधरी देवचंद वे चोधरी माणक चंद आगे चोधरी गोवर्धनदास वे धरीत सिंग के हामारे वतन के कजियो पडो थो सो सिरकार श्री जीकीसु लाला भिकारी दासजी वगैरे पंच × × करे सो ह [मको] कबूल आनि [करार] सु उदेले सो सारा तोरा [?] माहे झूटे. मिती श्रावण सुदी [1] आठम संवत १८१०.

राजीनामा बो गोवर्धनदास.

लिखतंग चोधरी गोवर्धनदास व धीरतसिंग आगूं हमारे ओर चौधरी देवचंद माणकचंदसे वतन के बदले कजियो थो बरस आठ सें सो ब[?]त पंचपर ठैरी. लाला भिकारीदास वगेरे पंच आनसाफ करे सो कबूल. उजूर नाहीं. उजूर करे तो सारा तोरा माहे झूटा. मिती श्रावण सुदी आठम संमत १८१०.

जामिनकतबा बा रघुनाथ चौधरी.

राजेश्री लाला भिकारीदासजी वे सत पंच. आगूं लिखतंग करदियो चोधरी रघुनाथ पा दाहोद आगे पा सुसनेरका चौधरी गोवर्धनदास वा रामचंद इनका वे चोधरी देवचंद वे माणकचंद ईनका वतन चौधरातका झगडा है इसवास्ते हजूर आंगू आय थे. सत्रत्र पंचायेत वाजवी ठैरेगी तिस माफक गोवर्धनदास कबूल करेगा. इनसाफ हुआ उपरांत न माने तो हंम ईनका मन मनावे. सावन सुदी आठम मतंग चौधरी रघुनाथ पा दाहोद.

जामिनकतबा बो देवचंद.

लिखतग पा बडोदका डोडा रामसिंग. आंगे चौधरी देवचंद वे चौधरी माणकचद पा सुसनेरका आगे चौधरी गोवर्धनदास वल्द रामचंदके उतनको कजियो थो सो उतनकी सरकार श्री जीकी माहा करार कियो के पंच लाला भिकारीदासजी वगैर पंच आनसाफ करे सो कबूल है, जीकी जामिनी हमने लख देवी. आनी करार सेवाये उदले सो हम समजा देणो. मिती सावन सुदी आठंम संमत १८१० मतो डोडा रामसिंग उपर लिखे सो सही.

सदरहू प्रा उभयेतां वादे याचें राजीनामे जामिनकतबे लिहून घेतले. याउपरी हरदोजणास तकरीरा पुसिल्या कीं तुम्हीं किंनिमित्य भांडता ते पंचाचे हजूर सांगणें त्या वरून उभयेतानी तकरीर केली वितो.

---

[1] ६ अगष्ट १७५३.

तकरीरकर्द वो.

गोवर्धनदास वा रामचद लिहून दिल्हे येसीजे. देवचद याचा वडील माहदास याच्याने मेहनत होईना म्हणोन आपला वडील आमरदास, माहदास याचा धाकटा भाउ यासी वडीलपण देउन कागदपत्र आपणास करून दिल्हे. ते कागद राव रतन [सिंगी] याने आपला गाव सुसनेर मारला ते समई जलाले. त्यावर आपला पणजा आमरदास व आपला आजा नरसिंगदास व बाप रामचंद व आम्हीं येसे काम कारभार करीत आलो. सांप्रत आठ नव वर्षे जाली देवचंद याने आपणासी कजिया केला कीं वडीलपण आपले तुजला खावयासी समध नाही. येसा कजिया करून जोरावारीने वतन खाउं लागले. आपण उठोण श्रीमंत माहाराज राजेश्रीं आपा साहेब[१३४] सूमेदार याजपाशी जाउन फिर्याद जालो कीं आमचा इनसाफ करून देणे. त्यास आपले वडीलपण खरेखुरे आहे याची साक्ष प्रा मजकूरचे पाटील व तक्षीमदार चौधरी यासी बोलाउन पुसणे व कजिये रजिये पडले ते समई आपला बाप कजियात सामिल होउन कजियास खर्चवेच आपण पडिला तो दिल्हा. त्या सनदा बजिनस आहेत. त्याजमधे गोवर्धनदास विन रामचंद जमीदार म्हणोन नाव आहे. ते सनद बजिनस आणोन ह[ा]जिर करीन व प्रा मजकूरचे पाटील व तक्षीमदार चौधरी याचे मुखे खरे करून देऊ. न करू तरी भांडण भांडनो हे खोटे. हे लिहिले सही.

तकरीरकर्द वो.

देवचंद विन सुखदास तकरीर केली येसीजे. वडीलपण आपले. आपला वडील माहदास. त्याज धाकटा आमरदास. त्यास माहदास याणे काही वडीलपण दिल्हे नाही. कामकाज करणे ह्मणोन सांगितले. त्याजवर आमरदास कारभारी निघाला तो कामकाज करीत आला त्यापुढे आपला कोण्ही कजिया करावा तो न केला सांप्रत आठ नव वर्षे जाली. आपण कजीया केला की धाकटीयासी वडीलपण खावयासी दरकार नाही ह्मणोन आपण कजिया करितो. यास्तव गोवर्धनदास श्रीमत महाराज राजेश्री आपा साहेब सूमेदार याजपासीं फिर्याद जाला. तरी त्याचे काही वडीलपण नाही वडीलपण आपले आहे. हे खरे करून देऊ व आपल्या वडीलानी काही वडीलपण त्यास दिले नाही. आपलेच आहे. हे खरे करून देऊ. नाहीतरी भाडण भाडतो हे खोटे. हे लिहिले सही.

---

(१३४) आपा साहेब हें जयाजी शिंद्याचें टोपणनाव होतें. तसेंच जनकोजीस 'बाबा साहेब,' महादजीस 'नाना साहेब' अशी नावें होतीं हें पुढे कळेल.

येणे प्रा. उभयेताच्या तकरीरा घेतल्या. त्याउपरी पचाईतानी न्याये दोहीचा मनास आणिता गोवर्धनदासाने लिहून दिल्हे की आपला वडील आमरदास यासी माहदास याने वडीलपण दिल्हे. त्याचे कागदपत्र करून दिल्हे होते. ते गांव रावत रतनसिंग याने मारिला ते समई जळाले परंतु भोगवटा चार पीढ्या चालत आला आहे व कजिया रजिया जेथे पडिला तेथे आपले वडील करीत गेले. खर्चवेचही देत गेले. त्याची साक्ष प्रा मजकूरचे पाटील व आपले तक्षीमदार यासी पुसणे व सनदही आपल्यापासीं आहे ते बजिनस दाखउं. येसे लिहून दिल्हे. देवचंद यानेही लिहून दिल्हे. येसीजे वडीलपण आपले आहे. गोवर्धनदासाचे वडील कामकाज करते निघाले. तेच करीत आले. येसे लिहून दिल्हे. त्याज उपरी पंचाईतानी उभयेताच्या तकरीराची मखलासी मनास आणिता भोगवटी याची व वडीलपण दिल्याची सनद पाहावीसी जाली तेव्हा गोही व साक्ष प्रा मजकूरचे पाटील व तक्षीमदार चौधरी पा मजकूर यासिं पुसले विता.

| | |
|---|---|
| चौधरी दौलतसिंग पा सुसनेर १. | लखजी गुमास्ता दिा. कानगो व चौधरी पा मार. १ |
| चौधरी घासीराम पा सुसनेर १. | लालचद गुमास्ता दिा कानगो व चौधरी पा मार. १ |
| चौधरी पेमसिंग पा मजकूर १. | पटेल ब्रिदा मौजे सामपुरा १ |
| चौधरी जेचद पा मजकूर १. | जगाती मला × × १ |
| अनूपसिंग चौधरी पा मजकूर १. | कमा पाटील मौजे खनोटे पा मार १ |
| चौधरी केशरखा पा मजकुर १. | पटेल सामा मौजे करसूल्या हसतुमे १ |

सदरहू पाटील व जमीदार यासी पुसिले की गोवर्धनदास वा रामचंद याचे व देवचंद वा सुखदास याचे कैसे आहे ते सत्य स्मरोन सागणे. त्याजवरून त्या सर्वत्रानी सांगितले येसीजे गोवर्धनदास याचा वडील आमरदास व देवचद याचा वडील माहदास याच्याने कामाकाजाची मेहनत होईनासी जाली. याजकरिता माहदास व आमरदास याची मातुश्री लखा चौधरीन हे व माहदास याणी वडीलपण आमरदासास दिल्हे. त्या दिवसापासून आमरदास कामकाज करून लागला व माहदास यांसि गांव दोन मौजे ढंढेडा व मौजे बावडीखेडा २ येसे दोन गाव शेभर बीघे जमीन दिल्ही. त्याजवर कांही आपल्या आपल्यात कजिया जाला नाही. साप्रत मात्र देवचंदाने आट नव वर्षे कजिया केला. व कजिया रजिया वतनाविशीं पडेल तेव्हा गोवर्धनदासच सामल होता. खर्चवेचही यानेच दिल्हा. येणे प्रा आपल्यास विदित आहे. ते आपणास सागितले. येणे प्रा जमीदार

गोवर्धनदास वा रामचंद ह्मणतो कीं आपल्या वडीलास माहदास याने आपल्या वडीलास वडीलपण दिल्हे हे सत्य. देवचंद ह्मणतो कीं नाही दिल्हें. हे मिथ्या. येसे दिसोन आलि याउपरी हाजीर मजलसीने देवचंद मजकूरासी पुसिलें की तुझे गोही साक्ष व कागदपत्र दाखवणे त्याजवरून देवचंद मजकूराणे सरकार श्रीमंत राजेश्री सूभेदार साहेबाचे पत्र राजेश्री विठल येमाजी कमाविसदार पा मजकूर यासी आणिल होते ते दाखविले तो

राजेश्री विठल येमाजी कमाविसदार पा सुसनेर गोसावीं यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो. जयाजीं शिंदे दंडवत सुमा सित आबैन मया आलफ. गोवर्धन चौधरी कामकाज करीत होता त्यास सरकारात इनसाफ करून हली देवचंद चौधरी व मानीकचंद चौधरी याचे हाते कामकाज घेउन हक दामी दस्तुरी देवणे. जाणिजे. रा छ [1] २१ रज [ब] ह विनंती.

हे पत्र दाखविले. याचा अर्थ ध्यानास आणिला तो कमाविसदार मजकूरास लिहिलें कीं इन[सा]फ करून हक दस्तूर देवणे. येसी सनद.आहे. काही निश्चयेपूर्वक वडीलपण ठरले नाही. उधार राहिला याजकरिता पत्रावरून पंचाची निशा जाली नाही. तेव्हां साक्ष कोणते आहेत ते सागणे म्हणोन पुसिले. त्याने साक्ष पा मजकूरचे पाटील व चौधरी त्यानी साफ सागितले कीं गोवर्धनदास याच्या वडीलास वडीलपण देवचंद याच्या वडिलाणे दिल्हें व दोन गाव शंभर बीघे जमीन देवचंदाच्या वडीलास दिल्ही. हे वर्तमान पूर्वीच गोवर्धनाचे साक्षीचे समई सांगितले. सांप्रतही तेच सांगतो. येसे सांगितलियाउपरी पत्रानीही निशा जाली नाही व साक्षीनही निशा जाली नाही. तेव्हां देवचंद भाडण भाडतो ते मिथ्या. येसे परिछिन्न दिसोन आले. याजउपरी देवचंद यासी पुसिले कीं तुझ्या दोन्ही साक्षी न पुरल्या. येक कागदाची व एक ग्रामस्ताची. याउपरी काय विचार ? तेव्हां देवचद रजावंद होउन पूर्ववत चालत होते तेणेप्रमाणे मान्य म्हणोन कबूल केले आणि फारखती गोवर्धनदासास दिल्ही व गोवर्धनदास खरा जाला. त्याने पूर्ववत प्रमाणे कबूल करून देवचंदास फारखती दिल्ही. येसा उभयेताच्या फारखत्या परस्परे दिल्ह्या. त्याचा तपसील.

सूबेदारजी श्री जयाजी सिंदे.

लिखतंग चौधरी देवचंद वा सुत छत्रसिंग वा चौधरी मानकचंद पा सुसनेर सरकार सारंगपुर आगे चौधरी गोवर्धनदास वा रामचंजीके और हमारे चौधरातका बांटाको

[1] ९ अगस्ट १७४५.

कजियो थो सो सिरकार श्री सूबेदारजी इनके दरबार मां रदबदल पंडी सो हमने हमारी राजी होकर बांटो लियो तिसकी विदी गांउ तीन सिवाये और बीघा २०१ दोसो येक सिवाय जिसका तफसील मालेत बीघा १८६ येकसे छियासी आडान बीघे १५ पंधरे लिया तिसका तो.

३ गाव को तपसील चौधरी देवचद
मौजा ढंढेडा १ मौजा बावडीखेडा १ मौजे बहेरा १
सिरकारकी भेटसुदा गांव लिया.

१२६ धरती विगत चौधरी देवचद.
५६ का सुसनेर तियाई भाईचंद माफक तियाई देणा.
आडान १० मालेत ४६ वीघा.
७० मौजे आमला माहे बीघा तिहाई माफ.

१२६

७५ चौधरी माणकचद
४५ का सुसनेर माहे तिहाई लेणी
५ आडान
४० मालेत

४५
३० मौजे आमला माहे तिहाई माफ बीघा मालेत.

७५

२०१ गांव ३

आनी करार सिवाये उदले तो दरबार सारा तोरा को गुनेहेगार. पंच्यामां झूटो. मिती † सावन सुदी १२ संवत १८१० सन ११६०.

मतंग चौधरी देवचंद उपर लख्यो सो सही. १

सूबेदारजी श्री जयाजी सिंदे.

लिखतंग चौधरी गोवर्धनदास वा रामचंदजी पा सुसनेर सारंगपुर सूबे माल्वा आगे भाई देवचंद वा माणकचंदके बांटाको कजियो थो सो सिरकार श्री सूबेदारजी

† १० अगष्ट १७५३

श्री जी का दरबार में रदबदल पडी सो बाबद चौधरात सो हमने राजी होकर वाटो दियो तिसकी बीगत गांव ३ तीन दियो. और धरती बीघा दोसों येक २०१ बीघा तिसकी बिगत मालेतु विघा १८६ येकसो छियासी और आडान बीघा १५ पंधरे दिया तिसकी तपसील.

३. गांव की तफसील.

मौजा ढढेडा १ मौजे बावडीखेडा १ बहेरा १.

सरकारकी भेठसुदां गांव दिया.

२०१ धरती की विगत तपसील.

१२६. चौधरी देवचंद.

५६. का सुसनेर तियाई भाईबदामाफक लेणी.

अडान १० मालेत ४६.

७०. मौजे आमला माह तियाई माफ.

१२६

७५. चौधरी माणकचंद

४५. का सुसनेर तियाई लेणी

आडाण ५ मालेत ४०.

३० मौजा आमला माहे बीघा तियाई माफ.

७५.

२०१

२०४. ता गांव ३ बीघा २०१.

आणि करारसों चूके तो सारा तोरा को गुन्हेगार वे पंचा माहे झूंठों. मिती सावन सुदी १२ संवत १८१० सन ११६०.

मतंग चौधरी गोवर्धनदासजी उपर लल्यो सो सही.

सदरहू प्रा उभयेताच्या फारखत्या परस्परें करून देउन उभयेताच्या वगैरे पांतीदार पा सुसनेरचे गांव कुल ८४ चौरियासी बिा.

दौतलसिंग याचे वाटणीस देह ४२ पेमसिंग चौधरी याचे वाटणीस देह १४

एकून देह ५६ छपन. बाकी राहिले देह २८ आठावीस याची वाटणीया केल्या विा गोवर्धनदास वाा रामचंद व देवचंद वगैरे याचे भाऊबंद पाा मजकूर येथे वाटणीचे कुल देह राहिले २८.

सुमारी

याची वाटणी केली विताा.

गोवधनदास वाा रामचंद.

१. मौजा सादलपुर.
१. मौजे घान्याखेडी.
१. मौजे शामपुरा.
१. मौजे गुराडी.
१. मौजे गरडा.
१. मौजे पटपडा.
१. मौजा पायली दाखली.
१. मौजे मगरया.
१. मोजे कोटखेडी दाखली.
१. मौजे गुराडया.
१. मौजा परसूल्या बुाा
१. मौजा ढाबला सोनगीरा.
१. मौजे आरण्या.
१ मौजे पगारा.
१. मौजे खनोटा.
१. मौजे मुरुखेडी. येथील हक दिला याचा व सेते भाऊबंद याची. × ×

देवचंद गांव ३:

१. हढेडा.
१. बावडीखेडा.
१. मौजे वेहरा.

३

या सिवाये जमीन वीघे.

१२६. देवचद.
५६ काा मजकूर मालेत ४६
आडान १०
७० मौजे आमला.

१२६

७५. माणिकचद देवचद याच्या घरातील
४५ काा मजकूर मालेत ४०
अडान ५
३० मौजे आमला.

७५

२०१

एकून सदरहू तीन गांव दोनसे येक वीघा जमी[न]. × × ×

[अपूर्ण]



लेखांक [१०८] श्री * संवत् १८१० कार्तिक शुद्ध ४
[ ३० अक्तुबर १७५३ ]

जमा पोते गुा बाळाजी येशवंत कोटेकर सुा अर्बा खमसेन मया अल्फ. सन हजार ११६३ मा त्रिंबक संभाजी नख्त जमा पोते रूपये.

१९४०० प्रा कोटेपैकी खासगत वाटणी.

४३०० मोजे गामेच प्रा पाटण. मुकातिया वा जमा रूपये.

२३७००

तेवीस हजार सातसे रोख रूपये जमा केले आसेत. छ * ३ मोहरम. जमा आसेत. मुा उजेन[१३५] हवेली.

बार.

---

लेखांक [१०९] श्री * संवत् १८१० कार्तिक वद्य ५
[ १५ नवंबर १७५३ ]




राजश्री बाळाजी यशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा आर्बा खंमसेन मयां आलफ. श्रीमंत राजश्री पंत प्रधान साहेबांच्या सरकारांत उंटे खरिदी करावयासि भवानीदास दिा माहादसेट सेटे वीरकर पाठविले आहेत. पांच हजार रूपये पाटणाहून उंटाच्या खरिदीस देविले असेत. त्यास तुमच्या तालुक्यांत हे येतील. उंटे खरिदीस हर जागां जातील. उंटे खा करून आणतील. त्यांस जांता येतां तुमच्या प्रांतांत हरकत न पडे, हांसिलाचा तगादा न होय ते करणे. जाता येतां यांसी वदरका राजश्री माहांरावजी यांज कडून देवउंन आपल्या सरहदेपार करूंन देणे. येविसी है गै सहसा न करणें. निगा

(१३५) या वेळी जयाजी शिंदे दक्षिणेतून उज्जनीस आले होते.

दास्तीनें उटे व सरकारचे लोक खरिदीस आले असेत [ते] सुरक्षित जात येत ते करणे. जाणिजे छ ॥ १९ मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री मोर्तब सुद

---

लेखांक [११०]

श्री * संवत् १८१० मार्गशीर्ष शुद्ध १०
[५ डिसेंबर १७५३]

श्री जोति
र्लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
जयाजि सिंदे
निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा आर्बा खेमसेन मया व आलफ. राजश्री बयाजी सेलार सिलेदार यांसी घोडियांसी खर्चास रुपये १०० संभर रुप्ये देविले आसेत. तर [ते] पावते करून ॥ कबज घेणे. घोडी तुम्हापासी राहिली तर त्यासी जागा देउन खबर घेत जाणे. जाणिजे छ ॥ ९ सफर ॥ बहुत काय लिहिणें हे विनती.

श्री मोर्तब सुद

बार.

---

लेखांक [१११]

श्री * संवत् १८१० वद्य चैत्र १४
[१७ अप्रेल १७५४]

श्री जोति
र्लिंग चरणि त
त्पर राणोजि सुत
जयाजि सिंदे
निरंतर

राजेश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यासी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा आर्बा खमसैन मयां अलफ. तुम्हीं पत्र पाठविले ते पा जाहले. तेथे वृतांत लिहिला जे राजश्री माहारावजी नाथद्वारास गेले होते ते माघारे कोट्यांस आले. पैक्याच्या तजवीजे सरकारच्या करारा प्रो देउं ऐसें म्हणतात. ताकीदपत्र पाठवावे म्हणून लिा. यैशास

पुर्वींच ताकीदपत्र सरकारच्या यैवजाकरितां त्यास बरेवजेने लेहून पाठविलेच असे तें त्या प्रो देउंन करारा प्रो यैवज त्यांजपासून घेणे. ढील सहसा न करणे. 'वरकड जाटांच्या[१३६] ठाण्यास मोर्चे लाविले. जाट जेर केला असे. सांप्रत सलुखांच्या विचारावरी आला असे. लौकरच जाटाचा कारभार विल्हेस लागले.' [ तुम्हास ] कळले पाा म्हणून लिा आहे. जाणिजे * छ २३ जमादिलाखर. ॥ सांप्रतही ताकीदपत्र माहारायांस पाठविले असे. छ मार. पवारांच्या वांटणीचा मार. लिहिला त्यास त्यांची वाटणी हिंसे प्रों वसूला बमोजिब देणे. कोणांचा कज्या येकंदर न ठेवणें. छ मजकूर. ॥ बहुंत काय लिहणे हे विनंती.




---

लेखांक [११२] श्री * संवत् १८१० वैशाख शुद्ध ८

[ ३० अप्रेल १७५४ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यासि.

अखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा आर्बा खमसैन मया अलफ. तुम्हीं पत्र पाठविले तेथे वर्तमानविसी लिहिलें. तरी 'आम्हांस शेरीरी ज्वर होता तो सांप्रत दूर जाला असे. आता बरे जालो आहे. चिंता[१३७] न करणे. वरकड वृतात तरी 'ठांणे कुंभेर[१३८] प्रांत जाटवाडा येथे मोर्चे संनिध गेले असेत. जाट

---

(१३६) वदनसिंग जाट याजकडील ठाणे कुंभेरीस या वेळी मोर्चे लागले होते

(१३७) या कुंभेरीच्या मुकामी जयाजी शियास ज्वराच्या व्यथेनें इतके बेजार केले होतें की त्याच्या विषयी सर्वांस फार चिंता उत्पन्न झाली, तिचे वर्णन चिंतोकृष्ण व रामाजी अनंत दाभोळकर या प्रकारे देतात की, ' [ व्यथा ] ज्वराची दूर जाली आता कुशलरुप आसे चिंता नसे परंतु शेरीर अस्तिगत राहिले दोर्ही कडून दोघांनी धरुन उठवावे धरुन चालवावे येसे साप्रत आहे कुवत येईल तेव्हा खरे. यजमानास ज्वराची व्यथा एक मासपर्यंत होती ईश्वर कृपें आरोग्यता जाली यदाचे स्वारीस हाच मोठा लाभ जाला की यजमानास आरोग्य जाले' । ह्मणून बाळाजीचे चिंतानिवारणार्थ हें पत्र आले होतें

(१३८) कुंभेरी हे भरतपुर राज्यात असून खास राजधानीपासून वायव्य दिशेस ४ कोसांवर आहे.

जेरदस्तींत येउंन त्यांचे वकील आले असेत. वहुत वजीद[१३९] होउन सलुखाची रदबदली करीत असेत. सत्वरिच यांचा गुंता उरकेल. करार मदार ठरल्यानतर तत्वता वृता मागांहून लेहूंन पां। देउं.' जांणिजे छ ॰ ६ रजेव. ॥ वहुत काय लिहिणे हे विनंती.

(श्री मोरेव मद)

---

लेखांक [११३] श्री * सवत् १८१० वैशाख वद्य १
[ १३ मे १७५४ ]

(श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर)

राजश्री बाळाजी येशवत प्रांत कोटे गोसावी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य. स्नेो जयाजी सिंदे रामराम सुमा आर्बा खमसैन मयां आल्फ. तुम्ही पत्र पा ते पावले. तेथें लिहिले कीं होळकर व पवार गवहार [ ? ] हे आपली वांटणींचा हिंसा मागतात येविसीं आज्ञा करावी म्हणून लिहिले. तरी ज्याचा रुपया त्यांस सिरस्ताप्रमाणे हिसेरसीद देणे. जिकडे जाजती वसूल पावला असेल तो मनास आणून सिरस्ता प्रो वाटणी वमोजिब जिकडील तिकडे पैसे पाठवणे. वोभाट येउ न देणे. छ ॰ १९ रजेव. ॥ वहुत काये लिहिणे. रूपये शाहाराव देत नाही म्हणोन तुम्हीं लिहिलें तरी करारप्रमाणे येवज त्यानीं द्यावा हे उत्तम आहे [ न ] न देत तरी आपली फळे पावतील. जो जसे करील तसे पावेले. वहुत काय लिहणे हेविनंती.

(श्री मोरेव मुद)

---

लेखांक [११४] श्री * सवत् १८१० आपाढ वद्य ८
[ १२ जुलै १७५४ ]

(श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर)

राजश्री बाळाजी येशवत गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रांमरांम सुहूरसन

---

(१३९) वजिद ह्मणजे दीन, श्रमी, आम्ही ( फारसी कोश पृष्ठ १६२ ).

खमस खमसेन मया व आलफ. 'आम्ही दिलीहून[१४०] कूच करून नारनोळ[१४१] पावतो आलो. येथून पुढे दर मनलीने मारवाड प्रांते जात असों. तर तुम्ही पत्र पावताच महाराव यांसि च्यार गोष्टी सांगोन त्याची फौजसुधा आखेराम पंचोली व शिवसिंग राठोड याची तयारी करून कूच करणे. मुख्य गोष्ट की जलदीने येउन सामिल होणे. दिवसगत न लावणे. जाणिजे छ * २० रमजान. १[१४२] वहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ ११५ ] श्री * संवत् १८११ श्रावण शुद्ध ६
[ २५ जुलै १७५४ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी शिंदे रामराम सुमा खमस खंमसेन मया अलफ. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान कळले. या प्रो च तुमचीं दोन तीन वेळा पत्रे आलीं. त्यात मजकूर संध्युक्तच वारंवार लिहितां. अपूर्व असे ! प्रत्योत्तरें तरी वरचेवरी देतच असतो. अद्यापि पैका सरकारचा घेतला नसा

---

(१४०) कुमेरीच्या प्रसंगी जाटाशीं झालेल्या शिंद्याच्या 'पगडीबद्दल भाईचाऱ्यामुळे' होळकराची प्रतिज्ञा भग होऊन शिंद्याशी तेढ पडली व त्यामुळेंच 'कुचाची नोवत करून कुमेरी सोडून' शिंदे सरळ मारवाड प्रातावर चाल करून 'फुटून' गेले, असा जो समज भाऊ बखरकाराच्या आधारावर राजवाडे [ ऐत्र १५ ] व सरदेसाई याचा झालेला आहे [ नाना पेशवे १३९, १४० ] तो अर्थात् या पत्रावरून खरा ठरत नाहीं [ लेखाक ११५, ११७ ] शिंदे होळकराचे वितुष्टाविषयीं पुढे टीप देण्याचें ठरविले आहे म्हणून येथे चर्चा करीत नाहीं

(१४१) नारनोळ रेवाडीच्या वायव्येस १६ कोसावर मोठे गाव असून हल्ली पटियाला राज्यात आहे

(१४२) मारवाडचे मोहिमेंत खुद्द महारावजींनीं फौजेसह मदत करावी अशी जयाजींची योजना होती परंतु तसा योग आला नाहीं ( लेखाक ११२ ) निदान अखेरामजी बक्षी किंवा अन्य सरदारा समागमे तरी फौज व तोफा पाठविणेविषयीं सूचना आल्यावर कोटेकरांनीं शिवसिंग राठोड नामी शूर सरदाराबरोबर एक हजार सैन्य पाठविले ते घेऊन बाळाजी गुलगुले बुंदी, तुन्या, पुष्कर, अजमेरच्या मार्गे मेडत्याजवळ शिंद्यांस येऊन मिळाले [ लेखाक ११८ ]

अगर फौजही निघाली नसे. यावरून काय म्हणावें ! आम्हांकडील वर्तमान तरी ' आषाढ वद्य ! १३स दिलीहून श्रीमंत [ रघुनाथराव दादा ] साहेबांची आज्ञा घेउन दर मजलीने सांवरेस[१४३] आलो. पुढें मेडत्यास[१४४] सत्वरीच जात असो. श्रीमंतांनीही दाहाबारा हजार फौज हुजरात[१४५] ची दिल्ही असे. या समयास कोटेकर यांणी बोलल्या प्रा फौज पाठवावी उत्तम आहे. स्नेहाने स्नेह वाढतो. याप्रमाणेच त्यांसी बालोन जरी फौज मातबर पाठवितील तरी घेउन येणे. आंणि पेकाही पोक्त मागोन घेउंन बराबरी आणणे. ढील सहल्पसा न करणे. येवज [व] फौज घेउन सत्वर सत्वर येणे. ढिल ढालाल सर्वथा न करणे. आंमची खर्चाची वोढी सांप्रत असे. तरी श्रीमाहांरायांसी च्यार गोष्ठी कळतील त्याप्रो स्नेहवादे बोलोंन पका पोक्त मागोन वा घेउन येणे. जाणिजे छ ४ सवाल. !' वहुत काय लिहिणे हे विनती.




---

लेखांक [११६] श्री संवत् १८११ भाद्रपद शुद्ध ११

[ २८ अगस्ट १७५४ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यांसि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा

---

(१४३) सांबर हे मिठाचे प्रसिद्ध सरोवर राजपुतान्यात अजमेरपासून २० कोसाचे अतरावर ईशान्य दिशेस आहे येथील फौजदारी [ अजमेरच्या सुभेदारीसह ] मुगल बादशाहकडून नुकतीच मराठ्यास मिळाली होती. [ ३ जून १७५१ ] अर्थात हा जो मार्ग शिंद्यानीं स्विकारिला तो स्वसत्तेचा होता असें स्पष्ट होतें

(१४४) मेढता या ठिकाणी मराठे व रजपूत ह्यामध्यें अनेक रणसग्राम झाले असल्यामुळे हें ठिकाण मराठ्यांच्या पूर्ण परिचयाचें झालें आहे अजमेरच्या नैऋत्येस २० कोसावर हें गाव असून ते जोधपूर राज्यात आहे

(१४५) ही पेशव्याकडील हुजरातची फौज त्रिंबक बापुजी याचें आधिपत्याखाली जी या वेळीं शिंद्याबरोबर निघाली व त्या मुळें त्रिंबक बापूजीचा जो परिचय शिंद्याशीं झाला तो पानिपतपावेतों अबाधित कायम राहिला होता असें समजतें

खंमस खंमसेंन मयां अलफ. तुम्हीं पत्र पा। तेथें लिहिलें कीं छ २९ सवालीं । सोमवारें अखेरामजीसह वर्तमान जंमावसुधां बूंदीस आलों. याउपरी दर मजलीने येतच असों. जलदीने येतों म्हणून लि॥ उत्तम आहे. लांब लांब चालोंन अविलंवेंच येणे. दिरंग सहसा न लावणे. राजश्री माहांरावजीस अखेरामजी यांचें पत्र व आपलें पत्र येसें मुजरद कासीदां बा। पाठवणें की तोफांचे जरूर कांम आहे. तरी लांब पल्याच्या तोफा चांगल्याशा १० दाहा जरूर जरूर पा। पाहिजेत. बिजेसिंगा[१४६] जवळ मेंडत्यास तोफा असेत. आम्हांजवळ तोफा येकंदर नाहीत. तरी लिहिल्या प्रा। तोफा १० ॥ अंगत्य अगत्य आंणवणे. हैं गै सहसा न करणे. जाणिजे छ* ९ जिलकाद. ॥ पांच सा सेर गोळयाच्या लांब पल्याच्या [ तोफा ] असतील त्या आणवणे. येविसीं अनमान सहसा न करणे. तुम्ही कोठपावेतो आला हे लेहून सत्वर पाठवणे. बहुत काय लि॥. वाटेने खबरदारीन येणे. हे विनंती.




लेखांक [११७] श्री * संवत् १८११ भाद्रपद शुद्ध १२
[ २९ अगस्ट १७५४ ]




राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यासी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जयाजी सिंदे दंडवत सुमा खमस खमसेन मया अलफ. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले 'नून्यास'[१४७] आल्याचे वर्तमान

---

(१४६) बिजेसिंगाजवळ तोफाचा भडीमार व स्वसैन्यांत त्याची उणीव आरंभापासून जयाजी शिंद्यांस भासत होती ती सामुग्री कोटेकराकडून त्यांनीं मागविली होती [६ जुलै १७५४] पण ती त्यांना वेळेवर मिळाली नसावी असें दिसतें [ लेखांक ११७ ]

(१४७) या नावाचे गांव मिळत नाही पण 'नेणवा' म्हणून बूंदीचे उत्तरेस १२ कोसांवर एक मोठे गांव आहे सावरसमीप सामोरें येण्याविषयी सूचना होती त्या मानानें बूंदीनंतर हा दुसरा पडाव समजला जाऊं शकेल, पण अजमेरपासून तो बऱ्याच अतरावर असल्यामुळें अजमेरकर कमाविसदारास त्याची बातमी सत्वर लागली कशी ? येवढीच काय ती अडचण येते. डाकेची व्यवस्था ठेविली असेल असे ग्रहित धरिलें तर ही भानगड राहत नाहीं एरवी 'जून्या' म्हणून जो गांव देन नदीच्या उत्तरेस अजमेर पासून २४ कोस अग्नेय दिशेस आहे तो संभवनीय वाटतो

लेहून पाठविलें तेणेकरून संतोश जाला. परतु तोफ येक न आणिली. हे उत्तम न केले. नून्याहून पुढें पुष्कर[१४८] च्या हा [हद्दींत] आल्यावर लेहून पाठवणे म्हणजे येथून राउत पाठउन देऊं. त्या बा येणे. जेथे राहत जाणे तेथे रात्रीची बहुत न्ह चौकसीने [१४९] राहत जाणे. आपल्या खबरदारीस न चुकणे. केवळ बेमा[फा]म न राहणे'. जाणिजे छ * १० जिलकाद. [१] बहुत काय लिहिणे हे विनंती.

(श्री मोतैब सुद)

---

लेखांक [११८] श्री * संवत् १८११ भाद्रपद शुद्ध १२

[३० अगस्ट १७५४]

(श्री जोति किंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर)

राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य. स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा खमस खमसेंन मयां अलफ. तुम्हीं पुस्करच्या मुकांमचे पत्र पा ते पावलें. संतोष वाटला. या पत्रा आगोदरच तेथें आलेससें वृत अजमेरकर [कमाविसदार] याणी पत्र लिा होते त्यावरून तुम्हास सांभाळून आणावयासि मातबर फौज रा त्रिंबक[१५२] बापुजी व केरोजी सिंदे [?] यांसी काली छ १० जिलकाद [१] गुरुवारे पाच असेत. सिवसिंगचे स्वारही त्याज बरोबर दिल्हे आहेत. आमचा मुकाम आजी बडगाव मेंडत्याचे दक्षेण भागीं सा कोसांवरी असे. उदइक येथून कूच करून तुमच्याच रोखे मेंडते डावे टाकून येतो. तुम्हीं मेडते न्ह उजवे च्यार पांच कोस टाकोंन दुरुंनच आम्हाकडे येणे. जलदीने सांभाळून येणे. छ * ११ जिलकाद. [१] बहुत काय लिहिणे हे विनती.

(श्री मोर्तब सुद)

---

(१४८) अजमेरच्या पश्चिमेस ४ कोसांवर श्रीपुष्करराज तीर्थ सर्वांचें परिचयाचें आहे येथे जयाजी शिंद्याची प्रेक्षणीय संगमरमरी छत्री सरोवराच्या पूर्व कीनाऱ्यावर आहे

(१४९) परराज्यात व विशेषत. 'हद्दीले राठोड रजपूतांचे' मुकाबल्यांत सावधगिरी ठेवण्या विषयींच्या या संकेतावरून रणबंका राठोडाचे शौर्याची पूर्ण जाणीव जयाजीस होती असें दिसतें

[१] २९ अगष्ट १७५४

लेखांक [११९] श्री * संवत् १८११ भाद्रपद वद्य ३

[४ सितंबर १७५४)

जमा पोते संस्थान कोटे गुा बाळाजी येशवंत कोटेकर कादार सुहूरसन खमेसे खमसेन हजार ११६४. यैवज सनवादपैकी वसूल जमा नख्त जमा रुपये १३५०० सदरहू तेरा हजार पांचसे रुपये रोख पोत्यास जमा केले असेत. छ * १६ जिल्काद. मा [त्रिं]बक संभाजी रोख पोत्यास यैवज जमा जाला असे. मुा का खुडकी [१५०] प्रा मेढते.

बार.

---

लेखांक [१२०] श्री * पौष वद्य १२ संवत् १८११

[९ जनवरी १७५५]




राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुहूरसंन खंमस खमसेन मया व अलफ. पा पाटण केशवराव याचे प्रांत बूंदी येथील कमाविस पेशजी राजश्री गोंविद सखाजी याजकडे होती. ते दूर करून साल मा तुम्हाकडे इजारियाने मामलेत सागितली असे. त्याचा इजारा कुल बाब कुल कानुच्या आमलाचा च्यार साल करार करून दिल्हा असे. साले वितपसील. रुपये.

सन खमस सवत १८११ जमा रुपये २१०००१ दोन लक्ष दहा हजार येक रुपये.

सन सित समत १८१२ जमा रुपये २१०००१ दोन लक्ष दहा हजार येक रुपये.

सन सबा समत १८१३ जमा रुपये २१०००१

सन समान समत १८१४ जमा रुपये २१२००१

---

(१५०) हे गाव नकाशात कोठे सांपडत नाही परंतु खरकी [खडकी] ह्मणून एक गाव मेडत्याचे दक्षिणेस १० कोसावर आहे

| | |
|---|---|
| २००१ इजाद | ३००१ इजाद |
| २१२००१ | २१५००१ |
| दोन लक्ष बारा हजार येक रुपये. | दोन लक्ष पधरा हजार येक रुपये. |

येणे प्रमाणे च्यार साला सन खमसचे रुपये दोन लक्ष दहा हजार येक रुपया. सन सितात दोन लक्ष दहा हजार येक रुपया. सन सबात दोन लक्ष बारा हजार येक रुपा. सन समान दोन लक्ष पंधरा हजार येक रुपये, साल दर साल आखेर साली दरसाल सिंबंदी खर्च ४००० चार हजार रुपये वजा करून बाकीचा यैवज आखेर साली पावता करीत जाणे. आण पा मारीं यैनमाल व सारर्टयेर व जकात वगैरे कुल बाब कुल कानुचा अमल रारती पा मारी करून उगउन घेणे. रयतीस आबाद राखणे. यासि वाइदेबदी साल मजकुरी रुपये वितपसील

| | |
|---|---|
| ४०००१ | माघ मास आखेर. |
| ८०००० | वैशाख मास अखेर. |
| ९०००० | श्रावण मास पौर्णिमा १५ आखेर. |

२१०००१

येणेप्रमाणे साल दर साल वाइद्याने पावते करीत जाणे. जाणिजे छ * ×२५ रविलावल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [१२१]

श्री

* पौष वद्य १२ सवत् १८११
[९ जनवरी १७५५]




राजश्री बाळाजी येशवत व राजश्री आबाजी रघुनाथ
कमाविसदार प्रात कोटे गोसावी यांसी

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्यं स्नो जयाजी सिंदे रामराम

दंडवत सुमा खंमस खंमसेंन मयां अलफ. प्रांत मजकूरची सरमजमु राजश्री त्रिंबक सिवराम याजकडे सांमाइक आहे. त्याप्राों करारच असे. तरी मशारनिलेचे वेतन साल बसाल ज्याप्रमाणे चालले आहे त्याप्रमाणें हलीही चालवीत जाणे. येविसीं अंतर न करणे. जांणिजे छ * २५ माहे रविलावल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [१२२] श्री पौष वद्य १२ संवत् १८११

[ ९ जनवरी १७५५ ]




ता॰ जमीदारांन चौधरी व कांनूगो व पटेल पटवारियांन परगणे पाटण प्रांत बूंदी इनको मालूम होवे. आगू श्री गोविंदराव सखाजीको कमाइस परगने मजकूरकी थीं सो हाल साल दूरी करीने राजश्री बाळाजी येशवंत सो दीइ छे. तो संवंत १८११ के साल सों सबही गांव बगांव को आंमल दरोबस्त देखील सायेर व जगायेत सबही को आमल को वसूल बालाजी येशवते के पास देना. [ पुढे मोडित मजकूर आहे. ] बालाजी येशवत के पास सन पंमसख मसेन मया आलफ. तारीख छ * २५ माहे रविलावल. मीती मांघ वदी १२ संवत १८११.




---

लेखांक [१२३] श्री पौष वद्य १२ संवत् १८११
[९ जनवरी १७५५]



नां. जमीदारान चौधरी व कांनूगो व पटेल पटवारीयान परगने पाटण प्रांत बूंदी को मालूम होने. आगु श्री बाळाजी येशवंत कों आंमल परगने मांरको दयो छे तो संवत १८०९ व संवत १८१०. दोई सालको कचो आंमलको वसूल सबही गांव नगांव को रामाजी जगंनाथ के आंग श्री बाळाजी येसवतके मार्फत सो लगाये देना. तारीख छ * २५ रबिलावल.




---

लेखांक [१२४] श्री * संवत् १८११ पौष वद्य १२
[९ जनवरी १७५५]



राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार पा पाटण
केशवरायाचे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे दंडवत सुहूरसन खंमस खमसेन मया व आल्फ. पा मारी कारकुनाच्या आसाम्या पेशजी पासून आहेत. त्या साल मारी करार आसेंत. त्यांचें वेतन सालीना रूपये दोन तक्षीमेच्या यैवजी रुपये.

३०० बाळाजी नरसिंह.
२५० बाबुराव गुणाजी.
२५० चिंतो नारायेण काम्टीकर कोतवाल.

---
८००

आठसे रूपये पेशजीपासून नेमणूक आहे त्याप्रमाणेच करार केलीं असे. तर नुमणूकेप्रमाणे इजारियात आठसे रुपये पावते करणे. जाणिजे छ * २५ रविलावल. १ बहुत काय लिहिणे हे विनती.




लेखांक [१२५] श्री * संवत् १८११ माघ वद्य १२

[८ फरवरी १७५५]




राजश्री बाळाजी येशवंत गोसांवी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्यं स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा खंमस खंमसैन मयां अल्फ. तुम्ही पत्र पाठविले तें पावले. तेथें रामाजी जगंनाथ याचा मजकूर लिहिला जे मन माने तैसे भांपण त्यांणी केलें. पुढें तिसरा हिंसा आंमल करूं म्हणतात. तरी त्यांचा येख्तियार [आहे] राजश्री मल्हारजी होळकर यांजकडील तिसरा हिशाची मामलेत ते करितील तरी सुखे करोत. तुम्ही दो हिशाची मामलेत आपली पा पाटणची करणे. दूसरे लिहिलें कीं माहाराव कोटेकर याचा अवलंब आपल्याखेरीज नाही. आश्रये यासी दूसरा नसे. सरकारच्या पैक्याचीही विल्हेवाट करावी [तीही] सत्वरीच करणार म्हणून बोलतात, [त्याच] ततबीरेमधे असेत. यैसे तपसीले लिा. तरी बहुत उत्तम आहे. पैका वसूलात त्वरेने येई तें करणे. है गै न करणे. छ * २६ रविलाखर. १ बहुत काय लिहिणे हे विनंती.




पैवस्ता छ ४ जमादिलांवल. फाल्गुण शुध ५ बदस्त कासीद.

[१६ फरवरी १७५५]

लेखांक [१२६]          श्री          * संवत् १८११ फाल्गुण शुद्ध ४
[१५ फरवरी १७५५]




राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो     जयाजी सिंदे रामराम सुहूरसन खमस खमसेन मया व आलफ. गोविंदराव सखाजी मूत्य पावला. त्याजकडील पाटणचे रुपये येणे आहेत. तर मारनिलेकडील गुमास्ता राजश्री रामाजी जगनाथ पाटणात आहे. त्याच्या आंगी सन सलासचा व सन आर्बाचा वसूल आंगी लावून करार पैा पावतीची कबजे त्यापासी आहेत ती मजरा देउन बाकीच्या रूपयाची निशा करून घेणे. येक रुपया त्याजकडे बाकी न ठेवणे. रुपये देईल तेव्हां त्यासी जाउ देणे. जाणिजे छ ३ जमादिलौवल. बहुत काय लिहिणेहे विनंती.




पैवस्ता छ १५ जमादिलावल. फाल्गुण वद्य २ बरात्र कासीद सरकार.

---

लेखांक [१२७]          श्री          * संवत् १८११ फाल्गुण शुद्ध ७
[१८ फरवरी १७५५]




राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो     जयाजी सिंदे रामराम सुहूरसन खमस खमसेने मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. माघ वद्य † पंचमीस पाटणास गेलो. अमलास पहिलेच कारकून पाठविले होते. जागा जागा माणसे ठेउन बदोबस्ती करणे ते केली. राजश्री रामजी जगंनाथ याची भेट जाली. आम्हाकडे आमल जाला तेणेकरून मालाची बहुत तसनस केला. साल मारच्या हिसेब पौ मनमा-

† १ फरवरी १७५५

नेसा खर्चेवेच लिहिला आहे व जमा लिहून दिली आहे. त्याचीही रुजूवात पाहणे आहे. दोन हिसेयाचा आमल आम्ही केला. तीसऱ्या हिशाची कटकट करितात की आम्ही मल्हारराउजी होळकर याचे चाकर आहो. त्याचे पत्र येईल तेव्हा तीसऱ्या हिशाचा आमल देईन म्हणोन बोलतात. याचेविसी जसी आज्ञा येईल तैसी वर्तणूक करू म्हणोन लिहिले. तर तुम्हास मामलेत सागितली तेव्हाच तुम्हास सांगितले की दो हिष्याची मामलेत सांगितली आसे. तीसऱ्या हिष्यासी कटकट न करणे. यैसे रुवरु सागितले असोन त्यास काये निमित्य तीसऱ्या हिष्यासी कटकट करीत होता ? तुम्ही आपला अमल दोन हिशाचा करीत जाणे. तीसऱ्या हिशासी कटकट न करणे. राजश्री रामाजीपंताकडे सरकारचे रुपये येणे आहे त्याजकडे दुसालाचा वसूल आंगी लावणे. याजकडील यैवज येणे त्याबदल पूर्वी तुम्हाकडे कासिद मुजरद पाठविला आहे. त्याप्रमाणे वसूल करणे. जाणि ☐ जे छ * ६ जमादिलैवल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

(श्री मोर्तब सुद)

---

लेखांक [१२८] श्री * संवत् १८११ फाल्गुन शुद्ध ७

[ १८ फरवरी १७५५ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

रामराम सुहूरसन खमस खमसेन मया व आलफ. प्रात कोटे येथील वसुलासाठीं राजश्री माहारावजी याणी आपले टेहलवे[१५१] [ पाठविले ] आहेत. त्यासी ताकीद केली असे. सत्वरीच यैवज येइल. फोज खीचीवाड्यात पाठविली होती ती माघारी बोलाविले. आपल्या वचनावर दढतर होउन बैसले आसेत. माघारे फिरते समइ कार्य करून दिल्हे पाहिजे म्हणोन लिहिले. तर कोट्याचा यैवजाची तरतूद करून हुंड्या सत्वर पाठवणे. येथे खर्चास पाहिजे. हे तुम्ही दृष्टी[१५२] ने पाहून गेलाच आहा. यास्तव वरचेवर यैवज कोट्याचा

---

(१५१) टेलहवा ह्मणजे टेहळणी करणारा.

(१५२) बालाजी गुलगुले व अखेराम बक्षी मेडत्याजवळ कोटेकराकडील सैन्य सिवसिंग राठोड सह शिंयाचे हवालीकरून परत कोट्यास आले होते.

पाठवणे. खीचीवाड्याचे काम करणे आहे. ते येथील कार्य जाल्यानंतर होउन येईल. तेथील कार्यास वहुत रोज लागनात येसा आर्थ नाही. जाणिजे छ * ६ जमादिलौवल. ॥ हे विनती.



---

लेखांक [ १२९ ] श्री * संवत् १८१२ चैत्र शुद्ध १

[ १३ मार्च १७५५ ]

पा राजेश्री बाळाजी येशवत कोटे गोसावी यासि.

रामराम सुहूरसन खमस खमसेन मया व अलफ. राजश्री रामाजी जगंनाथ दिा गोविंदराव सखाजी याजकडील हिसेव दुसाला त्याच्या अंगी लाउन बाकीचे रुपये वसूल करून घेणे म्हणोन आज्ञा आली परंतु त्याजकडील मातवर यैवज येणे [तो] आव रक्षूनच घेतले पाहिजे. दुसरे राजश्री मल्हारजी होळकर सन्निध[१५३] आले आहेत. त्याच्या भेटीस जावे लागेल. त्यास मना कसे करावे. दूसरे तो तीसऱ्या हिश्याचा मामलेदार कवा [ १ ] करावयासि जावे लागने यास्तव दोन दिवस महकूफ केले असे. पुढे आज्ञेप्रमाणच वर्तणूक करु म्हणोन लिहिले. तर पूर्वी हिसेव लेहून पाठविली आहे त्याप्रमाण त्याजपासून निगा करून घेण. दोन सालाच्या वसूल त्याच्या आगी लावणे म्हणजे कराराप्रमाणे तोही यैवज तुम्हास देईल. त्याकडील वसूल घ्यावयासि दिवसगत न लावण. वसूल करून यैवज अम्हाकडे पाठवणे. जाणिजे छ * २९ जमादिलौवल. ॥ हे विनती.



पौ छ ८ जाखर चैत्र शुा ९ मंदवार

[ २२ मार्च १७५५ ]

---

(१५३) या वेळीं मल्हारजी होळकर 'लष्करानसी' कोठे तरी [ कोट्या ] नजीक आले होते [ लेखांक १३१ ] व ते अप्रेल १७५५ अखेर रघुनाथराव दादाबरोबर बनास नदीवर होते तेथून ते खातोलीवरून ग्वाल्हेरीकडे गेले [ लेखांक १३३ ]

लेखांक [१३०] श्री *संवत् १८१२ चैत्र शुद्ध १
[१३ मार्च १७५५]

पाा राजेश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसी

सुमा खमसेन मया आल्फ. प्रांत कोटे येथील तहसील करणे ते माहाराव ताकीदी-नेच करवितात. आठा दिवासामधे रुपये देणे ते देतील. त्याप्रमाणे लेहून पाठउ म्हणोन लिहिले. तर येथील प्रसंग तुम्ही आपल्यां दृष्टिने पाहून गेलाच आहा. खर्चाची वोढ जाली आसे. तुम्ही च्यार गोष्टी माहाराव यासि व आखेरामास सागोन ज्याप्रमाणे पंचोली येथून करार करून गेले आहेत त्याप्रमाणे आमलात ये ते गोष्ट करणे. आंती तरी रूपये देतीलच परंतु या समयात दिल्याने खर्चाच्या कामात येतील. आण त्याचाही स्नेह राहील. रूपये तर आगे मागे येतीलच यास्तव तुम्ही त्यास उत्तम प्रकारे बोध करून कराराप्रमाणे यैवजाच्या हुंड्या करून सत्वर पाठवणे. यातच तुमच्या चाकरीचा मजरा असे. ।' हाती सत्वर यैवज येउन पोहचे ते गोष्ट करणे. दिवसगत न लावणे. जाणिजे ♃ * २९ जमादिलावल. हे विनंती.




पो छ ८ जाखर. मि. चैत्र शुा ९ मंदवार.
[२२ मार्च १७५५]

---

लेखांक [१३१] श्री *संवत् १८१२ आषाढ वद्य ३
[३० मार्च १७५५]

पुाा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यासि.

रामराम सुहूरसन खमस खमसेन मया व अलफ. 'राजश्री मल्हारजी बावा लस्करानसी नजीक आले असता भेटीस जावे लागते. माहाराव याचाही अग्रह पाहिला त्यावरून आम्ही व अखेरामजी यैसे स्वार होउन त्याकडे भेटीस्तव गेलो म्हणोन लिहिले तर बहुत उत्तम केले भेट जाल्यावर जे वर्तमान होईल ते व नवल विशेष आढळेल ते तपसीलवार लेहून पाठविणे. राजश्री रामाजी जंगन्नाथ याजकडील रुपये येणे आहेत. त्यासी तगादा लावावा तर कत्रा करावयाचे दिवस. माल रयेत खाउन जाइल. कवां कोलच पाहिजे. यास्तव

तर्त त्याचे वाटे गेलो नाही. दुसरे त्याचे खावंद सनिध आले. त्याचे भेटीस त्यासी जावेंच लागले. त्यास कजिया कसा करावा यास्तव प्रस्तुत त्यासी बोललो नाही. मकारपूर्वका [१५४] पासून आल्यावर आज्ञेप्रमाणे करून घेतो म्हणोन लिहिले. तर त्याचा निकाल करून घेतो म्हणोन जाते समई कबूल केले आसोन आता तपसील. लेहून पाठवितात. हे कोण गोष्ट आहे ? भेट घेउन माघारे आले आसाल. पूर्वी हिसेब तुम्हाकडे लेहून पाठविला आहे. त्याप्रमाणे रुपयाची निशा करून घेणे. वसूल करावयासि आनमान न करणे. लिहिल्याप्रमाणे त्यासी तगादा लाउन वसूल करणे. जाणिजे छ ॥ १६ जाखर. ॥ हे विनती.




---

लेखांक [ १३२ ] श्री * संवत् १८१२ वैशाख शुद्ध १४
[ २५ अप्रेल १७५५ ]

पुा राजश्री बालाजी येशवंत गोसावी यांसि.

रामराम सुहूरसन खमसेन मया व अलफ. राजश्री रामाजी जगनाथ दिा गोविंदराव सखाजी याजकडील गुंता रूता आहे तो आज्ञाप्रमाणे करून घेतो म्हणोन लिहिले. तर उत्तम असे. पूर्वी हिसेब लेहून पाठविला आहे त्यामध्ये बाकी लेहून पाठविली आहे. त्या यैवजी जो जावा[जमा] असेल तो मजरा देउन बाकीची निशाकरून घेणे. तुम्ही जातेसमई करार केला आहे की मागील दोन सालचे रूपये त्याचे आगी लाउन उगउन घेतो. तोटा यउ देत नाही. यैसे आसोन अद्याप फडशा केला नाही. हे कोण गोष्ट आहे ? अत:पर त्याचा हिसेबाचा फडशा करून बाकी निघाली आहे ते रूपये वसूल करून घेणे आण सरकारात यैवज पाठवणे. कोणे प्रकारा फडशा कराल तो तपसीलवार लेहून पाठवणे जाणिजे छ * १२ रजबु. ॥ हे विनंती.




पैा छ १७ रजब. वैशाख वद्य ४
[ ३० अप्रेल १७५५ ]

---

(१५४) मल्लारपूर्वक म्हणजे मल्हारराव होळकर

लेखांक [१३३] श्री * संवत् १८१२ वैशाख शुद्ध १४

[२५ अप्रैल १७५५]




राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार स्नेहाय गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो जयाजी सिंदे दंडवत रामराम सुहूरसन खमस खमसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री अखेरामजी व आंम्ही यैसे श्रीमंताच्या लस्करांत क्रनासेवरी गेलो. राजश्री मल्हारजी बाबाची भेट जाली. त्याज बार खतोली पावेतो होतो. तेथून आज्ञा घेउन पाटणास आलो. आज उद्या कोट्यास जाउ. ज्याप्रमाणे अखेरामजीनी आपणापासी करार केला होता त्या प्रमाणे ठराव प्रकारपूर्वकासी करून [कोटेकरांनीं] आपला मुलुक वाचविला. रूपया सुटणार नाही. यैसी रूबरू ताकीद केली. ते ग्वालेरीकडे गेले. फिरते समई क्षेच्यासी कजिया करावा हे मानस श्रीमताचे आहे. कोटेकर यानी च्यार पाच लाख रूपये यैवज करून द्यावा या तजवीजेत आहेत म्हणोन लिहिले ते सविस्तर कळो आले. तुम्ही पाटणाहून कोट्यास गेलाच आसाल. करारप्रमाणे त्यास तगादा लाउन येवज वसूल करून घेणे. करारप्रमाणे यैवज दिल्हा तर उत्तम जाले. नाही तर स्नेह राहणार नाही. येसे त्यास पष्ट सांगोन वसूल करून घेणे येथे खर्चाची वोढ [आहे ती] तुम्ही आंपल्या द्दष्टीनेच पाहून गेला आंहा [तरी] पत्र पावतांच कांही तरी तर्त येक लाख पनास हजाराच्या हुंड्या जेनगराच्या करून आम्हाकडे पाठवणे म्हणजे खर्चाच्या कामास येतील. यैवज पाठावावयास ढील न करणे. कोटेकराचे साहूकाराचे हवाले देउन हुडीया अति सत्वर लिहिल्याप्रमाणे पाठवणे. जाणिजे छ * १२ रजबु. ।' बहूत काय लिहिणे हे विनती.




---

लेखांक [१३४] श्री * सवत् १८१२ जेष्ठ शुद्ध ७

[१६ जून १७५५]




राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार संस्थान कोटे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो      जयाजी सिंदे रामराम सुहूरसन सित खमसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. माहाराउ कोटेकर यानी पेशजी समाइक रूपये १,१८,००० येक लक्ष अठरा हजार व प्रस्तुत रूपये ७१००० येकाहत्तर येक लाख नव्यासी हजार समाइक वसूल जाला याच्या वाटणीचा यैवज पूर्वीच हुड्या दोन वेळ पाठविल्या. पवाराचा फाजिल यैवज मिळोन पाठविले. याउपरही तगादा करावयास अतर केले नाही. परतु याचा कारभार दीर्घसूत्री आहे. फौजेच्या दबावाने रूपये येतील म्हणोन लिहिले. तर येथे अखेराम पंचोली ला यथून करार करून गेले. त्या प्रमाणे राजश्री मल्हारजी बाबानीही मान्य केले. आसो रूपया द्यावयास सुस्ती करितात. येणेकरून स्नेह कैसा राहील ? येसे पष्ट तुम्ही माहाराउ यास सागणे कराराप्रमाणे रूपये दिल्हे तर उत्तमच जाले. नाही तर समजोन घेउं. चिंता काय आले ? तुम्ही आपले तर्फेने त्यास तगादा लावावयास अतर न करणे. जो वसूल येत जाईल तो वरचेवर यैवज अम्हाकडे पावता करीत जाणे. जाणिजे छ ५ रमजान. १ बहुत काय लिहिणे हे विनती.

(श्री मोतेब सुद)

पै॥ छ १३ रमजान

[२४ जुन १७५५]

---

लेखाक [१३५]      श्री      * समत् १८१२ जेष्ट शुद्ध ७

[१६ जुन १७५५]

पु॥ राजश्री बाळाजी पेशवत गोसावी यासि.

रामराम सुहूरसन सित खमसेन मया व आलफ राजश्री चिमणाजी गोविंद व रामाजी जगनाथ यासि आज्ञापत्रे आली परंतु ते कूच करून राजश्री मल्हारराउ याजकडे कडे गेले. आम्ही पा॥ पाटण यथील गांव इजारदारास देतो त्याची निशा साहुकारी आजच मागतात. अनेक प्रकारे प्रगण्यामध्ये फीतवे फानडे[१५५] करितात म्हणोन लिहिले तर ते कूच करून गेले तर चिंता काये आहे ? जेथे गाठ पडे तेथे रूपयाची निशा करून

---

(१५५) फितवे फानडे म्हणजे भेद, कारस्थान.

घेतली जाईल. गांव चुकाउन देता तें बहुत जुजरसीने[156] करून देत जाणे. येका पैच्या चा प्रपंच न केला म्हणजे ते काये करू पाहतात ! जो कोण्ही गांव इजारा मागत असेल त्यासी गाव चौकसीने इजारा करून देणे. केवळ लुच्या माणसाच्या स्वाधीन गांव न [करणे] मातबर माणूस पाहून सालस आ[सामी] असेल त्यास इजारा करून देणे. 'जो कारभार करीत जाल त्यात तिळभर प्रपच सोवत्यासी[157] न करणे. तिसरा हिसा त्याचा त्यास देऊन दोन हिसे आपले घेत जाणे. म्हणजे कटकट होणार नाही. तुम्ही आपल्या तर्फेने त्यासी कोणे गोष्टीने अतर न करणे. म्हणजे सहजच ते तुमच्या म्हटल्या प्रा यैकत जातील. येविसीचे पत्र त्यास लेहून पाटविले आहे. ते त्यासी देउन आपला सर्व वदोबस्त करून घेणे. रूपया ठिकाणा करावयासि न चुकणे. बहुतच रागा भरले तर आपला वाटा घेतील. आणखी काये करू पाहतील ? मागील दोन सालाचा फडशा होणे त्याचा वसूल काये परगण्यात जाला त्याची रुजुवात केलीच आसेल. नसली केली तर कागज तयार करून ठेवणे. माघारे आल्यावर रुजुवात होईल. गैरवाजवी येकंदर न करणे' जाणिजे छ * ५ रमजान. ।' हे विनती.

(श्री मोर्तब सुद)

पौ। छ १३ रमजान.

[२४ जून १७५५]

---

लेखांक [१३६] श्री -- संमत् १८१२ जेष्ट शुद्ध ११

[२० जून १७५५]

(श्री जोतिलिंग चरणि तत्पर राणोजि सुत जनाजि सिंदे निरंतर)

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार सस्थान कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो जनकोजी सिंदे रामराम सुहूरसन

---

(१५६) जुजरसी म्हणजे चवकशी, काळजी

(१५७) होळकर

सि[न][१५८] खमसेन मया व आल्फ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. सर्व वर्तमान अवगत जाले. कोट्याच्या येवजी येवज पाठविला असे विनपसीळ.

१०,००० हुंडी जेपूरच्या २ थैा.

५०० रावुराउ विश्वनाथ याजपासून घेऊन जमा करावे.

---

१५,५००

येणेप्रमाणे साडे दाहा हजार रूपये पाठविले आसेत जमा करून उतर पाठवावे म्हणोन लिहिले. तर दाहा हजार रूपयाच्या हुंड्या राजश्री रानाजी नाईक पोतदार याज पासी देउन जैपुरास पत्रे पाठविली आसेत. सही होउन येवज जमा जाल्यावर जाब लेहून पाठउ. राजश्री रावूराउ विश्वनाथ याजकडील पाचसे रूपये येणे असे. पाचा दिवसाचा त्यानी वाइदा केला आहे. पाचसे रूपये जमा जाल्यावर त्यास पावती दिल्ही जाईल. येथील वर्तमान 'तर छ ॰ । ७ रमजानी रूपनगर [१५९] फते जाले. ठाणे वसले येथील वदोबस्तास्तव येथे च्यार पांच मुकाम आहेत. वदोबस्त करून कूच होईल. दर मजलीनें कोट्याच्या मुलकात येणे होईल. राजश्री नाहाराउ याजला च्यार गोष्टी सागोन करारप्रमाणे वसूल करून करून घेणे. करारप्रमाणे रूपये दिल्हे तर स्नेह राहील. नाही तर स्नेह राहणार नाही. यसे त्यासी सागोन करारप्रमाणे वसूल घेणे जाणिजे छ ॰ ९ रमजान. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.

(श्री मोर्तब सुद)

[ १६ जून १७५६ ]

---

(१५८) असल पत्रात 'सित खमसेन' असेच आहे पण तो लिहिणाराचा हस्तदोष असावा असें वाटतें कारण अगदीं सरळ आहे मारवाडची मोहीम समाप्तकरून परत फिरतेसमयीं रूपनगरचा 'बंदोबस्त करून चार पाच दिवसात कोट्यास येण्याचें' लिहिलें आहे या वेळीं जयाजी जिवंत असून मोहीमेचा निकालच लागला नव्हता, तेव्हा चारपाच दिवसांत येणार कसें ? यासिवाय जयाजी च्या जिवंतपणीं जनकोजींचा सिक्का असणें अशक्य होतें वास्तविक सन 'सबा खमसेन' पाहिजे त्या अनुरोधानें या पत्राची तारीख ८ जूनस १७५६ येते.

(१५९) रूपनगर अजमेरच्या ईशान्येस १४ कोसावर हें शहर किशनगड राज्यात आहे

लेखांक [१३७] श्री * संवत् १८१२ आषाढ शुद्ध ५
[ १४ जुलै १७५५ ]

पुा राजश्री बालाजी यशवंत गोसावी यांसि.

रामराम सुहूरसन सित खमसेन मया व आलफ. आखेराम पंचोली याजकडे रुपये सरकारचे उसणवारी आहेत ते उगवल्यानंतर हुंडी करून पाठवितो म्हणोन लिहिले. तर उसणवारीच्या रूपयास इतके दिवस काये निमित्य लागले ? कोट्यास जाताच द्यावे रूपये ते अद्याप न दिल्हे. आपूर्व आसे ! अथःपर पत्र पावताच त्यास तप्त लाउन त्याज कडील दोन हजार वसूल करून तो यैवज व सोयेराजी परशराम याज बा यैवज यैसे दोही यैवजाची हुंडी करून पाठविणे. जाणिजे छ * ४ सवाल. ll हे विनती.

श्री मोर्तब सुद

पैा छ १० सवाल.
[ २० जुलै १७५५ ]

---

लेखांक [१३८] श्री * संवत् १८१२ आषाढ शुद्ध ५
[ १४ जुलै १७५५ ]

पुा राजश्री बालाजी यशवत गोसावी यांसि.

रामराम सुमा सित खमसेन मया व अलफ राजश्री महाराव कोटेकर यानी रुपये द्यावयाचा करा[र] केला त्यापैकी वसूल दिल्हा.

| | |
|---|---|
| १,०८,००० | पेशजी वसूल. |
| ७१,००० | हाली वसूल. |
| १,७९,००० | |

येक लक्ष येकुण असी हजार वसूल जाले. त्याच्या वाटणीचा यैवज आला त्याच्या हुंड्या पूर्वींच करून पाठविल्या. बाकी यैवज राहिला त्याच्या वसूलाचा तगादा लावावयास चुकत नाही. रांगड्याचा कारभार दीर्घसूत्री आहे. राजश्री अखेराम पंचोली मुलकात गेले आहेत. सरकारचे रुपये वसूल येतील ते समई पाठउन देउ म्हणोन लिहिले. तर करारा प्रमाणे त्याणी रुपये दिल्हे तरच स्नेह राहील. नाही तर स्नेह राहणार नाही. याप्रमाणे तुम्ही माहारायास उगउंन सांगणें. कराराप्रमाणे रूपये दिल्हे तर उत्तमच जाले. न दिल्हे

तर चिंता काये आहे ? अगे मागे रुपये येतील परंतु स्नेह राहणार नाही. तुम्ही वरचेवर तगादा लाउन जो वसूल येत जाईल तो वरचेवर घेत जाणे. आपल्या वाटणीचा यैवज जो येत जाईल तो पाठवीत जाणे. येथे खर्चास यैवज पाहिजे. यास्तव त्यास सख्त तगादा लाउन वसूल घेणे. आमच्या वाटणीचे रुपये अति सत्वर पाठवणे. येथून ताकीदपत्र ही माहारायास पाठविले आहे. ते त्यासी पावते करून कराराप्रमाणे [यैवज] घेणे जाणिजे रा छ * ४ सवाल. ।' हे विनती.

श्री मार्तंड सुद

पैा छ * १० शौवाल.
[ २० जुलै १७५५ ]

---

लेखांक [ १२९ ]

श्री * समत् १८१२ आषाढ शुद्ध ११
[ १९ जुलै १७५५ ]

श्री जोति लिंग चरणि त त्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवत प्रात कोटे गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जयाजी सिंदे रामराम सुमा सित खमसेन मया आलफ. पा पाडोन जागीर सरकार तेथील गाव करडखोह साता गांवसुधा पूर्वी कोटेकर याणी दाबली. हाली मोजे आंकला गाव परगणे मजकूरचा नाहारगडच्या [१६०] हवालदाराने दाबला. असे हे योग्ये नाही. यैसे राजश्री माहारावजी कोटेकर यासी तुम्ही माकूल करून सागोन पा मारची कमाविस राजश्री राघो शकर यासी असे. त्यांचा अमल सुरळीत चाले, नाल्स त्याची न ये येसे सागोन गांव मारी खीचल न करीत ते गोष्ट करणे गाव दाविले ते सोडून देवणे म्हणजे स्नेहवृद्धी होईल. राजीनामा येविसी राघो शकर याचा हुजूर येई ते करणे जाणिजे छ * ९ सवाल. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री मार्तंड सुद

---

(१६०) नहारगड टप्पे फतेहगढ परगने गूना जिला इसागटच्या नैऋत्येस ८ कोसाचे अतरावर असून ते कोटा राज्यात आहे

लेखांक [ १३९ अ ]  श्री  * संवत् १८१० आषाढ शुद्ध ३

[ ३ जुलै १७५३ ]

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे शेवेसी.

विनती सेवक जयाजी सिंदे कृतानेक विज्ञापना. येथील सेवकाचे वर्तमान ता। छ * १ रमजान स्वामींच्या आसिर्वादें यथास्थित असे. यानंतर रा। फिरंगोजी[161] सिंदे मौजे पिंगोरी ता। निरथडी प्रांत पुणें हे स्वामीचे सेवेसी आह्मांकडे नौकरीस असेत. मशारनिलेचे जेष्ट बंधु सताजी सिंदे मौजे मजकूरीं मोकदमी करीत आहेत. येशास हाली याचे भाउबंद संभाजी व सिवजी सिंदे यांसि भाउपणाबदल मोकदमीविशीं नवाच कजिया करीत असेत. ये विशीं स्वामींचे सेवेसी पुण्यांमधें रूबरूच विज्ञप्ती केलीच आहे. तरी माहाराजानी कृपाळू-पणे ह्रदोंजणांस परीकीथल नेमून देऊन मौजे मार चे समस्त दाहीजंण पंच सरकार यांच्या रुईने रास्तीं इंनसाफ धर्मता करवणार स्वामी धणीं संमर्थ असेत. फिरंगोजी सिंदे साहेबचाकरीत हमेशा तत्पर असतात. त्याप्रों स्वामीच्या सेवेसी सत्वर येत तें करणार धंणीं संमर्थ असेत. वाजवी इंनसाफ विल्हेस लागल्यानंतर स्वारी वा। येतीलसें करावें. ।' सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ती.

---

लेखाक [१३९ इ]  श्री  * संवत् १८१० आषाढ शुद्ध २

[ ३ जुलै १७५३ ]

राजेश्री भाऊ साहेब स्वामीचे शेवेसी.

विनंती सेवक जयाजी सिंदे कृतानेक विज्ञापना येथील सेवकाचे वर्तमान ता। छ * १ रमजान यथास्थित असे. यानंतर रा। फिरंगोजी सिंदे पिंगोरीकर ता। नीरथडी प्रांत पुणे हे स्वामिचे शेवेसी आम्हाकडे नोकरीस असतात. मशारनिलेचे जेष्ट बंधु संताजी सिंदे मौजे मजकूरी मोकदमी करीत असेत. त्यास हली यांचे भाउबंद संभाजी व सिवजी सिंदे

(१६१) हे फिरंगोजी शिंदे पिंगोरीकर [ प्रांत पुणे ] 'छावणीवाले शिंदे' यांचे पूर्वज होत. या घराण्याचा शिंदेशाहीशीं संबंध फार जुना आहे महादजी शिंद्यापासून यांचा जो संबंध तारीख जागीर-दारान मध्यें दर्शविला आहे तो या पत्रावरून अर्थात् चुकीचा ठरतो [ ताजा भाग १ पान २५४ ] या पत्रास क्रमानुसार दृष्टिदोषामुळें साधितां आला नाहीं म्हणून येथें हें पत्र दिलें आहे

यासि भाउपणा व गोकर्दमीबद्दल नवाच कजिया उपस्थित केला असे तरी 'माहाराजानी'[१६२] कृपावंत होउन हरदोजणास परकीथल नेमून देउन मौजे मारचे समस्त दाहिजण पन्च सरकार याच्या राईने रास्ती इनसाफ धर्मता करवणार 'स्वामी धणी' समर्थ आहेत. फिरंगोजी सिंदे साहेबचाकरीत हमेशा नसर असतात. याचा इनसाफ वाजवी होउन स्वारी बराबरी येन ते करणार स्वामी धनी समर्थ असेत. !' ॐवेसी श्रुत होय हे विज्ञप्ती.[१६३]

---

(१६२) वस्तुत हें पत्र लेखांक १३९ अची नक्कल असल्यामुळें येथें छापण्याचे प्रयोजन नव्हतें तथापि काहीं विशिष्ट कारणामुळे तसें करणे भाग आले. ऋणानुबंधपरंपरा स्मरून आपल्या पत्रव्यवहारात मुख्य प्रधानास शिंदे नेहमीं 'श्रीमत, स्वामी व धनी' असं लिहीत होते [लेखांक २६, ३६, ७४, ७५, ७६, १०९ ] या विरहित प्रसंगोपात ' महाराज ' या नावानें देखील पेशव्यास त्यांनी विशेषिलें आहे [ लेखांक १३९ अ ] आणि हा विशेषणालंकार केवळ मुख्य प्रधानापुरताच मर्यादित होता असें नव्हे तर पेशवे घराण्यातील इतर पुरुषासही तो वापरलेला आहे सदाशिवराव भाऊस ' महाराज ' म्हणून संबोधिलें आहे याविषयीं हें पत्र साक्षीभूत आहे रघुनाथदादास देखील ' श्रीमंत ' असें जयाजी शिंद्यानीं उल्लेखिलें आहे [ लेखांक ११५, १३३ ] अर्थात् मुख्य प्रधानासह पेशवे घराण्यातील अन्य पुरुषास ' श्रीमंत, स्वामी, धनी किंवा महाराज ' लिहिण्याचा परिपाठच होता मग त्या परिपाठानुसार महादजी शिंद्यांनीं जर [ रघुनाथ दादास ] ' महाराज ' म्हटलें तर त्यात काय नवल झालें ? ह्या सरळ 'महाराज' शब्दावर टीका करण्याची कल्पना राजवाड्यास का सुचावी ह्याचें रहस्य निदान मला तरी उलगडत नाहीं [ खंड १२ व १४ लेखांक ४ ] या विशेषणावरून महादजीचा हेतु मुळ पाडण्याचा होता असें अनुमान करिताना राजवाड्यानें वरील परिपाठ किंवा दाखला लक्षात घेतला असावा असें दिसत नाहीं [ खंड १ लेखांक ३७, ४९, ५५, ६१, ७३, ७४ ] आणि त्यामुळें इतिहासाचार्यांचा निष्कारण दुराग्रह होऊन त्याच्या हातून ही मल्लीनाथी झाली किंवा नाहीं याविषयीं वाचकवर्ग योग्य तो निर्णय करतील ' महाराज ' या शब्दभेटीचा जमाखर्च जर [ राजगी-रीतीनें ] करावयाचा असेल तर या 'भोळ्या' चोपडी सिवाय अन्य वह्यादेखील तपासाव्या लागतील व नंतर अमल्या तसलमातीचे उलगडे करणें प्रशस्त होईल

(१६३) वरील [ दोन्ही ] पत्रावर सिक्कामोर्तब नाहीं तेव्हा ही पत्रें जयाजीचे हातची असावी असें अनुमान निघूं शकतें निदान शेवटची ' विज्ञप्ति ' तरी त्याच्याच हातची असावी असा भ्रह बळावतो पण प्रत्यक्ष 'पत्राचे व विज्ञप्तीचें' अक्षर इतकें वळणदार आहे कीं ते जयाजीचें असेल की काय अशी शंका वाटूं लागते ह्याशिवाय लढाईंत जयाजीचा एक हात गोळीनें उडाला होता असें टॉड सांगतो [ Rajasthan vol. II page 415 ] तेव्हा हें गौडबंगाल तरी काय होते ? राणोजीचे समक्षतेंत अनेक मोहिमेंत राहून जयाजी कारभार करीत होते असा शोध लागतो खरा [ शिंद्याची बखर ] तथापि विश्वसनीय सूत्राभावी तूर्त स्तब्धता स्वीकारणेंच सोईचें वाटतें. ह्यामुळेंच जयाजीचे हस्ताक्षरासंबंधी विचार केलेला नाहीं



श्री जयाजी आपा शिंदे याची छत्री, मौजे तावसर समीप नागोर (मारवाड).

ॐ



# श्रीमंत जनकोजी बावा शिंदे

## यांचा असल पत्रव्यवहार.

१८१२-१८१७ विक्रमी.

लेखांक [१४०] श्री * संवत् १८१२ श्रावण शुद्ध १

[८ अगस्ट १७५५]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी[१६४] सिंदे दंडवत सुमासित खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे लिा वर्तमान अवगत जाले. 'तीर्थरूपास छ १५ † सवाली सुक्रवारे[१६५] बिजैसिंगाने मारेकरास दक्षेणी[१६६] थाट देउन

(१६४) हे जगाजी शिंद्याचे एकुलते पुत्र होत हे वडिलावरोबर मारवाडचे मुहिमेंत तर होते असें कळते खरे पण अतीम समयीं ते मेडत्यास होते [ बखर पान १५, १९ ] किंवा [ वडीलासमीप ] नागोरास होते हें समजण्यास साधन नाही अस्तु यासंबंधीं पुरावा पुढे येईपर्यंत बखरीवरच भिस्त ठेवणें भाग आहे

(१६५) ' ३० जून १७५५ ला जयाप्पा मारले गेले ' असें जे विधान राजवाड्यानें केलें होतें. [ खंड १ पृष्ठ १५ ] तें वस्तुत खरें नव्हते असें आता निःसंशय म्हणावे लागतें.

† २५ जुलै १७५५

[लष्करांत] पाठउन दगा केला. तेच दिवसी त्यास कैलासवास जाहला. ईश्वरे मोठासा घात केला. असो. याउपरी नागोर घेणे जरूर. बिजैसिंगाचेही पारपत्य करावे, यातच लौकिक उत्तम असे. तुम्ही हे जाणतच आहां.' कोटेकर श्री महारावजी व अखेरामजी याणी पत्रे पाठविली असेत. त्यात लिहिले असे जे हली पांच लाख रूपये खर्चास पाठवावेसा करार केला होता

---

(१६६) मराठी सैन्यांत वाव मिळण्यासाठीं 'विजयसिंगानें मारेकऱ्यास दक्षिणी थाट देऊन दगा केला' हें तर आता कळलेंच तथापि वकील, वाणी किंवा भिकारी यापैकीं कोणत्या मिषानें ते आत शिरले हें अनिश्चितच राहतें शंकरताला फडके याजपेक्षा [ शिंद्यांचा इतिहास ४ ] बखरकाराचा वृतात विशेष सयुक्तिक दिसतो [ भाऊबखर १७ ] ओळखूं न येता बाहेर निसटण्याचें कामी [ वकीलीपेक्षा ] भिकारी वेषाचीच क्लृप्ति जास्त संभवनीय वाटते वकीली वेषात प्रवेश करता आला नसता असें नाहीं पण तात्कालिन शिष्टाचाराप्रमाणें आगत, स्वागत व दरबारी शिस्तीमुळें अपघात करण्याला व तसेंच निमूटपणें निसटण्याला फार कमी सधी होती दगा केल्यानंतर मारेकऱ्यापैकीं एक निसटून परतही गेला असे जे बखरकार ह्मणतो [ पान १७ ] त्याची पुष्टी जगदीशसिंह गेहलोतकृत मारवाडचे इतिहासावरूनही होते या प्रसंगासंबंधीं '**खोखर बडो खुराकी, खादो आपा सरिखो डाकों**' अशी उक्ति प्रसिद्ध [असून मारेकऱ्याचें नावही दिलें] आहे [मारवाड इतिहास पृष्ठ १७४ ] जयाजी आजारी असता मारवाडकर राजवैद्याचे हस्ते औषधोपचार करवून गुण दाखविण्याची टाडची शैली विचित्र आहे मारेकऱ्यास इनाम देऊन [ *Rajasthan vol. I page 594* ] त्यावर वैद्यकीय औषधोपचाराची रामबाण मात्रा जी टाडनें दिली [Rajasthan vol. II page 95] तिचे बलावर बखरप्रकाशकास भारतीय कालाचें स्वप्न पडले तर त्यात नवल नाही कल्पनेचा प्रादुर्भावच तसा आहे जयाजी दिल्लीहून थेट मेडता व नागोरपावेतो पोहोंचले त्याचे अस्वस्थतेबद्दल चकार शब्दही कोठें ऐकू येत नाही जयाजीचे पत्रव्यवहाराची गोष्ट सोडा पण दाभोळकर व चिंतोकृष्णाचे पत्री तरी त्याची वार्ता असावी की नाहीं ? पण त्याविषयी मुळींच गंध नाही मग हे वैद्यराज कसे व कोठून आले बरें ! कदाचित् कुंभेरीस जयाजी आजारी असता मारवाडपक्षीय वकीलावरोबरचे वैद्यास असला योग आला असेल तर न कळे कुंभेरीच्या प्रसगाशी हें सूत्र जोडलें असतें तर राजपूत कैवारी टाडची कल्पना संभवनीय तरी भासली असती पण त्यात महती कोणती झाली हे कळत नाहीं महाराष्ट्रीय बांधवास यासंबंधी इतकें सागणें आवश्यकें आहे की, जयाजीचा [ तावसर समीप नागोर येथें ] ज्या जागेवर अंत झाला तेथें त्याची जी छत्री होती ती मोडकळीस आली असता कै सर प्रतापसिंग यानीं शिंदे सरकारचे शुद्ध स्नेहासाठीं तिचा जिर्णोद्धार करून बाग व विहीर खोदून पूजानैवेद्याची देखील योग्य व्यवस्था केली. खरें भारतीय औदार्य म्हटलें तर ते हे होय, व ते चिरस्मरणीय आहे असें कोण म्हणणार नाहीं ? बखतसिंगाशीं पराजित होऊन रामसिंगजी रातोरात उज्जयनीस शिंद्याकडे सहाय मागण्यासाठीं पळून आले व जयाजीस बरोबर घेऊन कोट्यावरून मेवाडातून अजमेरीस आले आणि तेथून मेडता नागोरच्या मोहिमेस आरंभ झाला असें जें कथन टाडचें आहे [ Rajasthan vol. i page 589-90 ] तें अर्थात् या [ भागातील ] पत्रव्यवहारावरून मिथ्या ठरतें. कारण कुंभेरीचा वेढा संपल्यानंतर दिल्ली व नारनोल वरून जयाजी सरळ मेडत्यावर चा करून गेल्यानंतरच मोहिमेस आरंभ झाला असें स्पष्ट आहे

त्यात दोन लाख रूपये पंडिता[१६७] जवळ दिल्हे, त्यांची रसीद घेतली आहे. बाकी तीन लाख रुपये [राहिले] तेही ततबीर करून सत्वरीच देतो. यैसे तुमच्याच पत्रा बा। त्याणी लि।। आहे आणि तुम्ही काहीच लि।। नसे. हे काये ? याउपरी पां  च लाख रुपये त्याजवळ निकडीने मागोन घेउन सर्वार्थी सत्वर पाठवणे म्हणजे तुमच्या सेवेचा मजुरा असे. हर इलाजे यैवज खर्चाकरिता पोख्त पाठवणे. ढील सहसा न करणे. जाणिजे छ * २९ सवाल. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती




---

लेखांक [१४१] श्री * संवत् १८१२ श्रावण वद्य ५

[ २६ अगस्ट १७५५ ]



१६८

राजेश्री बाळाजी येशवंत
कमाविसदार प्रांत कोटे व पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा सित खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे लि।। की विपरीत[१६९] वृत येकिले सबब कासीद दुसरा पा। असे, तरी तत्वता [वर्तमान] लि।। पाहिजे म्हणून लि।. 'तरी तीर्थरूपास खराखुराच दगा बिजैसिंगाने केला. छ १५ सवाली सुक्रवारे कैलासवास जाला. ईश्वरे मोठासा घात केला. दैवी गतीस उपायेच नसे. याउपरी बदोबस्त असणे तो केलाच असेल. चिंता न करणे.' सरकारचे रुपये वर्ते खर्चास कोट्याबाबत पाठवितो म्हणून तुम्ही व अखेरामजी बोलोन गेलेत त्यास फार रोज जाले. अद्यापि ततबीरच करितो म्हणून

---

(१६७) बाळाजी गुलगुल्यास 'पंडित' या संक्षिप्त नावाने कोटेकर संबोधित होते पंडितपणाची छाप त्याजवर किती पडली होती याविषयी पुढें पूर्ण कल्पना होणार आहे

(१६८) 'सिक्कामोर्तब' जर या सुमारास तयार झाला तर जयाजीचे जिवंतपणीं पत्रावर जनकोजींचा स्वतंत्र 'सिक्कामोर्तब' असणें मुळींच संभवणीय नव्हतें आणि सनाचा स्पष्ट हस्तदोष आहे असें म्हणावें लागतें [ लेखांक १३६ टीप १५८ ]

(१६९) जयाजीचे 'विपरीत [अपघात] वार्तेवर बाळाजी गुलगुल्याचा विश्वास बसेना म्हणून त्यानें सत्य वर्तमान कळण्यासाठीं मुद्दाम जो दूत पाठविला त्याचें हें उत्तर आलें.

वारंवार लिहित असता. हे तुम्हास योग्ये नाही. याउपरी करारा प्रा रुपये पांचही सध्या पाठवितोसे बोलला असा ते जलदीनेच पाा देणे. ढील सर्वथा न करणे. छ * १७ मा जिल्काद. ।' वहुत काये लिहिणे हे विनती.

गोतँव सुद

---

लेखाक [१४२] श्री * संवत् १८१२ श्रावण वद्य ५

[२६ अगस्ट १७५५]

पुरवणी राजश्री बाळाजी येशवत प्रांत कोटे व पाटण गोसा यांसि.

रामराम सुमा सित खमसेन मया अल्फ पूर्वी पांच लाखाचा करार तर्त खर्चास पाठवितो म्हणून करून गेला. त्यात आजीपावेतो तीन लाख रुपये सिद्द जाले असेत म्हणून पत्रे माहारायाची व तुमची येतच होती. हलीच्या पत्रात येक लाखाची तयारी केली असे म्हणून लिहिता. हे अपूर्व वाटते ! त्यास येथे खर्चाची वोढी वहुतसी असे. हे गोष्टी चित्तात आणून हर तजवीज करून कोट्याकडून व पाटणाकडून खर्चा कारिता येवज पोव्हत अम्हाजवळ येई ते गोष्ट करणे. येविसी ढील सहसा न करणे. उजेनी कडून खर्चास येवज आणविला होता. त्यास दिरंग लागला असे सवब लिहिले आहे हा अर्थ चित्तांत आणून हर तजवीजेने पैकां खर्चा करिता सत्वर सत्वर पाा देणे जाणिजे छ * १७ माहे जिकाद. ।' तर्त हरयेक येवजी रुपये पनासा हजाराच्या हुड्या करून पाठउन देणे. येक घडीचा विलंब न करणे. हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१४३] श्री * सवत् १८१२ श्रावण वद्य १४

[५ सितंबर १७५५]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवत
कमाविसदार प्रात कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूर

सन सित खमसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. ' राजे माधोसिंग[१७०] यानी अनुसंधाने केली. त्याचे वर्तमान लेहून पाठविले. ते सविस्तर कलो आले. ते गोष्टीची चिंता कार्य आहे. ईश्वर कृपेकरून त्याचे पारपत्य केले जाईल.' जन्म अष्टमी जाल्यावर माहाराव लाखा रुपयाची निशा करून देतील म्हणोन लखन केले. तर ज्याप्रमाणे अखेराम पंचोली यथून करार करून गेले आहेत त्याप्रमाणे रुपये पावते केले तर पूर्ववतप्रमाणे स्नेह राहील नाहीतर कळतच आहे. यास्तव तुम्ही माहाराउ यास समजून सांगोन करारा प्रमाणे वसूल करणे. येथे खर्चाची वोढ आहे. जलदीने वसूल करून आपल्या वाटणीचा ऐवज सत्वर पाठविणे. पा पाटण येथील करार तुम्ही करून गेला तो होउन गेला. कराराप्रमाणे रुपये पाठविले नाहीत. हे अपूर्व आसे ! दोन दिवस दुकाने बंद[१७१] जाली. प्रस्तुत हुंड्यापांड्या चालत आसतील तर पाटणच्या बाकीच्या ऐवजाच्या हुंड्या करून पाठवणे. जाणिजे छ २७ जिलकाद. ।' बहुत काय लिहिणे हे विनती.

मोर्तब सुद

पौ भाद्रपद शुद्ध ९
[ १४ सितंबर १७५५ ]

---

(१७०) हे जयपूरवाले राजे माधवसिंग यानी जयाजी निजधामास गेले असें पाहून विजयसिंगाचा पक्ष उचलून जनकोजीची मगरमिठी शिथिल करण्याच्या हेतूने शिंद्याचे पिछाडीवर लाडगेतोड करण्याची युक्ति केली आणि त्या कामावर ' अनुरुद्धसिंग खंगारोत ' नावे सरदाराची योजना केली. तो फौजेसह 'नारायणावर आला ' त्याचे मुकाबल्यास 'राणोजी भोइटे, नरसिंगराव सिंदे व खानाजी जाधव यास पाठविलें ' त्यानी ' छ ९ मोहरमी [ कछव्याच्या फोजेस ] मारून हजार बाराशे घोडे घेतले व तोपखाना घेतला सात आठशे रजपूत कापून काढिले, असें दाभोळकर वर्णन देतो [ २३ अक्टुबर १७५५ ]

(१७१) माधवसिंगजी जयपूरवाले याशीं युद्ध आरंभले त्यामुळे किंवा जयाजीचे निधनानिमित्त कोटेकरांनी 'हरताल' केल्यामुळे ही दुकाने 'बंद' झाली ! हें सांगणे कठिण आहे अशा प्रसंगी उलट व्यवहार म्हणून 'हरताल' करण्याची जी प्रथा शिंदेशाहींत चालू आहे, तिचा उगम कोठें तरी असलाच पाहिजे. राज्यारोहणासंबंधी ह्या राजकीय व्यवहाराचा सुगावा ज्याप्रमाणें या वेळेपासून स्पष्ट सांपडतो [लेखांक १४६] तर 'हरताल' या चालीचे हें सूत्र नसेल कशावरून ? ज्याअर्थी शिंदेशाही पाटणचाही उल्लेख आलेला आहे त्याअर्थी हरतालीचेंच स्वरूप जास्त संभवनीय वाटतें.

लेखांक [१४४] श्री * संवत् १८१२ भाद्रपद वद्य ११

[१ अक्टूबर १७५५]




राजश्री बाळाजी येशवत

कमाविसदार प्रात कोटे व पाटण गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूर-सन सित खमसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. हुंड्या जैपुरच्या

१५,००१ परगणे पाटणपैकी

१२,००१ प्रांत कोटे येथील यैवजी.

२७,००१

येणेप्रमाणे सतावीस हजार दोन रूपयाच्या पाठविल्या आहेत. रूपये पावल्याचा जाब पाठवावया आज्ञा केली पाहिजे म्हणोन लिहिले. तर सदरहू हुडीपत्रे राजश्री नानाजी नाईक पोतदार याजपासी देउन जैपुरास पाठविली असेत. सही होउन यैवज जमा जाल्या नंतर रूपये पावल्याचा जाब मागू[न] लहून पाठउ राजश्री माहाराउ याच्या [श] रीरास सावकास नव्हते. ते श्रीने कृपा [के]ली. प्रस्तुत समाधान आहेत अज्ञप्रमाणे [सा]रंगावे ते रीतिने सांगितले. टेहलवीया[स] ताकीद आहे, दडढोर लोकास होतो त्यास[ही] ताकीदच आहे. रुपये येतील त्याप्रमाणे शेवेसी पाठउन देउ म्हणोन लखन केले. त[री] साल गुदस्ता अखेराम पचोली येथून तीर्थरूपासि करार करून गेला त्या प्रमाणे राजश्री मल्हारजी बाबानीही मान्य केले असोन अद्याप रूपये न दिल्हे ! येणे प्रमाणे राजश्री मल्हारजी बाबानीही मान्य केले असोन अद्याप रूपये न दिल्हे ! येणे करून स्नेह कसा राहतो ! यैसे पष्ट माहाराउ यास सागोन कराराप्रमाणे रूपये वसूल करून घेणे. आमच्या वाटणीचा यैवज येत येईल त्याच्या हुंड्या वरचेवर पाठवीत जाणे मारवाडचा प्रसंग सर्व तुम्ही आपले दृष्टिने[१७२] पाहिलाच आहे. खर्चास यैवज पाहिजे. पत्र

(१७२) मारवाडची मोहीम चालूं असता बाळाजी गुलगुले अनेक वेळा आला गेला असें नव्हतें पण जयाजीचे विपरीत वार्तेनंतर तो लगेच गेला होता की काय ? अपघात वार्तेसरशी 'वछव्याची शोरी वाढली त्याची अनुसंधाने, कोट्याहून बाळाजी कळवीत होता' त्यावरून हें शक्य दिसत नाहीं [लेखांक १२७, १२८] [लेखांक १४३] मागील भेटीचा हा हवाला असवा असें वाटतें

पावताच पाटणची बाकी करारपैकी राहिली. आहे ते व गामज यथील बाकी व कोव्याचा वसूल येईल त्यापैा वाटणीचा यैवज येत जाईल यैसे जमा करून हुडी जैपुरची सत्वर पाठउन देणे. हुडी पाठवावयासि दिवसगत न लावणे. जाणिजे छ * २४ जिल्हेज. ।' बहुत [का]ये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैा आसोज सु.

---

लेखांक [१४५] श्री * संवत् १८१२ आश्विन वद्य ३

[२३ अक्टुबर १७५५]

पुा राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि.

रामराम सुहूरसन सित खमसेन मया व अलफ. प्रांत कोटे येथील वसूल आला त्याच्या वाटणीचा यैवज वरचेवर पाठविला आहे. करारमधे वसूल होणे आहे त्याच्या विसी तगादा केला आहे. लोकास दंडदोर केला आहे. वसूल जाल्यानंतर देतो म्हणून म्हण[त] जातात. प्रस्तुत माहारावजी श्री [नाथ] जीच्या द्वारास स्वार होउन जाणार. जातेसमई निर्वाह करून जांतील. त्याप्रमाणे सेवेसी लेहून पाठउ म्हणोन लिहिले. तर वरचेवर जावासाल करितात. येणे करोन त्याचा परिणाम कसा शेवटास जाईल. बहुता प्रकारे तुम्ही त्यास समजाउन सांगोन कराराप्रमाणे वसूल घेणे. वसूल घ्यावयासि सुस्ती न करणे. आमच्या वाटणीचा यैवज वरचेवर पाठवित जाणे. जाणिजे छ * १६ मोहरम. ।' हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१४६] श्री * संवत् १८१२ आश्विन वद्य ३

[२३ अक्टुबर १७५५]

पुा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

रामराम सुहूरसन सित खमसेन मया व आलफ. माहाराव यानी आम्हा बा

तपसील.

१५,००१ पा पाटण साल गुापैा

१०.००१ प्रांत कोटे साल गुाचे यैवज

२५,००२

ऐ येणेप्रमाणे पंचवीस हजार दोन रूये जमा पोते जाले आसेत. परंतु सदरहू हुंड्याच्या टीपा पाहिजेत तर पत्र पावनाच पचवीस हजार दोन रूपयाच्या पेठा लेहून पाठवणे येथे उभयताच्या स्वाधीन हुंड्या केल्या त्याजपासोन रूपये सरकारात घेतले. परतु हुडीपत्रे सही जाली नाहीत. कासिद मार्गी मारला गेला. यास्तव लिहिले आसे. जलदीने पेठा पाठउन देणे. टीक्याचा हती चांगला व घोडे उत्तम वगैरे सामान समागमे घेउन येणे. मार्ग सुरक्षित चालतो. चिता नाही. माहाराव यात्रा करून आलाच असेल. कोट्याच्या यैवजी चालीस पंनास हजाराच्या हुंड्या त्याजपासी मागोन घेउन बाा आणणे. जाणिजे छ ४ सफर. वहुत काय लिहिणे ॥ हे विनंती.

मोर्तब सुद

पौा कार्तिक शुद्ध १२. तेरख ४ सफर.
[ १५ नवंबर १७५५ ]

---

लेखांक [१४८] श्री * संवत् १८१२ कार्तिक वद्य १२
[ ३० नवंबर १७५५ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवत
कमाविसदार पा पाटण प्रांत बूंदी गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा सित खमसेन मया अलफ. श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामी यांची उंटे २०० दोनसे खरिदीबदल मारफात राजश्री गोविंदराव कृष्ण याजकडून पाटणचे यात्रेस सरकारचे जासूद व सारवान [ व ] त्यांचा भला माणूस कारकून राा गंगाराम गोविंद यैसे खरिदीबदल गेले. तेथे यात्रेत र [ह] वारीयासि पैका उंटाकरिता खरिदीस दिल्हा. त्यास तुम्ही दिकत करून

जकात मागता व वेपारीयासि फिशाद करून उटे खरिदी होउ दिल्ही नाहीत. सरकारची दस्तके श्रीमताची व आमचीही दस्तक यैसी [त्याजपाशी] असता हे तुम्ही करावे! यैसी गोष्ट तुम्हास योग्य नाही. दरबारी माणूस तुम्ही असोन यैसे यैकोन अपूर्व वाटले. याउपरी हे पत्र सहस्र पत्राचे जागा जा[णून] ॥ सरकारचे जासूद व सारवान व अजमेरकर कारकून ज्या प्रो सरकारच्या खरिदी उंटाविसी सागतील त्याप्रमाणे साहित्य करून जकातीचा तगादा न करिता आपला व कोटेकर याचा बदरका[१७४] उंटाबराबरी सरकारच्या देउन माल्वे प्रांते उंटे २०० दोनसे सरकारची सुरक्षित पोहचेत ते गोष्ट करणे. याउपरी नालस काही न ये ते करणे. जाणिजे छ * २५ माहे सफर. ।' श्रीमंताचे दस्तक असता त्याच्या उटास खलेल करावे हे आपूर्व आहे ! याउपरी उटा बा माणसे देउन मुकुंदवरी पार करून देणे. कोणे गोस्टीचा उजूर न करणे. बहुत काय लिहीणे हे विनती.

(मोतब मुद)

---

लेखांक [१४९] श्री * सवत् १८१२ कार्तिक वद्य १२

[ ३० नवंबर १७५५ ]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सु त जनकोजि सिं दे निरतर)

राजश्री बाळाजी यशवत कमाविसदार सा कोटे वगैरे गो यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूरसन सित खमसेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. पेशजी हुड्या पंचवीस हजार दोन रूपयाच्या पाठविल्या त्याच्या पेठा पाठविल्या आहेत. घेउन उत्तर पाठवावे. माहाराव याने टीका तयार केला असे समागमे घेउन अवेसी येतो म्हणोन लिहिले. तर पेठा पाठविल्या त्या मोजीराम साहुकार याचा स्वाधीन केल्या. माहाराव याने टीक्याचे साहित्य करून दिल्हे त्यात घोडे, हाती चागला नसला तर उत्तम पाहून समागमे घेउन येणे. मोजीराम साहुकार याची वरात तुम्हावर पंचवीस हजार रूपये याची केली आहे. तो यैवज

---

(१७४) बदरका ह्मणजे वाट दाखविणारा, वाटाड्या [ राजवाडे ऐग्र खंड ८ पान ३७२ ] हा शब्द पूर्वी आला आहे [ लेखाक १०९ ] पण नजरचुकीमुळें टीप देणें राहिली ती येथें दिली आहे

त्यासी पावता करून कब्रज घेणे. हरयेक यैवजी मजरा दउ. वरात माधारी न पाठ व्णे. जाणिजे छ * २५ सफर. ॥ बहुत काये लिहिणे हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१५०] श्री * संवत् १८१२ मार्गशीर्ष वद्य १२

[ ३१ दिसंबर १७५५ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत

कमाविसदार पा पाटण प्रांत बुंदी गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमासित खमसेन मया अलफ. हरणाथसिंग व सुरबसिंग व संग्रामसिंग मारवाडकर हे कामा करिता प्रांत मजकूरीहून माळवे प्रांते पोटे भरावयास जात असता पाटण कसब्यास श्री च्या मेळ्यास आले होते. त्याजवळ उंट सर २६ व घोडे २ दोन वगैरे वस्तभाव होती. ते सारेच पाटणामध्ये हिरोन घेतले आहे. तरी गरीबे[१७५] पोट भरावयास जातात. त्याजवरी येणेप्रमाणे करावे यैसा अर्थ नाही. याउपरी उंटे २६ सव्वीस व घोडे २ वगैरे चीज वस्त जे घेतले असेल त्याप्रमांणे जरा बजरा देवणे. फिरोन नालस हुजूर त्याची न येते गोष्ट करणे जाणिजे छ * २७ माहे रबीलौवल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१५१] श्री * संवत् १८१२ पौष शुद्ध ६

[ ७ जनवरी १७५६ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत

कमाविसदार प्रांत कोटे व पा पाटण गोसावी यांसि

---

(१७५) मारवाडकराशीं प्रत्यक्ष युद्ध चालू असता त्याच्या जातभाई प्रजेशीं किती सरळ व शुद्ध वर्तन ठेवण्याबद्दल हें धोरण होतें बरें?

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा सित खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे लिहिले वर्तमान अवगत जाले. माहारावजी पैका सरकारचा देतो देतो म्हणतात. देतील तेव्हां पाठउन देउ म्हणून वारंवार पत्रे लिहिता. हेच अपूर्व असे ! त्यास तुम्ही निकड करून सरकारचा पैका तुम्ही [व] अखेरामजी यैसे करार केलात त्याप्रमाणे सत्वर मागोन घेणे. हे गै न करणे. जरी त्याणी करारा प्रा यैवज दिल्हा तरीच त्याचा आमचा स्नेह राहील. नाही तरी स्नेहास अतर पडेल. यैसेच त्यास परिछिन्नवादे सांगोन यैवज मागोन घेउन जल्दी पा देणे 'येथील वृतांत सिधांत ठरेल त्याप्रमाणे लेहून पाठविले जाईल. सरकारची उटे श्रीमत साहेब कडील मकुदवरीपलीकडे पार करून दिल्ही. जकात त्यास माफ केली म्हणून लिा. [तरी] बहुत उत्तम केलेत. जाणिजे छ * ४ राखर. टीका घेउन येतो यैसे फार रोज लिहिता. अपूर्व असे. याउपरी सामान चांगले व हत्ती उत्तम यैसे सत्वरीच घेउन येणे व पैैका खर्चाकरिता हर इलाजे मातबरच घेउन येणे म्हणजे तुमचा मजुरा असे छ मार ।' बहुत काय लिहिणे हे विनंती

(मोर्तब सुद)

लेखाक [१५२] श्री संवत् १८१२ माघ शुद्ध ७

[ ७ फरवरी १७५६ ]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिदे निरतर)

राजश्री बाळाजी येशवंत प्रात पाटण गोसावी यासि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सन सित खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पा ते पावले. लिा वृत कळले. हरनाथसिंग व सरवरसिंग व संग्रामसिंग याचे उटाविसी लिा म्हणून त्याची चौकसी करिता ठाकराचे उंट नव्हते. र[ह]बारी याचे उट [ठाकरानी] चोरी आणले होते. त्यावरून चौकसी करून जमींदार व राठोड याचेच मारफातेने ज्याचे उट खरेखुरे जाहले ते त्याचे त्यास दिल्हे. त्यांची कबजे घेतली. सरकारात तिही हिशात मिळोन उंटे आठ घेतली आहेत. येणे प्रा कजिया विल्हेस लाविला म्हणून लिहिले. ते कळले. बहुत उत्तम केलेत. सरकारची उटे

निगादास्तीने ठेउन ताजी राहत ते करणे. जाणिजे छ * ६ माहे जमादिलौवल. ।' बहुत काय लिहिणे हे विनती. (मोर्तब सुद)

पैा छ १७ जोवल.
[ १८ फरवरी १७५६ ]

---

लेखांक [१५३] श्री * संवत् १८१२ माघ शुद्ध १२
[ १२ फरवरी १७५६ ]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जनाजि सु त जनकोजि सि दे निरतर)

राजश्री बाळाजी येशवत प्रांत कोटे गोसावी यांसी.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा सित खमसेन मया अलफ. ऋफजी वोहरा व चिरंजिव वोहरा हे कसबे बूंदीकर त्याजकडे सरकारचे रुपये दाहा हजार आहेत. येशास त्याणी तेथून पळोन तुमच्या प्रांतात कोट्याच्या मुल्कांत येउन राहिले असेत. तरी त्याजविसी श्री माहारावजी व अखेराम यांसि सागोन सरकारचे रुपये त्याजकडून देवणे व वोहरे मजकूरही राजश्री विठलराव गोपाळ या जवळ देवणे. सरकारचे रुपये सुटणार नाहीत. त्यास आसरा कोटेकर न देत. सरकारचा यैवज वाजवी मशारनिले घेत. वोहरे यांसिही पूर्वप्रमाणे बूंदीमध्ये आणीत [ व ] नांदवीत ते करणे. येविसी है गै सर्वथा न करणे. जाणिजे छ * ११ माहे जमादिलौवल. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

---

लेखांक [१५४] श्री * संवत १८१२ फाल्गुन शुद्ध ७
[ ८ मार्च १७५६ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

रामराम सुहूरसन सित खमसेन मया व आलफ. पा पाटण येथील यैवजी हुंड्या

रुपये १०,००० दाहा हजारच्या जैपूरच्या पाठविल्या त्या पावल्या. त्या हुंड्या राजश्री नानाजी नाईक पोतदार याजपासी देउन जैनगरास पाठविल्या आहेत. सही होउन यैवज जमा जाल्यानंतर जाब मागून लेहून पाठउ. पा मारच्या यैवजी माघ मासचे रुपये येणे चालीस हजार त्यापैा दाहा हजार पाठविले. बाकी तीस हजार रुपये राहिले. ते पत्र पावतांच सहरहू यैवजाच्या हुंड्या करुन पाठविणे. यैवज खर्चास पाहिजे म्हणोन जरूर जाणोन लिहिले आसे. आधी आधी तीस हजारच्या हुंड्या पाठविणे ढील कराल तर व्याज द्यावे लागले. हे जाणोन सदरहू यैवजाच्या हुंड्या करुन पाठवणे. राजश्री मल्हारजी बाबा होळकर याजकडील सटवाजी राजोले वगैरे खैराबाद वकानी वगैरे महालात आले आसेत म्हणोन लिहिले ते सविस्तर कळले. पुढे नवल विशेष वर्तमान [त्याचे] येईल तें वरचेवर लेहून पाठविणे. जाणिजे छ * ६ जमादिलाखर. ॥ हे विनंती.

मोतेव सुद

पैा फाल्गुण सुध १३. ता ११ माहे रविलाखर
[ १४ मार्च १७५६ ]

---

लेखांक [१५५]

श्री ॰ संवत् १८१२ फाल्गुण शुद्ध १०
[ ११ मार्च १७५६ ]




राजश्री बालाजी येशवंत प्रात कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा सित खमसेन मया अलफ श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामी याणी राजश्री रामजी नाईक भिडे पोतदार यासी पोतदारीच्या यैवजी रुपये १३,००० तेरा हजार वरात राजश्री मल्हारजी होळकर याजकडून देवविले. ते त्यानी आपल्या वाटणीच्या यैवजी प्रा मारी राजश्री आबाजी रघुनाथ याजकडून देवविले आहेत. यैशास नाईक मशारनिले याणी सदरहू रुपये आम्हास देवविले आहेत तरी तुम्ही तेरा हजार रुपयाच्या हुड्या राजश्री मल्हारजी बाबाच्या वाटणीबाबत आबाजी रघुनाथ याजकडून घेउन



श्री राणोजी शिंदे यांची छत्री, श्रीक्षेत्र अवंतिका रामघाट, क्षिप्रातीर.
( लेखांक १५६ )

जैनगरच्या हुंड्या करून जलदीने आम्हाकडे पाठवणे. येविसी हैं गै न करणे. जाणिजे छ * ९ माहे जमादिलाखर. 1' बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

---

लेखांक [१५६] श्री * संवत् १८१२ फाल्गुन वद्य १०
[२५ मार्च १७५६]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर)

राजश्री रामराव निळकंठ
कमाविसदार पा। हवेली उजैन गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दंडवत सुमा सित खमसेन मया अलफ. तीर्थरुप कैलासवासी [राणोजी बाबा शिंदे] यांची छेत्री कसबे उजैन क्षेत्र अवंतीकेस[१७८] आहे. त्या छेत्रीस दरसाल जाजम १ एक व तेल वजन ८८। पावसेर येणेप्रमाणे छत्री सरकारचीस देवविले आहेत. तरी लिहिल्याप्रमाणे देववीत जाणे. हैं गै न करणे. जाणिजे. छ * २३ माहे जमादिलाखर. 1' बहुत काय लिहिणे हे विनंती.

(मोर्तब सुद)

---

लेखांक [१५७] श्री * संवत् १८१३ वैशाख वद्य १
[१५ मे १७५६]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर)

राजश्री बाळाजी येशवंत व चिमणाजी गोविंद
कमाविसदार प्रा। पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दंडवत सुहूरसन

---

(१७८) अवंतिकेंतील राणोजीची छत्री या पूर्वी तयार झाली असावी असें वाटतें 'तीर्थरूप [राणोजी बाबा शिंदे] असें जनकोजी जरी ह्मणत नसले तरी महादजी शिंदे तसें स्पष्ट सांगतात ते पत्र पुढे येणारच आहे [२२ सितंबर १७६३] पहा टीप ६६

सित खमसेन मया व आलफ. पा मजकूरी कारकून आा २ पेशजीपासून आहेत त्याप्रमाणे करार करून पाठविल्या आसेत. त्याचे वेतन बारमाही समाइक रुपये.

८००, निसाजीराम सरमजामदार.

७००, गणेश दादाजी.

———

१५००.

येणेप्रमाणे पधरासे पूर्ववतप्रमाणे तुम्हाकडून देविले आसेत. तर सदहू पधरासे प्रा मजकूरच्या इजारियाच्या यैवजी साल मजकूर पैा पावते करून पावल्याचे कबज घेणे. जाणिजे छ * १५ साबान. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैा छ २ माहे शौवाल.
आषाढ शुद्ध ४. मुा बूंदी.
[ १ जुलै १७५६ ]

बार.

———

लेखांक [१५८] श्री * संवत् १८१३ जेष्ट शुद्ध ११
[ ९ जून १७५६ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवत प्रा कोटे गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा सबा खमसेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तिकडील सविस्तर वर्तमान लिहिले त्याजप्रमाणे सविस्तर कळले. यैसीयास रा नारो बाळाजी यास वरात दिल्ही आहे त्याज प्रमाणे यैवज त्यास पावता करणे. ज्याप्रमाणे तुम्ही करार केला आहे त्याजप्रमाणे यैवज सत्वर रवाना करणे. येथे लोकाचे समजाविसीस पैका पाहिजे. रा रामराव नीलकठ याजकडे रुपये वीस हजार पावते करून त्याचा जाब पाठविला तो पावला. बाकीचा येवज राहिला त्याची तरतूद सत्वर करून पाठवणे. राजश्री गोविंद मनाजी तुम्हापासी जाउन निवीत

वसले आहे. वोहरियाचा रुपयाची अथवा तुमच्या खासगत टीपेच्या रुपया पाठवावयाची तुम्हा उभयेतास चिंता नाही. अपूर्व आहे! याउपरी तुम्ही खासगत टीप आठावीस हजाराची आहे ते रुपये सत्वर पाठवणे. बोहरियापैकी न उगवे तरी खासा स्वारी सत्वरीच त्या प्रांतास येत आहे. पंनास स्वार पाठउन सर्वा वोहरीयास धरून आणून व्याजसुधा रुपये घेउ. चिंता नाही. परंतु तुम्ही सख्त तगादा करावयास न चुकणे. त्याचे दारी माणसे वसउन रुपये घेणे. तुमची माणसे फोटेकरानी उठउन दिल्ही तरी मग न मागणे. त्याचे फळ [ते] आविलंबे पावतील. जितकी तजवीज करून रुपया पाठवाल तो [या वेळा] आमच्या मोठ्या उपयोगास पडेल. 'श्रीमत राजश्री दादासाहेबाचे व मल्हारजी होळकर याचे वर्तमान लिा ते कळले. व याउपरीही वरचेवर लिहित जाणे. देवीसिग इंद्रगडवाल्यास उमेदसिंगाने दगा करून मारल्याचे वर्तमान लिा तेही विदित जाले. शांगड्यानी येव्हढे कर्म[१७७] मात्र [खोटे] आविलबिले आहे! त्यासही येखादा तेच गत करील.' जाणिजे छ ॥ १० माहे रमजान. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.




---

लेखांक [१५९] श्री * संवत् १८१३ आषाढ शुद्ध ६

[३ जुलै १७५६]

असल बमोजिब नकल.

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत पाटण गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी शिंदे दंडवत सुहूरसन सबा खमसेन मया अलफ. कस्बे पाटण येथे पुरोहित लेपाल [?] याचा पुत्र नाथुराम याची जमीन वीघे सुमार २० वीस वीघे पुण्यार्थ आहेत [ती] हाली पावत नाही म्हणोन विदित

(१७७) जयाजी शिंद्याप्रमाणें अनुचित मार्गानें देवीसिंगाचा शेवट उमेदसिंगानें केला या कर्माबद्दल जनकोजीची ही तिरस्करनीय वाणी मोठी प्रशंसनीय असून मराठ्यास ती भूषणास्पद आहे यात शंका नाहीं मराठे आपले जिवावर खेळले परंतु या कुटिलनीतीचें अवलंबन मात्र त्यानी कधींही केलें नाहीं याबद्दल अभिमान वाटतो खरा.

जाहलें. त्यावरून सदरहू तीस बीघे जमीन करार करून दिल्ही असे. तरी सुदामत[१०८] गोगवटा मनास आणून पूर्वी ह्याच्याच्या अमलात चालत असे त्याप्रमाणे तुम्हीही चालवत जाणे. मुख्य पत्राची प्रत लेहून घेऊन मुख्यपत्र गोगवटी यास भटजीस परतोन देणे. सालदरसाल नूतन पत्राचा आक्षेप न करणे. सदरहू तीस बीघे जमीन ह्याच्याच्या अमलात चालत आली आहे त्याप्रमाणे चालवीत जाणे. जाणिजे छ * ४ सवाल. बहुत काय लिहणे हे विनती.

---

लेखांक [१६०] श्री * संवत् १८१३ आषाढ शुद्ध ७

[४ जुलै १७५६]



राजश्री बाळाजी येशवंत व राजश्री आबाजी रघुनाथ
कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दंडवत सुमा सबा खमसेन मया अल्फ. राजश्री येशवंतराव पवार याजकडे पा मारी समाइक वाटणीत रुा सोळा १६ दर सदे आहेत [हे] तुम्हास दखलच असे. येशास त्याणी साल मजकूरी राजश्री बाळाजीराम यासी कमाविस सांगोन पाठविले आहेत. तरी साल गुदस्ताची बाकी चा येवज व हाली सालचा वसूल प्रांत मारचा येईल त्या प्रा त्याजकडील येवज वाटणी बमोजिब येदिकन निःप्रपंच देत जाणे. तुम्ही व बालाजीराम याजकडील गुमास्ते राजश्री कृष्णाजी बापूजी हे येकाविचारे असेन जाउन हरयेक कामकाज करीत जाणे. वाटणीमध्ये येके काडीची तफावत सहसा न करणे. जाणिजे छ ५ माहे सवाल.

---

(१०८) जो नवीन प्रदेश जिंकिला तेथील देवस्थान, धर्मादाय, ब्राह्मण, गोसावी, जोशी, पुरोहित आदि सत्कार्य व सत्पात्राकडे जी उपजीविका चालत आली ती बंद न करिता शिंदेशाहीत पूर्ववत् पाळली जात होती, असें दाखविण्यासाठीच ही पत्रें दिली आहेत. [लेखांक १६१, १८९, १९२ ते १९५, १९७, २०१ ते २११]

॥ आषाढ शुद्ध १ पासून जो वसूल येईल त्याची वाटणी देत जाणे. बहुत॥ काये लिहिणे हे विनती.

(मोर्तब सुद)

पैावस्ता छ ५ सवाल. आषाढ शुद्ध ७. वरोवर रा कृष्णाजी बापूजी गुमास्ते राजश्री बाळाजीराम.
[४ जुलै १७५६]

---

लेखांक [१६१] श्री * संवत् १८१३ पौष वद्य ११
[१६ जनवरी १७५७]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सु त जनकोजि सिं दे निरंतर)

राजश्री बाळाजी येशवत प्रात कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुमा सबा खमसेन मया अलफ. मोजे खांववदा[१७९] तपे एनवाडी हा गाव राजश्री सदासिव बलाळ [ ? ] यासी कासा[१८०] महाराव हाडे याणी दिल्हा असे [ते] तुम्हास दखलच आहे. त्यास हाली राजे अजीतसिगजी[१८१] हाडे [कोटेकर] यासी गावाविसी सागोन गाव मा॥र मशारनिले कडे चाले यैसे करणे. येविसी हे गै न करणे रा छ * २५ राखर सुदामत आसे त्या प्रमाणे करणे. ॥ बहुत काय लि॥ हणे हे विनंती.

(मोर्तब सुद)

---

(१७९) खात्रवदा. हा गाव नकाशात मिळत नाही कोटा राज्यातील सागोद पासून ६ कोसावर दक्षिणेस 'पनवाड' म्हणून गाव आहे तो पूर्वीचा 'पनवाडी' परगना असू शकेल तर न कळे

(१८०) कासा=भोजनपात्र, ताट या पर्यायाने उदरनिर्वाह असा अर्थ होतो 'पोटगी' हा मराठी शब्द समानार्थी होईल

(१८१) या अजीतसिगजीस गादीवर बसवित्यामुळेंच '४० लक्षाची मानवर खंडणी' ठरविता आली त्याचे सविस्तर कारण पुढे दिलें आहे [ लेखांक १७९-१८० ]

लेखांक [१६२] श्री * संवत १८१३ पौष वद्य १२
[१७ जनवरी १७५७]




राजश्री बाळाजी येशवत कमाविसदार पा॥ पाटण गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो. जनकोजी सिंदे रामराम सुमा सबा खमसेन मया अलफ. रा॥ चिंतो नारायेण[१८२] [काष्टीकर] याची आसामी पा॥ पाटणास दरसाल रुपये २५० अडीचसे मा॥ [महाल] मा॥र पैकी नेमणूक आहे. त्यास सन खमस व सन सित दुसाला रुपये ५०० पांचसे राहिले. ते तुम्ही त्यास आद्यापि दिल्हे नसा. हे अपूर्व असे! हली देखता पत्र सदरहू रुपये पांचसे देणे आणि सन सबाचेही वेतन रुपये २५० अडीचसे देणे. त्याचा भाउ वैंकाजी नारायेण आला असे. त्याजवळ सदरहू रुपये साडे सातसे देणे. हे गै न करणे. जाणिजे छ * २६ राखर. बहुत काय लि॥ माहल मजकूरचे यैवजी सदरहू रुपये पाववणे. हे विनंती.

गोर्तब
सुद

पै॥ छ २३ जाखर.
[१४ मार्च १७५७]

---

लेखांक [१६३] श्री * संवत् १८१४ चैत्र शुद्ध ७
[२७ मार्च १७५७]




राजश्री चिमाजी गोविंद व रामाजी जगन्नाथ
पा॥ पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे दडवत सुमा

---

(१८२) चिंतो नारायण उपनाव काष्टीकर, किशोरी पाटण येथील कोतवालीचे कामावर होते [लेखांक १२४] त्याला एक बंधु व्यंकाजी असून ते उभयता सिंदेशाहीतच होते असें कळतें.

सन्ना खमसेन मया अलफ. तुम्ही पा मजकूरी जाउन गांवगन्नाचे चणे व गहूं कापून आणिता, मनमाने तैसी वर्तणूक करितां, कडबे नेता, रयेत लोकास हरतऱ्हेने तसदी देउन नागवीत आसा. सरकारचा परगना खरावीत आणलात. सरकारचे कचेरीत पूर्व प्रो बसोन कामकाज करीत नसा. यैसी कितेका प्रकारची बदफैली करितासे वर्तमान कळले. तरी हे कार्यास येणार नाही. जे जे तुम्ही परगणियात नुकसानी कराल त्याचा जाब तुम्हा-सच करणे लागेल. सुटणार नाही हे पष्ट समजोन वर्तणुक करणे. तुमच्या हिसेबाचा फडशा हुजूर जाला त्यात तुम्ही रा ॥ जश्री बालाजी येशवंत याजकडे यैवज निावार लेहून दिल्हा आहे. तो त्यासी तुम्ही रुजुवात करून त्याजकडे सरकारचा पैका जमा जाला यैसे तुम्ही लेहून त्याचे कबज घेउन पाठवावेसे केले आहां. त्या प्राच त्याचा कागद घेउन हुजूर पाठवणे. जरी त्याणी तुम्हास कबज न दिल्हे तरी सदरहू यैवज त्याचे निसबतीस तुम्ही लिहिला असे तो तुम्हापासूनच घेणे जरूर लागेल. सोडणार नाही. हे पष्ट जाणून मशारनिलेची रजाबंदी करून यैवज जमा जाला यैसी रसीद त्याची घेउन सत्वर पाठवणे. जरी न पाठवाल तरी हुजूरुन वरात करणे जरूर लागेल. मग श्रमी व्हाल. तुम्हास सोड सूटही फारच देउन रयात तुमची केली. ते तुम्हास उपकारच नसेत. तेथे जाउन रंग आणखीच केलात. असो तुम्हीच फलादेस आपल्याच कर्तुत्वें पावाल. जाणिजे छ * ६ रजेब. बहुत काय लिहिणे हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१६४] श्री * संवत् १८१४ चैत्र शुद्ध ७

[ २७ मार्च १७५७ ]

पुरवणी राजश्री चिमाजी गोविंद व रामाजी जगन्नाथ गोा यांसि

सुमा सन्ना खमसेन मया व अलफ. देवीदान मौजे गुंडलेकर[१८३] याजवर सरकारचे रुपये पांच हजार सरकारचा नजराणा ठरावीक आहे तो त्याणे दिल्हा नाही. यैसे असतां

(१८३) मौजे गुंडले हें गाव परगणे चेचट पैकी असून देवीदान हा तेथील जमीदार अथवा जागीरदार असावा समाईक सरकाराची संमती न घेता होळकराकडील कमाविसदार चिमणाजी गोविंद याचा गुमास्ता रामाजी जगन्नाथ याने त्याची स्थापना करण्याचा घाट घातला असें पाहून 'मुद्दामत नजराणा घेऊन स्थापना' करण्याची संमती शिंद्यांनी दिली होती [ लेखांक १७२ ]

त्याची तुम्ही वकप केलीत. गांवावरी त्यास आपलेच मते स्थापिलात. तरी हे आम्हांस मानणार नाही. सरकारचे रुपये त्याजकडे आहेत ते त्याजकडून वसूलात आणून पाठवणे. जरी हे गै करून मधिलेमधे उडवाउडव करून टावाल तरी रुपये पांच हजार तुम्हासच देणे सरकारचे येतील. सुटणार नाही. सरकारच्या मामलयात लटकीच फिशाद तुम्ही मांडली आहे. आंग जोरियानेच वर्तता. [तरी] परिणाम उत्तम पाहोन वर्तत जाणे. सरकारचा रुपया तुम्हाकडे मोबलग होता त्यात तुम्हास सोड सूट देउन तुम्हास मोकळे केले. त्याचा उपकार वरचेवरी तुम्ही [या प्रकारे] उगविलात. त्याचे संकट काये असे ! जाणिजे छ * ६ रजेब. हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१६५] श्री ※ चैत्र शुद्ध ८ सवत् १८१४.

[२८ मार्च १७५७]

श्री जोती स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरतर

राजश्री बाळाजी यशवत

प्रात कोटे व पा पाटण गोसावी यांसि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजो सिंदे रामराम सत्रा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे लिहिले वर्तमान 'श्रीमत राजेश्री [रघुनाथराव] दादाकडील व दिलीकडील व मारवाडातील वृतात लिा त्याप्रमाणे कळले'. व बोहोरे कोटेकर यांच्या टीपाचे येवजी आठ हजाराच्या हुडया उजेनीच्या रा रामराव निलकंठ याजकडे पाठविल्या म्हणून लिा ते कळले. उत्तम असे. हुडया सकरल्या नतर रसीद त्याची येईल. त्याची नकल पाठवणे म्हणजे जाबसाल पाठविला जाईल. वरकड पा पाटण येथील मार लिा त्या प्रा कळला. त्यावरुन त्यास ताकीदीविसी पत्रे लेहून पा आहेत. त्या प्रो मनास आणून ㄹ तुम्हीच खासा श्रीमताकडे जाउन त्याचा बदोबस्त धणीसाहेबाचे विचारेच करून उत्तम प्रकारे करून घेणे. येविसी हे गै न करणे आणि 'दिलीकडील पठाणाचे वर्तमान व श्रीमतसाहेब व राजश्री मल्हाररावजी [हे] त्याचा बदोबस्त कसकसा करितात, हे वर्तमान तपसीले करून वरचेवरी लिहित जाणे. आम्ही

ही फौजेची तयारी केली असे. लोकास नालबदी[१८४] दिल्ही. सत्वरीच तिकडे येणे होईल. चिता न करणे. वर्तमान जे जे विशेश आढळेत जाईल त्याप्रमाणे वरचेवरी आम्हास लिहित जावे. ढील सर्वथा न कीजे'. रा छ * ७ माहे रजेब. बहुत काय लिहिणे हे विनंती. प्रांत कोटे येथील यैवज करार प्रा वसूलात सत्वर येई ते करणे. है गै सर्वथा न करणे. सरकारचा पैका कोट्याचा व पाटणचा यैसा वसूल करून लौकर पाठवित जाणे. येथे आम्हास येदा वोढीचा प्रसग जाला असे सबब लिा प्रा वर्तणूक करणे. हे विनंती.

(मोर्तब सुद)

पैा छ १२ साबान
[ १ मे १७५७ ]

---

लेखांक [१६६] श्री * संवत् १८१४ चैत्र वद्य ३
[ ७ अप्रेल १७५७ ]

पुा राजश्री बाळाजी येशवंत
प्रात कोटे व पा पाटण गो यांसि.

सुमा सबा खमसेन मया अलफ. येथून राजश्री गोविद मनाजी यास तुम्हाकडे कोट्याचे यैवजाकरिता वरात करून मुजरद कारकून [देऊन] पाठविला आहे. तरी त्याजवळ सनद वरातेची सरकारची आहे त्या प्रो पैका त्यास पावता करणे. है गै सहसा न करणे. येंदा वोढी बहुतच जाली आहे सबब लिहिले असे. तरी हरप्रेत्ने करून गोविद मनाजी

(१८४) नालबंदीचा शाद्बिक [ सामान्य ] अर्थ तर सर्वांच्याच परिचयाचा आहे. पर्याय अर्थ ' [ सीबबदी ] सिबंदी सैन्याला ' युद्धास जाते समई खर्चास दिलेली तसलमात अर्थात् मदत खर्च ' असा दिला आहे [ फाशाकोश पान १२८ ] तो येथे लागू होतो खरा पण ती केवळ जमाखर्ची तसलमात नव्हे स्वराज्यभाषेत बोल्लें तर सरकारी किंवा सरंजामी सैन्यास दिलेली अशी ' रकम ह्मणजे मदत खर्च ' हिला तसलमात ह्मणता येईल पण परराज्यात छावणीस राहिले असता किंवा परराज्य सरक्षणासाठी काम करीत असता मिळालेल्या नगदीस व मुलखासही तत्कालीन पत्रव्यवहारांत ' नालबंदी ' असेच नाव दिलें आहे एवढेच नव्हे तर इंग्रजाच्या ' Contingent Force ' सदेखील ' नालबंदी ' या शद्बानेच संबोधिलें आहे ह्या शद्बाची ही व्यापकता विचारणीय आहे

रिकामा न ये ते करणे म्हणजे तुमच्या चाकरीचा मजुरा आहे. जाणिजे छ * १७ रजेब. ।' हे विनंती.

मोतेंब सुद

पौ छ १० शाबान. वैशाख शुद्ध ११२.
[ २९ अप्रेल १७५७ ]

---

लेखांक [१६७] श्री * संवत् १८१४ चैत्र वद्य ३
[ ७ अप्रेल १७५७ ]

पुा राजश्री बाळाजी येशवंत आत कोटे व पाटण गो यासि

सुमा सबा खमसेन मया अलफ. पा पाटण येथील बाकीचा येवज रा चिमणाजी गोविंद व रामाजी जगंनाथ यानी आम्हाजवळ तुमचे जिमेस लेहून दिल्हा असे. त्या प्रा तुम्हास पूर्वी लिहिलाच आहे तो पैका तुम्हाकडून सरकारचा येणे त्या प्रा पाठवालच परंतु उभयतां पाटणात तुम्हाजवळच आहेत. अतरवेदीत गेले नाहीत तोच त्यासी आपण रुजुवात करून त्याणी तुमचे जिमेस पैका लाविला असे तो तुम्हाकडे खराखुरा करून घेणे. अगर त्याजकडे फलाणे व तुम्हाकडे फलाणे येसे त्याचे हातेच लेहून घेउन फडशा लौकर करून घेणे. जरी ते अतरवेदीत गेले तरी आम्हास त्याणी लेहून दिधले असे. तो पैका तुम्हास देणे लागला येसे पस्टच जाणून आमचा पैका खराखुरा दोही-तून येके जागा कागद पत्र होत ते करून उभयताच्या रुजुवातीने फडशा करून विल्हेवाट होय ते करणे. म्हणजे उत्तम आहे. येसे असोन हे गै कराल, त्यासी फडशा न कराल तरी आमचा येवज तुम्हास सुटणार नाही. खामखा देणे लागेल. ते दोघेही पाटणास आहेत तोच सरकारच्या पैक्याचे ठिकाण लावणे आणि त्यांच्या हातचे कागदपत्र करून घेउन लेहून पाठवणे. गुदर[१८५] न करणे. जाणिजे छ * १७ रजेब. ।' हे विनंती.

मोतेंब सुद

पैवस्ता छ १० माहे शाबान.
बा कासिद छेबीलारामजी.
[ २९ अप्रेल १७५७ ]

---

(१८५) दरगुजर या फारसी शब्दाचा हा मराठी अपभ्रंश होय दरगुजर म्हणजे दुर्लक्ष, कानाडोळा व सहन करणे

लेखांक [१६८] श्री * संवत् १८१४ वैशाख वद्य १२
[१५ मे १७५७]

पुा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

रामराम सुरसन सबा खमसेन मया व आलफ. राजश्री 'चिमणाजी गोविंद याणी अपणाकडील गुमास्ता पा पाटणच्या कामावरी ठेउन आपण रवार होउन गेले. त्याची वर्तणूक पहिल्याप्रमाणे नाही. आपल्याच मते कामकाज करितात. त्यासि कजिया करावा तर [दूर] लौकिक होइल यास्तव गम खातो. प्रस्तुत देवीदान यास मोजे गुडले येथे आपल्याच मते जमाउ म्हणतात. आमचा उजर करीत नाहीत. त्याचेविसी येक पत्र श्रीमत राजश्री दादासाहेबास पाठवावे म्हणजे पूर्ववत प्रमाणे ते चालती[ल] म्हणोन लिहिले. 'तर गवदार कराराप्रमाणे न चालेत तर श्रीमतास कोठवर[१८६] पत्रे ल्याहावी'। येक ताकीदपत्र यथून त्यासी लिहिले आहे ते त्यासी प्रविष्ट करणे त्यानी पूर्ववत प्रमाणे वर्तणूक केली तर उत्तमच जाले. न करीत तर आम्ही सत्वरीच उजनीस येतो. मग त्यासी समजोन घेतले जाईल. जाणिजे रा छ * २६ सावान. ।' बहुत काय लिहिणे हे विनती.

मोर्तब सुद

पैा छ २० रमजान.
[८ जून १७५७]

---

लेखांक [१६९] श्री * संवत् १८१४ वैशाख वद्य १२
[१५ मे १७५७]

पुरा राजश्री बाळाजी येशवत गोसावी यांसि.

रामराम सुहूरसन सबा खमसेन मया व अलफ. राजश्री 'चिमणाजी गोविंद याचा हिशेबाचा फडशा केला त्यां बा आम्हाकडे रुा निघाले ते देणे येतील येविसीचा न्याये

(१८६) सोवतीस्नेहशिथिलतेसबंधी शिंद्यांचे हें मानसिक सूत्र समजले पाहिजे या सूत्रानुसार शिंद्यानी समेट करण्याच्या हेतूनं खसेवकास सरळ सांगून, स्पष्ट समजावून व निक्षून ताकीद करून स्वपक्ष निर्दोष करण्याची सावधानी घेतली होती [ लेखांक १२५, १२७, १३५ ] समेटाची सुचिन्हें दिसेनात ह्मणून श्रीमंतास श्रुत करण्यापर्यंत पाळी गेली [लेखांक १६५] मुख्य स्वराज्य सूत्रधाऱ्याकडून ताकीदी पलीकडे जेव्हा 'समजावीस' पटेना तेव्हा अर्थातच स्वपक्षीय सत्य प्रस्थापित करण्याचा हा निर्धार झालेला दिसतो.

मनास आणोन जे आज्ञा करणे ते खबरदारीच करावी. त्याप्रमाणे वर्तणूक केली आहे म्हणोन लिहिले'. तर मारनिलेच्या हिशेबाचा फडशा केला तो चौधे[187] कमाविसदार बसउनच केला. अवघ्याचे मतेकरून जितके तुम्हाकडे रुपये लावावयाचे तितकेच लाविले. जाजती कांही लाविले नाहीत. जे रुपये तुम्हास लहून पाठविले ते रुपये ता तुम्हास देणेच आले. येक वेळ न्याये जाला तो कसा फिरेल. जे पचार्नी केले ते बावेन लागेल. हे परिछिन्न चित्तात आणोन पूर्वी तुम्हास लहून पाठविले आहे त्याप्रमाणे यवज सरकारात पावता करणे. येविसीचा बोभाट येउ न देणे.' मारनिले तेथे तुम्हापासी पाटणी आले होते ते तुम्ही येक मासपर्यंत येके ठिकाणी होतेस. तेव्हां त्यासी तुम्ही न्याये करून कायेल करावे [यांस] होते. ते कूच करून गेले आण आता बोलता हे अपूर्व असे! त्याचा न्याये जाला तो ठीकच आसे. सरकारचे रुपये तुम्हाकडे निघाले ते पाठउन देणे. जाणिजे छ * २६ साबान. बहूत काय लिहिणे ! हे विनंती.

मोर्तब सुद

पैवस्ता छ २० रमजान.
[ ८ जून १७५७ ]

---

लेखांक [१७०] श्री ॥- संवत् १८१४ वैशाख वद्य १२
[ १५ मे १७५७ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवत गोसावी यासि.

रामराम सुहूरसन सबा खमसेन मया व आलफ. कोटेकराचा मजकूर तरी बोहरे याच्या टीपा पा। वसूल आला तो पहिलेच पाठउन दिल्हा. 'आलीकडे सामदाम दंड भेद करून पाहिला परंतु धातूपोषण मात्र करितात. रुपया देत नाहीत. बोहरे यासी कजिया करावा तर रांगडे सांगोन पाठवितात की त्यासी कजिया न करणे. बोहरे यासी कजिया करावा तर सिर्दी करून माणसे पाठवाल तर उठउन लावू[न] देहू. येसे करिता कजिया करावा तर सिर्दी करून माणसे पाठवाल तर उठउन लावू[न] देहू. येसे करिता कजिया करावा तर त्याचे पारपत्य होणे ते चा विचार कळतच आहे. म्हणोन लिहिले. तर बहुत उत्तम आहे. त्याचे पारपत्य होणे ते

---

(१८७) शिंदेशाहींत कमाविसदारी हिसेबाचे फडशे करण्याचा प्रघात त्या काळीं [illegible] पत्रावरून कळतें. केवळ सरकारी अधिकारी सागतील ती पूर्व दिशा [illegible] कमाविसदाराच्या संमतीनें तडजोड केली जात असे

ईश्वर कृपेकरून होउन येईल. आमचे फौजेची सम[जा]वीस जाली. सत्वरीच कूच करून त्या प्रांतात येतो. येथायुक्त पारपत्य होउन येईल. केल्या कराराप्रमाणे त्याणी रुपये दिल्हे तर उत्तम जाले. न देत तर तैसेच फळ पावतील. चिंता नाही. तुम्ही राज्यास आनेक प्रकारे समजाउन सांगोन त्याचे डोळे उघडून आपले कार्य करून घेणे. तुम्ही तर आपल्या तर्फेने त्यासी सांगावयासि व तगादा लावावयासि आंतर न करणे. जेथवर साम दाम दंड भेद करून वसूल येईल तेथवर घेणे. स्वामी शेवेसी न चुकणे. रांगडे हराम जादगी[१८८] करतील तर त्यास समजोन घेतले जाईल', जाणिजे छ * २६ साबान. वोहरे याची निशा तर तुम्हीच सरकारात केली आहे. त्याचे रांगड्याकडे काये आहे? तुमची खासगत टीप रुपये २८,००० अठावीस हजाराची आहे व तुमच्या गुमास्त्याची टीप रुा १०,००० दाहा हजाराची आहे. यकुण अडतीस हजार रुपयास गुंता काये आहे? अडतीस हजार रुपये तर देणे टीपाचेच रुपये [ होतात ] तर तुम्हासच [ते] द्यावे लागतील. हे समजोन टीपा बा यैवज पाठउन देणे. जाणिजे छ मजकूर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१७१] श्री * सवत् १८१४ वैशाख वद्य १२
[ १५ मे १७५७ ]

पुरा राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि

रामराम सुहूरसन सबा खमसेन मया व आलफ. जव्हाहीर[१८९] कोट्या बा आम्हा जवळ आहे ते वाटेच्या धामधूमे करिता उजनीस न पाठविले म्हणोन लिहिले. तर उत्तम गोष्ट केली. प्रस्तुत तर मार्गामध्ये धामधूम नाही. याउपरी तऱ्ही जव्हाहीर तुम्हापासी आहे ते उजनीस राजश्री रामराव नीलकंठ याजपासी उजनीस पावते करणे. राजश्री गोविंद मनाजी याची बरात कोट्याच्या यैवजी व पाटणचे यैवजी करून पाठविली आहे. त्याप्रमाणे हर प्रयेत्न करून त्याची रवानगी सत्वर करणे. येदाचा कारभार आमचा बहुत

---

(१८८) हरामजादगी हा फारशी शब्द मात्र अगदी शुद्ध वापरला आहे. याचा अर्थ बेइमानी, नष्टाई, कुचराई असा आहे

(१८९) या वेळीं खंडणी पेटें जवाहिर कसें घेतलें ते कळत नाहीं. कारण शिंद्यांस असली पद्धत संमत नव्हती अशाविषयीं अनेक पत्रे 'संग्रहीं' पहावयास सापडतात.

च थोडी खाले पडला आहे. यास्तव मारनिलेसे येवज पावउन जलदीनेच पाठउन देणे. 'श्रीमत राजश्री दादासाहेबाचे व राजश्री मल्हारजी होळकर[१९०] याचे वर्तमान लहून पाठविले ते कळो आले. याउपरही जे वर्तमान येत जाईल ते वरचेवर लिहित जाणे. पठाणाचे आलिकडे वर्तमान आले आसेल ते सत्वर आम्हास लेहून पाठवणे. या कामास सहसा न चुकणे'. जाणिजे छ ॥ २६ साबान. ॥' बहुत काय लिहिणे हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [१७२] श्री संमत् १८१४ वैशाख मास

[ मे १७५७ ]




राजश्री चिमणाजी गोविंद

कमाविसदार पा। पाटण दिमत होळकर गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो। जनकोजी सिंदे दंडवत सुहूर-सन सबा खमसेन मया व आलफ.' पा। पाटण येथे कमाविसदार पूर्वीपासून आज ता। राहिले ते येका विचारे करून कामकाज करीत होते. हाली तुम्ही सतनतरच काम कार-भार करू म्हणता तर हे कसे कार्यास येईल. देवीदान यास बळेच मौजे गुडले येथे ठेउन आपल्याच मते जमाउ म्हणता म्हणोन विदित जाले. तर हे उत्तम की काये ? ते गोष्टीस आम्हाकडील कमाविसदाराचे समत नसले तर जमाउ कसा पावतो दूसरे त्याजकडे सरकारची नजर रुपये ५,००० पाच हजार रुपये घ्यावे तेव्हां त्याने गावावर यावे येसा रीत[१९१] आहे त्याप्रमाणे निशा करून देत असला तर उत्तमच जाले. पाच हजार रुपये न देता तुम्ही त्यासी गावावर बसवीत असाल तर पाचहजार रुपये आमच्या सरकार चे तुम्हाकडे लागले. ते तुम्हास खुद निस्बत देणे येतील. येसे पष्ट समजोन त्यासी गांवावर बसवणे. जे कानकाज करीत जाल ते आज ता। ज्याप्रमाणे चालत आले असेल

---

(१९०) या वेळी मल्हारजी होळकर जावद प्रांत मेवाडातून रघुनाथराव दादाबरोबर जयपूरा-समीप आले होते [ राजवाडे खंड १ लेखांक ६३, ६६ ].

(१९१) या जुन्या रीतीप्रमाणे पांच हजार नजराणा घेऊन देवीदानास प्रस्थापित करण्याची समती शिंद्यांनी दर्शविली आहे

त्या प्रमाणे करीत जाणे. लटकाच कजिया कराल तर उत्तम नाही. परिणाम सुध होणार नाही. यैसे पष्ट समजोन पूर्ववतप्रमाणे वर्तणूक करून कामकाज करीत जाणे. येविसीचा बोभाट फिरोन येथवर न ये ते गोष्ट करणे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

गोर्तव सुद

लेखांक [१७३] श्री * संमत् १८१४ जेष्ट शुद्ध १५
[ २ जून १७५७ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सु त जनकोजि सि दे निरतर

राजश्री बालाजी येशवंत गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा समान खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले [की] देवीसिंग इंद्रगडवाले याची स्त्री कोट्यास आली आहे. तिणे कितेक बोलणे करार केले आहे. ते वर्तमान रा राघो[११२] जनार्दन सेवेसी विदित करतील. म्हणून लिा ते कळले. यैसीयास रा राघो जनार्दन हजूर आल्यानंतर जे अज्ञा कर्तव्य ते केली जाईल.' जाणिजे छ १४ रमजान. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

गोर्तव सुद

लेखांक [ १७४] श्री * संवत् १८१४ आषाढ शुद्ध १४
[ ३० जून १७५७ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सु त जनकोजि सिं दे निरतर

राजश्री बालाजी येशवत कमाविसदार पा पाटण गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा

(११२) राघो जनार्दन हे बूंदी किंवा शोपूर येथील शिंद्याचे कमाविसदार अथवा वकील असावेत

समान खमसेन मया व आलफ. पा मजकूरी पेशजीपासून वेतणे राजश्री गणेश दादाजी व राजश्री विसाजीराम या उभयताची नेमणूक सालाबाद चालत आली आहे. त्याजप्रमाणे साल दरसाल देत जाणे. आटकाव न करणे. नूतन पत्राचा अक्षेप करीत न जाणे. छ * १२ माहे सवाल. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैवस्ता छ १ माहे सफर
[ १५ अक्टुबर १७५७ ]

---

लेखांक [ १७५ ] श्री * संवत् १८१४ श्रावण शुद्ध १४
[ २९ जुलै १७५७ ]

श्री जोति स्वरूप धरणि तत्पर जयाजि सु त जनकोजि सिं दे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत प्रा कोटे गोसावी यांसि.

*अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो* जनकोजी शिंदे रामराम सुमा समान खमसेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान सविस्तर कळले. राजश्री नारो बाळाजी यास वरात दिल्ही आहे. त्याजप्रमाणे त्यास यैवज पावता करितो म्हणून लिहिले. थोडा बहुत यैवज त्यास पावता केला. बाकी राहिला तोही पावता करू ऐसे लिहिले. त्यास बहुत उत्तम असे. बाकी यैवज जो राहिला त्याचीही तरतूद करून सत्वर पाठविनो म्हणून पत्र लिहिले. त्यास यैवज सत्वर पावता करणे. येथे लोकाचे देणे आम्हास आहे. तरी यैवज सत्वर येउन पोहचे तो अर्थ करणे सावकारी व्याजे आम्हा वरी चढते हे का तुम्ही जाणत नसाल ! बोहऱ्याकडील यैवज काही हातात आला काही राहिला आहे. तोही ताकीद करून उगउन घेतो म्हणून लेखन केले. त्याज बोहरे मजकूरास वरचेवरी ताकीद करून यैवज उगवे ते करणे. येविसी हैं गै सहसा न कीजे. रा चिंमणाजी गोविंद व रामाजी जगन्नाथ हे कितेक पा मजकूरी धामधूम करितात. आम्ही लोकास दिलासा देतो आणि ते नाना प्रकारे उपद्रव देतात म्हणून लिहिले. त्यास त्याचा बंदोबस्त करणे तो आम्ही त्या प्रांते आलियावरी सर्व होउन येईल. तुम्ही विवेककरून सांगत जाणे. नाकैत तरी त्याचे पारपत्य होणे ते होउन येईल. चिंता न कीजे.' श्रीमत

राजश्री दादासाहेबाकडील व राजश्री मल्हारजी बाबा होळकर याजकडील मजकूर लिहिला. त्याजप्रमाणे सर्व विदित जाला. यैसेच निरंतर मारवाड[११३] प्रांतीचे वगैरे वर्तमान तपसीलवार लिहित जाणे.' पा पाटणचा यैवज आडियानसी पाठउन देणे. दिरंग लावायाचे प्रयोजन नाही. जाणिजे छ * १२ माहे जिलकाद. ' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैा ६ माहे जिल्हेज

[ २२ अगस्ट १७५७ ]

---

लेखांक [१७६] श्री * संवत् १८१४ आधिक आश्विन वद्य १०

[ ७ अक्टुबर १७५७ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार संस्थान कोटे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहुरसन समान खमसेन मया व आलफ. राजश्री यशवंतराव पवार याजकडे श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे रुपये १८५००० येक लक्ष पंच्याआसी हजार रुपये आहेत. त्याच्यां येवजी पवाराच्या वाटगीचा यैवज कोट्या पा श्रीमंतानी सरकारात ठेउन त्याच्या वसूलास राजश्री राघो केशव कारकून संस्थानची खडगी साल गुदस्ता जाली त्यापैा बाकी येणे व साल मजकूरचा यैवज येणे आहे त्यापैकी जो वसूल येत जाईल त्याची वाटणी दर सदे रुपये १६ प्रा करून जे वाटणी होत जाईल ते कारकून मजकूराच्या पदरी घालीत जाणे. पवाराच्या तर्फेने कमाविसदार कोट्यात आसेल त्यास साफ सांगोन उठउन लावणे. आण पवाराच्या तर्फेचे कमाविसीचे कामकाज सरकारचे कारकून आले आहेत हे करतील.

---

(११३) 'शिंद्याशीं आपला सलोखा करून द्यावा. चाकरी लाहोर प्रयागपर्यंत घ्यावी परंतु रामसिंगास राज्य देऊ नये,' या विजयसिंगाच्या बोलीचालीचा भावार्थ बाळाजी गुलगुल्याने कळविला असेल की काय ? [ राजवाडे खंड १ लेखांक ६६ ]

हे तुम्हापासी येऊन पावतील. त्याची आवी वसूल जाला आसेल त्याची वाटणी पवाराच्या कमाविसदारास देणे आसेल आण येवज तुम्हापासी आभोगत आसेल तो देखील येवज याच्याच पदरी घालणे. कमाविसदाराने वसूल नेला आसेल तर उपाय नाही. देणे आसेल तर त्यासी न देणे. यासच पावते करणे. सदरहू येक लक्ष पंच्यासी हजार याच्या पदरी पडेत तोपावेतो दुसऱ्याकडे येक रुपया न देणे. रुपये फिटे तोपावेतो सरकारच्याच कारकूनास पवारच्या वाटणीचा येवज देणे. यास परचरणाचा येका पैच्याची न करणे. जसा वसूल येत जाईल तसी वाटणी देत जाणे. जाणिजे छ ॰ २२ मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पौ। छ ८ रावल.
[ २१ नवंबर १७५७ ]

---

लेखांक [१७७] श्री * संवत् १८१४ आश्विन वद्य २
[ २९ अक्तुबर १७५७ ]

पुरवणी राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यासि.

रामराम सु॥ समान खमसेन मया व आलफ. राजश्री मल्हारराव होळकर याजकडील कमाविसदार रा। चिमणाजी गोविंद याचा गुमास्ता आहे तो पा। मजकूरीं नाना प्रकारे उपद्रव करितो म्हणून लिहिले व मशारनिलेकडून हाती दोन आले आहेत, त्याचा उपसर्ग प्रगणियास बहुत लागतो. त्यावरून पंत मशारनिलेस पत्र लिहिले आहे. हे घेउन त्याजकडे पाठवणे. जाणिजे छ * १५ माहे सफर. ॥ हे विनंती.

मोर्तब सुद

पौ। छ ८ रावल.
[ २१ नवंबर १७५७ ]

---

लेखांक [१७८] श्री * संवत् १८१४ आश्विन वद्य ३

[३० अक्टुबर १७५७]




राजश्री चिमणाजी गोविंद गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दंडवत सुमा समान खमसेन मया व अलफ. पा। पाटण येथे तुम्हाकडील गुमास्ता राहतो पा। मजकूरी नाना प्रकारचे उपद्रव करितात आणि तुम्हाकडून हाती दोन आले आहेत त्याचाही उपसर्ग फारच लागतो म्हणून हाजूर बोभाट आला त्यावरून हे पत्र लिहिले आसे. तर याउपरी पा। मजकूरचा बोभाट येउ न देणे. हातीवाल्यास ताकीद करणे. कडब घेउन चारीत जाणे. पाणीयास तसदी न देणे. उत्तम प्रकारेच ताकीद करणे. जाणिजे छ * १६ माहे सफर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

पौ छ ८ रौवल.

[२१ नवंबर १७५७]

---

लेखांक [१७९] श्री * संवत् १८१४ कार्तिक शुद्ध ७

[१८ नवंबर १७५७]

पुरवणी राजेश्री बाळाजी येशवंत गोसावी यासि

दंडवत सुमा समान खमसेन मया अलफ. संस्थान कोटे येथील जो करार जाहला असे त्याजपैकी श्रीमंतानी आम्हापासोन घेतले रुपये दाहा[१९४] लक्ष. बाकी जे रुपये

---

(१९४) महाराव दुर्जनसालजीचे पश्चात् हे कोटा राज्य नामशेष होण्याची सधी आली होती परंतु राणावतजी [ या नावाच्या त्यांच्या विधवा ] राणीने मोठ्या चातुर्यानें ती टाळून राज्य रक्षण केलें तें असें कीं, महाराणा उदेपुरची राणावतजी ही मुलगी होती तिला औरस संतती झाली नाहीं अशा स्थितींत दुर्जनसालजी वारले तेव्हा सहजच गादीविषयीं प्रश्न उपस्थित झाला बिशनसिंग अंतावाले जवळचे वारिस होते खरे पण त्यांचे वंशजापैकीं दत्तक घेण्यास दोन नडी होत्या प्रथम ही कीं,

राहिले ते हिसेरसीद ज्याचे त्याणी घ्यावे. त्यास जे तुम्हावरी वरात जाली आहे, तो यैवज व बोहऱ्याकडील रुपये यैसे उजेनीस राजश्री रामराव नीलकंठ याजवळ पावते करणे. याउपरी रुपये सहसा न ठेवणे. येथे खर्चाची वोढ बहुत असे. पा पाटण व कोटे येथील यैवजी तुम्हावर वरात रुपये १,००,००० येक लक्ष रुपयाची केली आहे. तो यैवज उजनीस पावता करणे. तुम्ही खासगत कोट्याचा हवाला घेतला आहे. त्याची बाकी व वोहरे याची बाकी वगैरे कोटेकराकडील तहसीलेचा यैवज आला असेल त्याचे वाटणीचा यैवज शिलक यैसा कुली व पाटण पौ यैसे मिळोन लाख रुपये उजनीस आधी आधी पावते करणे. न द्याल तर व्याज तुम्हास द्यावे लागेल. तुम्ही म्हणाल की हमेशा यैसेच लिहितात तर त्याजवर न जाणे. येदा वोढीखाली कारभार जाला आसे. व्याज जाल्या मुदतीचे सुटणार नाही. यैसे पष्ट समजोन वराते प्रमाणे यैवज उजनीस

---

बिशनसिंगाचा नातू अजितसिंग हा राणावतजीपेक्षा वयानें जास्त होता ह्मणून दत्तविधानाची सवड नव्हती त्याचा मुलगा घ्यावा तर तत्कालिन परिस्थिति त्याला झेपेल न झेपेल ही विवचना होती. 'सरळ वारसा' तर ठरविता येणें शक्यच नव्हतें कारण तो हक्क बिशनसिंग स्वत च पूर्वी गमावून बसला होता बिशनसिग हा महाराव किशोरसिंगजींचा वडील पुत्र या नात्यानें गादीचा नैसर्गिक वारिस खरा पण 'वडिलाची आज्ञाभंग करून मुहिमेस तो निघाला नाही' ह्मणून किशोर-सिंगजींनी त्याचा 'वारसा' कायमचा 'खुंटित' करून गादी त्याचे धाकटे भावास [ ह्मणजे दुर्जन-सालजीचे आजे राममिंगजी यास ] दिली होती [ Tod Rajasthan vol ii page 411 ] असा दुहेरी पेंच वारिसासबधीच होता त्यात कोटा ही शिंदे, होळकर व पवार याची जहागीर पडली. त्रिवर्गापैकीं होळकराचें मानस प्रतिकूल होते अशा कचाटींत ही अबला येऊन फसली. स्वत चे बुद्धिबलावर किंवा महाराणा उदेपूरकर याचे प्रोत्साहानामुळें असो तिनें एक मजेदार तोड काढली. शिंद्याकडे 'राखीबरोबर' राज्याची जोपासना करण्याची तिनें विनति केली कोटेकरांची राणी व उदेपुरकराची मुलगी अशा प्रकारें गयावया होऊन भगिनी या नात्यानें राज्य अर्थात् वंशवृद्धीची भेट मागीत असता आणि पूर्वापार कोटेकराशीं 'भाईचारा' चालत आला असता तिजकडे दुर्लक्ष करणें शिंद्यास अशक्यच होते एवंच शिंदे हे राणावतजीचे 'रक्षाबंधक' बंधु झाले आणि हें नातें राणावतजी जिवत असेपर्यंत महादजी शिंद्यानी तसेच राखिलें हें पुढे पहावयास मिळेल. अस्तु 'निर्वीरमुर्वितलम्' हें तत्त्व मराठ्याच्या राजनीतीस पारखें होतेंच होळकराची समजूत करण्यासाठीं ही 'मातबर खंडणी' ची योजना अमलात आली, आणि अजितसिंगजी वडिलोपार्जित शापापासून मुक्त होऊन कोट्याच्या गादीवर आले व प्रायश्चितादाखल ही खंडणी त्याना द्यावी लागली कोटा ही 'जागीर, असल्यामुळें ह्या खंडणीत पेशव्याचा वाटा नसावा असें त्रिवर्गाचें ह्मणणें होतें [लेखांक १८०] व तें पेशव्यानी कबूलहि केलें. पैशाच्या अडचणीमुळें त्याना दहा लक्ष दिले ही गोष्ट भिन्न आहे

पावता करून कबज घेणे. येविसीचा बोभाट फिरोन येउ न देणे. जाणिजे छ सफर. ।' हे विनंती.




पौ छ * ५ रोवल.
[ १८ नवंबर १७५७ ]

---

लेखांक [१८०] श्री * संवत् १८१४ कार्तिक शुद्ध ७
[ १८ नवंबर १७५७ ]

यादी सा कोटे नि॥

याजकडे टीक्या[१९५] बा नजर करार सन सित खमसेन ४०,००,००० रुपये

---

(१९५) अजीतसिंगजीच्या शापमुक्ततेच्या प्रायश्चितादाखल जरी म्हटलें तरी ही खंडणी सकृतदर्शनी जरा जड झाली असें म्हटल्यासिवाय रहावत नाहीं किंबहुना 'मातबर' या विशेषणावरून खंडणी कायम करणारासही अशा रीतीचा भास झालेला स्पष्ट दिसतो त्यावरून मराठे बेसुमार खंडणी घेत असत असा जर कोणी अक्षेप घेऊं पाहील तर तो टिकणार नाहीं मराठ्याच्या हातून पैशासंबधी असली अनन्वित काही कृत्यें घडलीं असलीं तर तीं अपवादात्मकच झाली असतील त्याच्या राजनीतीचें तें ठराविक अंग म्हणून म्हणता येणार नाही त्यासंबंधी येथे थोडा विचार कर्तव्य आहे. 'चाळीस लक्षाची' रकम कदाचित् ज्यास्त वाटत असली तरी 'निर्वीरमुर्वितलम्' च्या तत्त्वापेक्षां तुलनात्मक दृष्टीनें केव्हाही ती सौम्य या सदराखालीच घालावी लागेल व त्या दृष्टीनें ती अक्षेपार्ह वाटत नाही पण ज्या मराठ्याचा औदार्य हाच बाणा होता त्यामानानें ही खडणी थोडी फाजील झाली असें म्हणता येईल ही जाणीव तत्कालीन मराठ्यास शोवल्यासिवाय राहिली नाहीं, व त्यामुळेंच वरील साकेतिक विशेषण सापडतें त्याचा अर्थ विपर्यास मात्र होऊ नये एवढीच काळजी घेणे आगत्याचे आहे ही खंडणी ठरविताना शिंद्यास भागीदाराचे आग्रहास बळी पडावें लागलें हें नाकारिता येणार नाहीं पण अजीतसिंगजीनंतर छत्रसिंगजीचे वेळी वाटेकऱ्यानी पुन्हा असाच गळ घालण्याचा घाट घातला. प्रत्यक्ष येऊन भीड घालण्याचा यत्न केला तरी शिंद्यास तो प्रकार मानवला नाही. 'महाराव अजीतसिंगजीचा काल जाला. त्यावरुन चित्त खिन्न जाले ईश्वर सत्ता प्रमाण हे वर्तमान कळल्या नंतर श्रीमंत मल्हारजी बाबाचे मानस बहुत आहे जे तत्र स्थलास जावे. दवाउन चार रुपये घ्यावे आपले यजमानास चला [ असे ] म्हणत होते परंतु यजमान यानी टाळा दिला जे आम्हास मारवाड व दिलीकडे जाणे जरूर आहे दुर्जनसाल मृत्य पावले त्याप्रमाणें अताचा प्रसंग नाहीं त्यांनी उत्तर दिले जे भाउबंद कारभारी सुधा हाडेतीची सूत्रें आम्हाकडे थाली आहेत. साठ लक्ष सिवाय मुलुक सोडवितो यजमान बोलिले जे बहुत् उत्तम. येत आसतील तर आम्ही मना करीत नाही सुखरुप

पैकी सरकारची वाटणी दर सदे रुपये ५३।≈ प्रा रुपये २१,३५,०००

पैा पेशजीचे इा सन सलास खमसेन ता। सन सित चौसाला हिसेबी जमा झाले रुपये १०,००,०००

बाकी येणे रुपये ११,३५,०००

तपसील.

५,००,००० 'सरदार म्हणतात की कोटे सरजामात आहे. खडणीचा हिसा सरकारात नसावा परंतु मातवर खडणी जाहली यास्तव सरकारात द्यावयाचे केले रुपये' १५,००,०००

पैकी पेशजी चौसाला हिसेबी जमा रुपये १०,००,०००

बाकी रुपये

६,३५,००० जाजती वाटणीचे शिरस्ते प्रा होतात ते

११,३५,०००

---

घ्यावे. परंतु आम्हास यावयास फावत नाही' असें चितोकृष्ण स्पष्ट सागतो [ ६ सितंबर १७५८ ]. इतकेंच नव्हे तर त्या वेळी केवळ दोन लक्ष टीक्याबद्दल नजराणा घेउन 'दिलासानामा' देऊन कोटेकरांची सोडवणूक केलेली आहे [ लेखाङ्क ११६, २१२ ] आणि हेंच धोरण पुढें शुमानसिंगजी च्या टीक्यासंबधी कायम ठेवले आहे त्यावरुन टीका व नजराण्याविषयीं मराठ्यांचे विशेषत शिंद्यांचे कोणतें धोरण होते हें निराळें सांगावयास नको इतोत्तर चिकित्सिकांचे समाधान नच झालें तर त्यास उपाय नाही. मराठ्यांच्या औदार्याविषयीं प्रचीतीचा प्रकार पाहावयाचा असेल तर या टिका नजराणा व खंडणी संबंधीच थोडी चिकित्सा करुन काय निष्पन्न होणे तें पाहूं चाळीस लक्षाची खंडणी ची योजिली ती पूर्ण वसूल केली नाहीं. दोन लक्ष सुटीदाखल सोडले आहेत बाकी रकम एकवट न घेतां हप्तेबंदीची सवड दिली आहे ही सोन या टीका नजरण्यापुरतीच होती असें नव्हे तर वार्षिक खंडणीसाठीं सुद्धा ती केली होती. [ लेखांक ५८ ] फार काय कोट्याकडून साडेचार लक्ष वार्षिक खंडणी जी प्रथम येत होती त्यापैकीं एक लक्षावर नेहमीं करिता पाणी सोडून बाकी साडेतीन लक्ष [इतक्या अल्पवधींत] कायम करुन नजराण्याचा प्रश्न उद्भवला असता त्याचे प्रमाण व ते खंडणीच्या अनुरोधानें [ उत्पन्नाचा मोह सोडून ] ठरविण्याचें उदाहरण मराठेशाहीसिवाय अन्यत्र क्वचित्च पाहावयास मिळेल आणि 'मुतालकी' च्या नात्यानें त्याचें श्रेय ओघानेंच शिंद्याकडे येतं

लेखांक [१८१]　　　　　श्री शकर　　- संवत् १८१४ कार्तिक वद्य ३
[१८ नवंबर १७५७]

हिसेब प्रा कोटे नजराणा टीका राजा अजीतसिंगजी बाबत समाइक करार रुपये　　४०,००,०००

पैकी वजा सूट रुपये २,००,००० बाकी संवत १८१३ सन सबा खमसेन रुपये　　३८,००,०००

पैकी वजा श्रीमत राजश्री　　पंतप्रधान स्वामीची नजर रुपये १०,०,००००

बाकी　　रुपये २८,००,०००

पैकी वसूल　　रुपये

२,००,००० श्रीमत राजश्री सुबेदार मारफत सुटबाजी शिंदे

२,००,००० श्रीमत राजश्री बाबासाहब मारफत सिताराम दास

४,००,०००

बाकी　　रुपये २४,००,०००

पैकी वाटणिया केल्या त्याचा वसूल रुपये

६,१५,००० वाटणी येक समाइक विद्यमान श्रीमत राजश्री बाबासाहेब गुजारत खंडोबाजी पाटील समत १८१४

२,३६,७७५ श्रीमत राजश्री सुभेदार.

२,३६,७७५ श्रीमत राजश्री बाबासाहेब

२,०७,७७५ वसूल

२९,००० बाकी येणे

२,३६,७७५

१,४१,४५० श्रीमंत राजश्री पवार

यशवंतराव पवार दर सदे १६ प्रा तुकोजी व जीवाजी दर सदे रुपये ७ प्रा.

६,१५,०००

२,५०,००० वाटणी येक संवत १८१६ चे सालामधे

९६,२५० श्रीमंत राजश्री सुभेदार.

९६,२५० श्रीमत राजश्री बावासाहेब.

९,२८७८≡॥ वसूल.

८६,९६२॥।॥· बाकी येणे.

९६,२५०

५७,५०० पवाराकडे

यशवंतराव. [ पवार ]

तुकोजी व जीवाजी पवार.

२,५०,०००

२०,००० पवाराकडे तसलमात बाळाजीराम वसूल

८,८५,००० येकुण वसूल येकदर रुपये १२,८५,०००

बाकी रुपये.

१५,१५,०००

१४,००,००० खडणी इा सवत १८१३ ता संवत १८१७ साले ५ पैकी नजराणाचे साल १ वजा बाकी साले ४ दर साल ३,५०,०००प्रमाणे

२,६०,००० व्याज आठा लाखाचे सुभेदारानी ठहराविले.

२५,००० सुकेतचे गढी जुजली त्याचे.

३२,००,०००

पैकी वसूल श्रीमत राजश्री सुभेदाराकडे २,९५,००० रुपये

याची वाटणी होणे आहे बाकी रुपये

२९,०५,०००

२०,००० तसलमात बाळाजीराम निा पवार यशवंतराव.

२९,२५,०००

बाकी बाटणी पैकी येणे रुपये

२९,००० बाटणी रुपये ६,१५,००० पैकी हिसा २,३६,७७५ पैकी वसूल २०,७७५ बाकी.

८६,९६२॥।॥ बाटणी रुपये २,५०,००० पैकी हिसा ९६,२५० पैकी वसूल रुपये ९,२८७॥॥ बाकी

१,१५,९६२॥।॥ राजापासून घेणे

वसूल श्रीमत राजश्री सुभेदाराकडे रुपये २,९५,००० पैकी हिसा रुपये १,१३,५७५ घेणे आहेत.

---

लेखांक [१८२] श्रीशंकर १७५७

हिसेब पा। कोटे 'सरकार' श्रीमंत राजश्री जनकोजी सिंदे सुभेदार सु॥ समान खमसेन मया अल्फ संमत् १८१४. उरमाल[१९६] बाबद घांस दाण्याचे रुपये १०,००० यास पावती.

२२२५ उरमालेमध्ये दिल्हे गु॥ रा॥ राणोजी भोईते

७७७५ मा॥ राजश्री साबाजी बाबा पाटील मिती मा॥[र]

३००० रोजमुऱ्याबदल धा॥

४७७५ रोख दिल्हे ८७७५ पैकी पाटण बा॥ ४००० बाकी.

---

७७७५

---

१००००

बाकी रुपये

---

(१९६) उरमाल हे गाव आऊ नदीच्या पूर्वकाठावर असून तें झालरापाटण या राजधानीपासून वायव्य दिशेस १४ कोसांवर आहे हल्लीं तें झालावाड राज्यांत आहे.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा समान खमसेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. ' याननर आम्ही आमदाबादेस जात होतो. त्यास आमदाबादवाला मोगल याणे आमची दहशेत खाउन राजश्री सदासिव रामचद्र [?] यासी सला केला. खबायेत[१९९] बंदोबस्त व नगद रूपये लक्षे मोगलास दिल्हे. तेव्हां त्याणे आमदाबादेचे ठाणे खाली करून दिल्हे. उपरांत आम्ही दरमजलीने माळव्यांत आलो आजचा आमचा मुकाम मोजे सिवोद[२००] पा। हासलपुर येथे आहे तेथे मजल दरमजल तुम्हाकडे येत असो. तुम्हीही पुढे सामोरे दर्शनास येणे ' जाणिजे छ * १२ माहे रजब. ॥' ' प्रस्तुत फौजसुधा कोटयास यावे लागते. चालीस लाख रुपये खडणी जाहली त्यापेकी दाहा वसूल जाहले. बाकी तीस लाख रुपये व दो ती वर्षाची माम[ल]त तैसीच राहिली. आम्ही कर्ज काहाडून फौजा ठेवाव्या. आणि रांगडे पैका देत नाही. याजकरिता च्यार दिवस मेहनत करून कोटयांचा बंदोबस्त मुलुक सोडवावा लागतो. याजकरिता तुम्ही पत्र पावताच स्वार होउन येणे तुम्हाजवळ पाटणचा यैवज आहे तो तेथेच असो देणे. कोटयाच्या राजात आलियावर घेऊ.' बहुत. काय लिहिणे हे विनती.

मोर्तब सुद

पा। छ ८ सावान
[ १७ अप्रेल १७५८ ]

---

लेखांक [ १८५ ] श्री संवत् १८१४ फाल्गुन वद्य ११
[ ४ अप्रेल १७५८ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री पाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यासि.

---

(१९९) या संवायत अहमदाबाद ममेत्रासंबंधी ही माहिती मकसूदाबादेच्या पराभवाप्रमाणें नवीनच असे

(२००) मौजे सिहोद हा गाव हासलपुर [ होळकरशाही ] चे पश्चिमेस ८ कोसांवर असून जागीर मागोर [ सिंदेशाही जिले अमझेरा ] पासून १६ कोसावर दक्षिणेस आहे अर्थात् दुसरा मुकाम सागोरास झाला असें ओघानेच कळते

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॰ जनकोजी सिंदे रामराम सुमा नसान खमसेन मया अल्फ. तुमचे पत्र फाल्गुण बहुल ७ [1] सप्तमीचे आले ते उजनीच्या मुकामी पाचवे रोजी छ २५ [1] रजेबी प्रविष्ट जाहले. लिहिले वर्तमान अवगत जाहले. तेथे लिहिले की लष्कर कोणे प्राने जाणार हे वृत्त लेहावे म्हणून लिहिले. येशास येथून कूच येकादोन दिवशी होईल. तदनंतर तुम्हाकडे कोटे प्राने येत आहो. [तुम्हास] कळावे यास्तव लिहिले असे. सरकारच्या ऐवजाची सिधता करून असणे. तो आम्हीही येऊन पोहोचतो. रा छ * २५ माहे रजब. [1] बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [१८६] श्री * संवत् १८१५ वैशाख वद्य १
[२३ मे १७५८]

हत्ती राजमाणीक[201] राजश्री बाळाजी यशवंत कोटे[कर] याकडे देविला. त्यास नेमणूक.

| | |
|---|---|
| दररोज रतीब इा वैशाख वद्य प्रतिपदा ता आषाढ वद्य आमवास्या छ रमजान. छ वजन पक्के दररोज. | इा श्रावण सुध प्रतिपदापासोन पुढा दर रोज वजन पक्के. |
| ८॥। कनीक. | ८॥५ कनीक. |
| ८८१॥ तूप. | ८८१ तूप |
| ८८२ गूळ. | ८८१॥ गूळ. |
| ८८। मीठ | ८८। मीठ. |
| ८॥।३॥। | ८॥७॥। |

(२०१) मारवाड प्रकरणीं जयाजी शिंद्याचे सूचनेप्रमाणें कोटेकराकडील सैन्यासह स्वत दोन वेळा येऊन सर्व प्रकारें साहित्य केलें जयपूरकराचीं कारस्थानें वेळशीर उघडकीस आणिलीं त्यावर संतुष्ट होऊन जनकोजी शिंद्यानी बाळाजी यशवंत गुलगुले यास हा हत्ती देऊन सरदारी दिली. हाच हत्ती अरेराव पन्चोलीस बक्षिस देवविला आहे खरा [लेखांक २२६] पण त्यामुळें शंका घेण्याचे कारण दिसत नाहीं. वकील या नात्यानें या बक्षिसाचे हत्तीची योजनादेखील त्यालाच करावी लागली असती हे लक्षात घेतलें असता बहुधा त्याचेच सूचनेचा हा परिणाम असे असतो एरवी 'देवीलाचे' जागी 'देविला' असें असावे

[1] ३१ मार्च १७५८

[1] ४ अप्रेल १७५८

पावणे चौतीस सेर

चाकर दरमहा.

६ म्हात १.

४ गडकरी २.

१०

दाहा रुपये.

पावणे आठावीस सेर.

सामान लागेल ते करावे.

---

लेखांक [१८७] श्री * सवत् १८१५ जेष्ट वद्य १३
[ ३ जुलै १७५८ ]

सनद बमोजिब नकल.

राजेश्री बाळाजी येशवत कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया व अलफ राजश्री गोविंद मनाजी यास कोटेवाले माहाराव याणी भिकारीदासाचे रुपयेचे यैवजी सायेर दिल्हे. त्याचा कारकूनी मारनिलेस करार करून तुम्हाकडे पाठविले आसेत. मारनिलेपासून सायरेचे कारकूनीचे काम घेउन यास वेतन सालीना रुपये ३०० तीनसे परभारे सरकारचे जमेसिवाय माहारायाकडून पावते करणे. येविसी सिवसिंग[२०२] झाला व आखाराम पंचोली यास लिहिले आहे. त्या प्रमाणे ताकीद करून देवणे. जाणिजे छ * २६ माहे सवाल. ॥ बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

(२०२) सुप्रसिद्ध राजा जालमसिंगजी झाला यांचा हा सिवसिंग वडील बंधू असून उभयता कोटेकराचे अनुयायी होते कोटा राज्यास नामशेष करण्याचे कामी या ' सिवसिंग झाल्याची सूत्रे मल्हारजी होळकराकडे ' लागलीं होतीं असें चिंतो कृष्ण सागतो [ ६ सितंबर १७५८ ]

लेखांक [१८८]  श्री  * सवत् १८१५ आषाढ शुद्ध ३
[८ जुलै १७५८]




राजेश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यासि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो  जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया अलफ. राजश्री येसवंतराव पवार याच्या वाटणीचा यैवज श्रीमत स्वामी साहेवी कर्जात आपले जफ्त करून त्याच्या वसूलास राघो केशव यासी पाठविले होते. येणेप्रमाणे त्यास यैवज माल व नक्त द्यावयाविसि मकुदबारीचे[२०३] मुकामी तुम्हास जे सांगणे ते सागितलेच होते. येणेप्रमाणे सांप्रत येकिले जे राघो केशव यासि कोट्यात दैवज्ञा जाली परंतु तुम्ही काहीच लिहिले नसा. अपूर्व आहे! यापउपरी त्याचा यैवज काये कैसा केला असा, त्याची तरदुद कैसी आहे त्यास पावले काये हे तत्व ःःः ना लेहून पाठवणे श्रीमंताचा पैका सुटणारच नाही. हे तुम्हीही जाणत असा. आजी तागायेत यैवज त्याचा काये जमा जाला. हेही तपसिलवार लेहून पाठवणे. त्यासारखी त्याची पेरवी करणे ते केली जाईल. यैवज त्याचा काये जमा जाला आहे पुढे काये होणार. हे तपसिले लिहिणे श्रीमताचा पैका सुटावयाचा नाही. जाणिजे छ *- २ जिलकाद. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.




---

लेखांक [१८९]  श्री  * सवत् १८१५ आषाढ शुद्ध ७
[१२ जुलै १७५७]

नकल यथाप्रत.

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार पा। पाटण प्रांत बूंदी गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो।  जनकोजी सिंदे रामराम सुहूर-

---

(२०३) उज्जेनीहून मुकुंदबारी [कोटा] वरून जनकोजी आले होते असे सिद्ध होते

सन तिसा खमसेन मया व अल्फ. चौ राजश्री कृष्ण जोशी त्रिवाडी मेवाडा साकीन बूंदी याची इनाम जमीन मा मजकूरी बीघे सुार.

४१ का पाटण.

४१ मोजे तीरथ.

१०२ मोजे सुवासा.

---

१८४

येकसे चौन्हासी वीघे सुदामत आहे. त्याच्या सनदा श्रीमंत राजश्री दादासाहेबाच्या व राजश्री मल्हारजी बाबाच्या व तीर्थरूप कैलासवासी [जयाजी] आपासाहेबाच्या नावाच्या असोन तुम्ही ब्राम्हणाची इनाम जमीन चालू देत नाही म्हणून विदित जाले. त्यावरून हे सनद सादर केली आसे तरी साल मजकूरीपासून सालदरसाल येकसे चौन्हासी वीघे जमीन ब्राम्हण मजकूराची चालवीन जाणे. सदरहू बीघ्याच्या हासिलाचा वाजवी रुपया होईल तो समाइक यैवजी मजरा दिल्हा जाईल. याउपरी ब्राम्हणाचा बोभाट हजूर न ये तें करणे. प्रति वर्षी नूतन पत्राचा अक्षेप न करणे. हे पत्र ब्राम्हणास भोगवटी यास देणे. याची नकल तुम्ही लेहून घेणे. समाइक यैवजीस सालदरसाल पावीत जाणे. जाणिजे छ – ६ माहे जिलकाद. बहुत काये लिहिणे हे विनंती.

बार

---

लेखांक [१९०] श्री * संवत् १८१५ श्रावण शुद्ध ६
[ १० अगस्ट १७५८ ]




राजेश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया अल्फ तुम्ही पत्र पाा ते पावले. तेथे पाचा लाखाचाच तपसील लिा त्या

प्रा कळऊ. परंतु त्यांपैकीही जे बाकी राहिले दोन लाख बत्तीस हजार हिसे[ब]वार जाउन ते कोणे मुदतीस द्यावे काये विल्हे त्याची हे लिहिलेच नसा. सध्या पांच लाख द्यावे त्याची हे गत. 'राजश्री साबाजी पाटील यासी सदरहू पांचा लाखाकरिता आणा प्रमाण शेफता करून नेलेत. त्यासही खराब केलेन. अपूर्व असे! बाकी सात लाख रुपये आषाढी पोर्णिमेपावेतो द्यावे. त्याची विल्हे करार मदार कधी देतात हे काहीच लि॥ नसा. यावरून काये म्हणावे. याउपरी नव्हे ते व तुम्ही येके जागा बसोन याचा जाबसाल तावार लेहून पाठवणे म्हणजे त्याची पेरवी करणे ते केली जाईल.' जाणिजे छ * ५ जिल्हेज. टी॰ 'राजश्री मल्हारजी बाबा होळकर याची व आमची भेटी' होणार आहे. सत्वरीच होईल. येशास त्यासी तर्‍ही आम्हास खरेखुरे बोलले पाहिजे. तरी पांचा लाखाचीही विगत सुधी तुम्ही लिहिली नसा आणि सात लाखाचे तरी तुम्हास विस्मरणच पडलेसे दिसते. तरी लक्ष्मण रांगडे [?] व तुम्ही येकत्र होउन सर्वही तपसीलवार लेहून पाठवणे. म्हणजे त्यासी आम्ही जे बोलणे ते बोलोन मग उभयताच्या विचारे करून जे तरतूद कोटेकराची करणे ते करू. याचा जाब सत्वरीच पाठउन देणे. ढील येके घडीची न करणे, छ मार. ।' बहुत काये लिहिणे हे विनती.

(मोर्तब सुद)

---

लेखांक [१९१] श्री * संवत् १८१५ श्रावण वद्य ३
[२१ अगस्ट १७५८]

सिका स्वारी.

राजश्री बाळाजी येशवंत
कमाविसदार पा॥ पाटण प्रांती चूंदी गोसावी यासि.

आखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो॥ जनकोजि सिंदे रामराम सुरसन

---

(२०४) 'जन्माची सागड होती तोपावेतो आमचा वचक होता. कित्येक कामकाजें असाध्य ती साध्य होतीं.' [चक्कर पान ४५] हा वित्तशुद्धतेचा चमत्कार बराच आला होता म्हणून मल्हारजी होळकरांनीं जनकोजीची भेट घेतली त्या भेटीचा परिणाम ते स्वत आपल्या ३० आगष्ट १७५८ चे पत्रांत आबाजी रघुनाथ तिगडीकरास अशा प्रकारें दर्शवितात कीं, 'जनकोजी शिंदे याच्या आमच्या भेटी झाल्या परस्परें सारस्य होऊन कोणेविशी संशय राहिला नाहीं त्यास तुम्ही व बाळाजी यशवत [गुलगुले] पूर्ववत श्री एकत्रित राहून कामकाज करीत जाणें आणि हिशेब तीनसाला सविस्तरें लिहिणें. सारांश नालिश येऊं न देणें. त्याचा आपला समाईक कारभार चालत आल्या प्रो चालविणें'

तिसा खमसेन मया व आलफ. देणे राजश्री नारो विठल याची आसामी पूर्वीपासून परगणे मजकूरी आहे. त्याप्रमाणे हाली करार केली आसे. याचे वेतन सालीना रूपये ५०० पांचसे रूपये करार केले आसे. तर पा मजकूरच्या इजारियाचे यैवजी मारनिलेस पांचसे रूपये पावते करीत जाणे. रुपये पाव ते करावयास दिकत न करणे. दरसाल नेमणूके प्रमाणे पावते करीत जाणे. जाणिजे छ * १६ जिल्हेज. बहुत काय लिहिणे हे विनंती.

बार

---

लेखांक [१९२] श्री * संवत् १८१५ भाद्रपद शुद्ध १

[३ सितंबर १७५८]

येथाप्रत

राजेश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रा पाटण गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया अलफ. गोसावी देवगीर व शामगीर वास्तव्ये का मजकूरी यानी हुजूर येउन विदित केले की प्रा मारी केशवरावजी साळगराम बिंदार ब्राम्हण व सन्यासी व भगत वगैरे यासी पाई साडे पंचेतालीस त्याची सई अडीच दररोज निमे सहा महिने शाळू जोरी व निमे सहा महिने उन्हाळू गहू येणे प्रा पूर्वी छतरसाल[२०५] हाडे याजपासोन वाटत आला. त्यास सरकारचा अमल जाल्यापासोन बंद जाला आहे. तो चालविला पा म्हणजे श्री पासी सदावर्त चालवून काळक्षेप करून तुमचे अभिष्टचिंतन करून सुखरूप राहू. म्हणोन त्यावरून श्री चे सदावर्त चालविल्या श्रेयस्कर जाणून येकुण सालाचा येक हिसेब मनास आणता केली बारूले चौसेरी मापे अठरा खंडीचा अजमास जाला त्या पा निमे श्रीप्रित्येर्थ करार करून हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी पा मजकूरपैकी समाइक यैवजी निमे शाळू निमे उन्हाळू धान्ये खंडी नव आपल्या अमलापूर्वी भोगवटा चालत आल्या प्रा ज्याचा त्याजकडे लंगर[२०६] चालवणे. हिसेबामुळे दोन मण अथवा तीन

---

(२०५) बूंदीकर रावराजे छत्रसाल हाडा

(२०६) लंगराचे अनेक अर्थ होतात पैकीं श्रृंखला किंवा साखळदंड हा अर्थ सर्वश्रुत आहेच जहाज, हत्ती, आखाडा व नवसाचे लंगरात श्रृंखलेची कल्पना अंतरभूत होती तशी येथें मात्र नाही. नित्यदान, नित्यभिक्षा भिक्षावळ विशेषत शिधा सामुग्री असा येथें भावार्थ आहे त्याअर्थीच 'लंगर-खाना' [अन्नछत्र] हा शब्द प्रचार पावला आहे

मण अधिक उणे होतील त्या प्रा देणे. सदरहूपैकी सरकार हिसा होईल तो तुमच्या इजारिया यैवजी मजरा असे. प्रति वर्षी नवीन पत्राचे अक्षेप न करणे. या पत्राची नकल घेउन असलपत्र भोगवटी यास परतोन देणे. सदरहू नव खंडी वारूले मापे दाणे समाइक यैवजी पावीत जाणे. जाणिजे छ * २९ माहे जिल्हेज. वहुत काये लिहिणे हे विनती.

---

लेखांक [१९३] श्री * संवत् १८१५ भाद्रपद शुद्ध १

[ ३ सितंबर १७५८ ]

नकल

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रा पाटण गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया अल्फ. वेदमूर्ती राजश्री नाथूराम भट दुबे वास्तव्य प्रा मजकूर यानी हुजूर येउन विदित केले [कीं] मोजे नांदणे प्रा मजकूर येथे आपल्या तीर्थरूपास रावराजे बुधसिंग[२०७] यानी धरती बीघे सुमार १०१ येकसे येक बीघे पुन्यार्थ दिल्ही ते चालत आली. आलीकडे आपल्या अमलापासून बंद जाली असे. तरी सुदामतप्रमाणे येकसे येक बीघा जमीन चालविल्या कालक्षेप चालउन अभिष्टचिंतन करून म्हणोन त्याजवरून हे थोर ब्राम्हण याचे चालविल्या श्रेयस्कर जाणोन पेशजी प्रा येकसे येक बीघा सुदामत करार करून दिल्हे असे. तर येकसे येक बीघा धरती ब्राम्हणाची चालती करणे. तुम्हास समाइक यैवजी मजरा दिल्हा जाईल. जाणिजे छ ~ २९ माहे जिल्हेज. या पत्राची प्रत लेहून घेणे असलपत्र भटजी मजकूरास भोगवटी यासि परतोन देणे. जाणिजे छ मजकूर. बहुत काये लिहिणे हे विनती.

---

(२०७) हे बूंदीचे राजे बुधसिंगजी हाडा. कोटेकरास जसें 'महाराव' तसेंच बूंदीकरास 'रावराजा' ही पदवी आहे [ लेखांक १९७, २०३, २०८ ]

लेखांक [१९४] श्री ~ संवत् १८१५ भाद्रपद शुद्ध १
[ ३ सितंबर १७५८ ]

असल बमोजिब नकल

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रा पाटण गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया व अलफ. वीा राजश्री संभू भट या [व्या]स अग्नहोत्री यानी हुजूर येउन विदित केले की मोजे रिंडी चीडी प्रा मार यथे अम्हास रावराजे दलेलसिग[२०८] यानी धरती धर्मार्थ दिल्ही बीघे सुमार ५० पंनास ते चालत आली. आलिकडे आपल्या अमला पासून बंद जाहाली असे. तरी सुदामतप्रमाणे पनास बीघे जमीन चालविल्या कालक्षेप चालउन अभिष्टचिंतन करू. म्हणोन त्याजवरून हे ब्राम्हण थोर याचे चालविल्या श्रेयेस्कर जाणून पेशजीप्रमाणे पनास बीघे सुदामत करार करून दिल्ही असे. तरी पनास बीघे धरती समाइक यैवजी ब्राम्हण मजकूरा चालवीत जाणे. तुम्हास समाइक यैवजी मजरा दिल्हे जातील. जाणिजे छ * २९ माहे जिल्हेज. या पत्राची प्रत लेहून घेउन असल पत्र भटजी नजकूरा भोगवटी यांस परतोन देणे. जाणिजे छ मजकूर. बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१९५] श्री * संमत् १८१५ भाद्रपद शुद्ध १
[ ३ सितंबर १७५८ ]

नकल

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रगणे पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूर सन तिसा खमसेन मया अलफ. वीा राजश्री संसाराम जोशी वास्तव्य प्रा मजकूर यानी हुजूर येउन विदित केले की मोजे रावासे प्रा मजकूर येथे रावराजे दलेलसिंग यानी

(२०८) रावराजा दलेलसिग बूंदीवाले कोट्याप्रमाणेच बूंदीतून ही करवर [ करवाड ? ] शाखा निघाली त्या शाखेंतील हा दलेलसिंग होता. त्याला सवाई जयसिंगजी [ जयपूरकर ] यानी आपला जामात करून बुधसिंगजीचे जागी बूंदीचे गादीवर काही काळपावेतो प्रस्थापित केले होते असें टाड सागतो [ Rajasthan vol ii page 394. ]

धर्मार्थ धरती बीघे सुमार ५० पनास दिल्ही ते चालत आली. आलीकडे आपला अमल जाल्यापासोन बंद जाली असे. तरी सुदामतप्रमाणे पनास बीघे जमीन चालविल्या कालक्षेप चालउन अभिष्ट चिंतन करून म्हणून त्याजवरून हे ब्राम्हण थोर याचे चालविल्या श्रेयेस्कर जाणून सदरहू पंनास बीघे धरती ब्राम्हण मजकूरास समाइक यैवजी चालवीत जाणे. तुम्हास समाइक यैवजी मजरा दिल्हां जाईल. जाणिजे छ * २९ माहे जिल्हेज. या पत्राची नकल लेहून घेउन असल पत्र भटजीस मोगवटी यासी परतोन देणे. प्रति वर्ष नूतन पत्राचा अक्षेप न करणे. जाणिजे छ मजकूर. बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१९६] श्री * संवत् १८१५ भाद्रपद वद्य ६
[८ सितंबर १७५८]




राजश्री बालाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे लिहिले वर्तमान कळो आले. अजीतसिंग [कोटेकर] मृत्य पावले. त्याचे पुत्र छेत्रसिंगजी उमर तिसा वर्षाचे आहेत त्यास राज्याविसी दिलासेनामा[२०१] पाठवावे म्हणोन तपसीलवार लिा. त्यावरून त्यास राज्याविसी दिलासेनामा पा आहे. हा त्यास देणे. हुंड्या राजश्री साबाजी पा सिंदे याजकडे कोटे [व] पाटण मिळोन चालिसा हजाराच्या ॥ पाठविल्या म्हणून लिा [ तरी ] बहुत उत्तम असे. रा छ * ४ मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती. मोर्तब सुद

---

(२०१) दिलासेनामा मूळ फारसींत हा प्रयोगच पहावयास मिळत नाहीं मग मराठीत कसा आला कळे. याचा अर्थ समाधानपत्र असा आहे

लेखांक [१९७] श्री * संवत् १८१४ भाद्रपद शुद्ध ६
[८ सितंबर १७५८]

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार पा पाटण गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी शिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया व अलफ. वेदमूर्ती राजश्री इंद्रजी व संतोकराम पिता जैनाथजी अग्निहोत्री अवदीच कौसीक गोत्री शाका आश्वलायन याणे हुजूर यउन विदित केले की रावराजे बुधसिग याणी मोजे सुवासा पा मार पौ जमीन बीघे ४१ येकेताळीस धर्मार्थ दिल्ही होती. ते अलीकडे चालत नाही म्हणोन ब्राम्हण मजकूरानी येउन निवेदन केले की आपला कालक्षेप चालत नाही. तर कृपाळू होउन पूर्व प्रा जमीन बीघे यकताळीस चालविल्याने कालक्षेप चालउन आपले अभिष्टचिंतन करू. त्यावरुन ब्राम्हण थोर श्रेष्ठ याचे चालविल्या श्रेयस्कर जाणोन पेशजी प्रा जमीन बीघे ४१ यकताळीस करार करून सनद दिल्ही असे. तर समाइक यैवजी चालवीत जाणे. प्रति वर्षी नूतन पत्राचा अक्षेप न करणे. या पत्राची नकल लिहून घेणे आणि हे पत्र भट मजकूरास भोगवटी यास देणे. सदरहू यकताळीस बीघे जमीन समाइक ब्राम्हणास देउन चालती करणे. जाणिजे छ * ४ माहे मोहरम. बहुत काय लिहिणे हे विनंती.

बार.

---

लेखांक [१९८] श्री * संवत् १८१५ भाद्रपद शुद्ध ११
[१३ सितंबर १७५८]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा निसा खमसेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले व देवजीलाल [?] हे आले. त्याणी

सविस्तर अर्थ सांगितला त्यावरून कळले. यैशास त्याचा जाबसाल जो सांगणे तो देवजीलालास सांगितला असे. त्याच्या लिहिल्यावरून कळेल. तरी तुम्ही तेथे हे पत्र आमचे पावताच क्षिणी स्वार होउन आखेरामास बराबरी घेउन रात्रीचा दिवस दो मजलीने आम्हाजवळ येणे. मुहूर्त[२१०] पाहावयाचा गुता सहसा न करणे. सुदिन पाहो म्हणून म्हणाल तरी मग लांब पडेल. [तुम्हास] आटोपणार नाही. सबब आज्ञे प्रोच पत्र पावताच स्वार होउन आखेराम व तुम्ही आड वस्तीनेच येउन लौकर दाखल होणे. जाणिजे छ ५ ९ माहे मोहरम. ।" बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

---

लेखांक [१९९] श्री ✱ संवत् १८१५ भाद्रपद शुद्ध ११

[ १३ सितंबर १७५८ ]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर)

राजश्री बाळाजी यशवत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले तेथे प्रात मजकूरचा मजकूर लिहिला. यैशास पैसा टका दिल्हा खेरीज लटकी माया ममता काये कार्याची ! हे तुम्ही जाणतच आहा आणि वारंवार लिहिता अपूर्व असे ! असो. त्याणी करार मदार करून गेले त्यासी तर ते सचोटीस उतरले नाहीत. आता तम्ही त्यास परिछिन्नवादे विचारे लाउन पुसणे. जे बाकी पैकी काये देतात व हाली साला कारणे काये देतात. हे सत्यत्व त्याणी बोलावे. यैसा करार त्यांचा विचारून आम्हास लेहून पाठवणे म्हणजे आम्ही आमच्या चित्तानरूपच ते बोलतील तरी मग राजश्री मल्हारजी बावास पत्र लेहून पाठउ. जे येणे प्रोच विल्हेस लावावे. येणे प्रो ठराव कसकसा चित्ता सारखां बोलतात ते लिहिणे म्हणजे जे आज्ञा करणे ते केली जाईल. तेथे तुमचे त्याचे बोलणे न बनेल. चित्तानरूप ते बोलत नसेत.

---

(२१०) बाळाजी गुळगुळ्याचा जोतिषशास्त्रावर विश्वास असून ते मुहूर्त पाहिल्याखेरीज निघत नसावेत असा अनुभव शिंद्यांस असल्यामुळें ही सूचना केली आहे [ लेखांक ६३, ६५ ] कोणतें निकडीचें काम या वेळीं पडलें होतें हें समजण्यास मात्र साधन नाही

येसेच तुमच्या विचारे होईल तरी सितावीनेच[२११] त्यास घेउन आम्हाकडे येणे. येथे करारमदार करून राजश्री मल्हाररायास लेहू. त्याप्रोच त्याजकडूनही अमलात आणउ. येविसी सितावीच करणे. हैगैवरी येकंदर न घालणे.' जाणिजे छ * ९ मोहरम. ॥ बहुत काये लिहिणे हे विनती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [२००] श्री * संवत् १८१५ भाद्रपद वद्य ८
[ २४ सितंबर १७५८ ]

श्री जोति
स्वरूप चरणि
तत्पर जयाजि सु
त जनकोजि सिं
दे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत
कमाविसदार प्रा पाटण गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया व अलफ राजश्री राघो हरी याची आसामी प्रा मार सुदामत प्रा चालत आली असे त्याप्रा चालवीत जाणे. कोणेविसी दिकत न करणे. जाणिजे छ * २० मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

बार

---

लेखांक [२०१] श्री * संवत् १८१५ आश्विन शुद्ध ८
[ १० अक्तुबर १७५८ ]

श्री जोति
स्वरूप चरणि
तत्पर जयाजि सु
त जनकोजि सिं
दे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा

---

(२११) शितावीनें म्हणजे त्वरेनें, घाईनें

तिसा खमसेन मया अलफ. वेदमूर्ती राजश्री नरसिंह शास्त्री याचे कर्ज कोट्यात लोका कडे आहे. त्याची खतपत्रे शास्त्रीजवळ आहेत. वीता रुपये मुदल रुा

५०० मोहनराम ब्राम्हण त्रिवाडी.

४११ रायाजी देवकर.

४०० सहदेव ब्राम्हणावरी.

४०० मोहनसिंग रजपूतावरी.

―――――

१,७११

येणेप्रमाणे मुदल आहे. तरी तुम्ही त्यास ताकीद करून समस्तासही व्याजानसी हिसेब करावयासि सांगोन आपल्या रूबरूच त्याजपासून रुपये सदरहू प्रो व्याजानसी बे मुलाहिजा देवणे. येविसी हे गई सर्वथा न करणे. जाणिजे छ * ७ माहे सफर. ॥ बहुत काये लिहिणे हे विनती.

(मोर्तब सुद)

―――――

लेखांक [२०२] श्री * संवत् १८१५ कार्तिक शुद्ध ९
[९ नवंबर १७५८]

नकल

कमाविसदार वर्तमान भावी प्रा रायगड गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे सुहूरसन तिसा खमसेन मया व अलफ. वो राजश्री वासुदेव भट जोतिसी यासी धर्मार्थ सरकारातून दर रोज रुा ।• पावला करार करून दिल्हा असे. तरी साल्दरसाल चालवीत जाणे. नूतन पत्राचा आक्षेप न करणे. भट मजकुर यासी दररोज पावलाप्रमाणे येकसाल रुपये ९० नवद प्रा पावविीत जाउन कबज घेणे. जाणिजे छ * ७ रावल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

―――――

लेखांक [२०३]　　　श्री　　　* संवत् १८१५ कार्तिक शुद्ध १५

[१५ नवंबर १७५८]

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार प्रा पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो　　जनकोजी सिंदे रामराम सुहूर सन तिसा खमसेन मया व अलफ. श्रीमलजी गोसावीजी यानी हुजूर येउन विदित केले की आम्हास पूर्वी रावराजे दुलेलसिंग यानी धरती धर्मार्थ बीघे सुमार दिल्ही होती बीतपसील.

२७५　गांव तीर्थ पा मार.

१२१　गाव चांदण प्रा मजकूर

---

३९६

येकुण तीनसे शहाणो बीघे चालत आली. अलीकडे आपल्या आमलापासून बंद जाहली. तरी कृपा करून सुदामतप्रमाणे तीनसे शाहाणो बीघे चालविल्या कालक्षेप चालउन अभिष्टचिंतन करून म्हणोन त्यावरुन याचे चालविल्या श्रेयस्कर जाणून निमे धरती बीघे सुमार १९८ करार करून दिल्हे असेत. तर दोही गांवावर येकसे अठयाणो बीघे चालवीत जाणे. तुमच्या इजारियात समाइक यैवजीं मजरा दिल्हे जातील. हे पत्र गोसावी मारास भोगवटी यास देउन या पत्राची नकल लेहून घेणे. प्रति वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

पैा छ १३ रावल. कार्तिक शुद्ध १५ सं १८१५

[१५ नवंबर १७५८]

---

लेखांक [२०४]　　　श्री　　　* संवत १८१५ कार्तिक वद्य १०

[२५ नवंबर १७५८]

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार पा पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो　　जनकोजी सिंदे रामराम सुमा

तिसा खमसेन मया व आलफ. वो रा रामकृष्ण श्रोत्री व वो भागीरथ श्रोत्री व वो जीवनराम श्रोत्री वास्तव्य बूंदी याणी हुजूर यहून विदित केले की मौजे लकवासा पा मजकूर येथील धरती धर्मार्थ रावराजे दुलेलसिंग यानी इनाम वीघे सुमार १८० यकसे ऐसी दिल्ही त्याप्रा चालत आली असता आमल सरकारचा जाला त्यादिवसापासून बंद जाली. तरी कांही जमीन इनाम चालविल्या त्याजवर कालक्षेप चालउन अभिष्ठ चिंतन करू. म्हणोन त्यावरून हे थोर विद्यापात्र ब्राम्हण याचे चालविल्या श्रयस्कर जाणून पा मारी धरती वीघे सुमार ९० नवद वीघे धर्मार्थ करार करून दिल्ही असेत. तरी सदरहू प्रा नवद वीघे पा मजकूरी समाइक यैवजी भटजीकडे चालवणे. त्याप्रा समाइक यैवजी इजारियात मजरा असे. प्रती वर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे. या पत्राची प्रत घेउन असलपत्र भटजीकडे भोगवटी यास परतोन देणे. जाणिजे छ * २३ माहे रावल. बहुत काय लिहिणे हे विनती.

बार

---

लेखांक [२०५] श्री * सवत १८१५ कार्तिक वद्य ११

[२६ नवंबर १७५८]

नकल

राजश्री बाळाजी यशवत कामदार प्रा पाटण गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूर सन तिसा मया व अलफ. वो राजश्री बाळकिसन त्रिवाडी वास्तव्य का मजकूर याणी हुजूर येउन विदित केले की आम्हास पूर्वी दुलेलसिग हाड्यानी धरती उदक वीघे सुमार ५० पनास मोजे अरनिटा येथे दिल्ही होती ती चालत आली. आलीकडे सरकारचा अमल जाहला त्यापासून बंद असे. त्याजवरून आमचा कालक्षेप चालत नाही. त्यास इनाम पैकी जे धरती आपण देतील तिजवर कालक्षेप करून अभिष्टाचितन करीत जाउ. म्हणून त्याजवरुन ब्राम्हण थोर विद्यापात्र याचे चालविल्या श्रेयेस्कर जाणून मोजे मारपैकी धरती उदक वीघे सुमार २५ पंचवीस करार करून दिल्ही असे. तरी सदरहू प्रो पचवीस वीघे धरती मारनुलेकडे समाइक यैवजी पूर्वीचा भोगवठा मनास आणून भटजीकडे चालवीत जाणे. समाइक इजारियाच्या यैवजी मजुरा असे. या पत्राची नकल घेउन असल

पत्र मारनुलेस भोगवटी यास देणे. प्रति वर्ष नवीन पत्राचा आक्षेप न करणे. जाणिजे छ * २४ रोावल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

बार

---

लेखांक [२०६] श्री * सवत १८१५ कार्तिक वद्य ११

[ २६ नवबर १७५८ ]

श्रीकेशवराय

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी यशवंत कादार पा पाटण गोसावी यांसि

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया व अलफ. वो रा उदाराम व जैकिसन सेवक श्री यांणी हुजूर येउन विदित केले की पूर्वी रावराजे दुलेलसिग ह.डे यानी कस्बे मारच्या सायेरावर रोजीना टके दोन करून दिल्हे आहेत त्याप्रमाणे चालत आले. आलीकडे सरकारच्या आमलात बंद आसे. त्यास कांही उपजिविका करून द्यावी. त्याजवरी कालक्षेप चालउ. श्री केशवरावजीस पोशाग करून अभिष्टचिंतन करू. म्हणून त्याजवरुन हे ब्राम्हण थोर याचे चालविल्या श्रेयैस्कर जाणून कस्बे मारच्या सायेरावर रोजीना टके सुा २ दोन येकुण पैसे च्यार समाइक यैवजी करार करून दिल्हे आसेत. तरी सदरहू प्रमाणे भोगवटा मनास आणून दोन टके मारनिलेकडे चालवीत जाणे. समाइक यैवजी मजुरा आसेत. प्रति वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे. याची प्रत घेउन आसल पत्र मारनिलेस भोगवटी यासी देणे. जाणिजे छ * २४ रौावल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२०७] श्री * संवत १८१५ कार्तिक वद्य १२

[ २७ नवंबर १७५८ ]

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी यशवंत कादार प्रा पाटण गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया व अलफ. तपोनिधी सुजानिया वना[थी]त वास्तव्य मोजे लाडपूर यास मोजे

मारी बुधसिंग हाडे याने उदक धरती बीघे पौणसे [दिली] होती [ती] चालत आली. हाली सरकारच्या अमलात बंद जाहली म्हणोन हुजूर विदित जाहले. त्याजवरुन जमीन सरकारात ठेउन दर बीघा रुपये १ प्रा रुपये ७५ पाउणसे करार करून दिल्हे आहेत. तर समाइक यैवजी सालदरसाल रुपये ७५ पाउणसे देत जाणे. प्रति वर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राची नकल घेउन असलपत्र नाथ मारीयास भोगवट्यास देणे. सहरहू ७५ पाउणसे रुपये समाइक यैवजी मजरा पडतील. पुरातन भोगवटा मनास आणून लिहिल्याप्रमाणे रुपये देत जाणे. जाणिजे छ * २५ रोवल. बहुत काय लिहिणे हे विनती.

बार

---

लेखांक [२०८] श्री * संवत् १८१५ मार्गशिर्ष शुद्ध १०

[ ९ दिसंबर १७५८ ]

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी येशवंत कमाविसदार प्रांत पाटण गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया व अलफ. वो रा जंगनाथ वोझे वास्तव्य पा मजकूर याणी हुजूर येउन विदित केले की मौजे लाडपुर पा मजकूर येथे उदक धरती बीघे सुमार २१ येकवीस पूर्वी रावराजे किसनसिंग[२१२] याणी इनाम करून दिल्ही त्या प्रा चालत आली. आलीकडे सरकारच्या आमलात बंद आहे. त्यास कांही जमीन चालविल्या कालक्षेप करून अभिष्ट चिंतन करू. म्हणोन त्याजवरून हे ब्राम्हण कुटुंबवत्सल याचे चालविल्या श्रयेस्कर जाणून मोजे मजकूरी उदक धरती बीघे सुमार ११ आकरा करार करून दिल्ही असे. तरी आपल्या आमलापूर्वीचा भोगवटा मनास आणून सदरहू धरती बीघे आकरा मारनिलेकडे समाइक यैवजी चालवीत जाणे. त्याप्रमाणे समाइक इजारियात मजरा असेत. प्रति वर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे. याची प्रत घेउन असलपत्र मारनिलेस भोगवटी यास देणे. जाणिजे छ * ७ राखर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

(२१२) हे रावराजे किसनसिंगजी बूंदीचे असावे असें अनुमान निघते पण टॉडने हें नाव कोठे दिलें नाही

लेखांक [२०९] श्री * संवत् १८१५ मार्गशिर्ष शुद्ध १२
[९ दिसंबर १७५८]

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी यशवंत कमादार प्रांत पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया व आलफ. वो राजश्री बुधराज दिक्षित काशीकर वास्तव्य काा पाटण याणी हुजूर येउन विदित केले की मोजे सवासा पाा मार येथील धरती धर्मार्थ दूलेलसिंग यानी इनाम वीघे सुमार २५१ दानसे यक बीघा दिल्ही होती. त्या प्राा चालत आसता आमल सरकारचा जाहला त्यादिवसापासून बंद जाहली. तरी कांही जमीन इनाम चालविल्या त्याजवरी कालक्षेप का [चा]लउन अभिष्ट चिंतन करू. म्हणोन त्यावरुन हे थोर विद्यापात्र ब्राम्हण याचे चालविल्या श्रेयस्कर जाणून पाा मजकूरी पो धरती वीघे सुमार १०१ यकसे यक बीघा धर्मार्थ करार करून दिल्हे असत. तरी सदरहू प्रो यकसे यक बीघा पाा मारी समइक यैवजी भटजीकडे चालवणे. त्या प्रो समाइक इजारिया यैवजी मजरा असे. प्रति वर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे. या पत्राची प्रत लिहून घेउन असलपत्र भोगवटी यास परतोन देणे. जाणिजे छ * ७ राखर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

वार

---

लेखांक [२१०] श्री * संवत् १८१५ मार्गशिर्ष वद्य ८
[२३ दिसंबर १७५८]




राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन तिसा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. कोट्याचे यैवजी साहुकाराचे पंनास हजार रुपये देविले ते त्यास पावते करून तीन चिठ्या पाठविल्या त्यावरून कळो येईल म्हणोन लिहिले. तर पंनास हजार रुपये पावते केले [तरी] उतम केले. राजश्री

अखेराम पचोली यानी तीर्थस्वरूप राजश्री काका बाबासी[२१३] रुपये द्यावयाचा करार केला आहे त्याचा वायदा होउन गेला. तर कराराप्रमाणे यैवजाची हुडी करून सत्वर पाठविणे. जाणिजे छ * २१ राखर. [?] बहुत काय लिहिणे हे विनती.




---

लेखांक [२११] श्री संवत् १८१५ मार्गशीर्ष

[ दिसंबर १७५८ ]

नकल यथाप्रत

राजश्री बाळाजी येशवंत कामदार प्रा पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा तिसा खमसेन मया व अलफ. श्री गोपाळराम व्यास[२१४] यानी हुजूर येउन विदित केले की पूर्वीपासून धरती बीघे सुमार २०० टोनसे पा मजकुरी वगैरे गाव चालत आली. आलीकडे आपला आमल जाल्यापासून बद जाहाली. तरी कृपा करून सुदामतप्रमाणे धरती चालविल्या काळक्षेप चालउन अभिष्ट चिंतन करू. म्हणोन त्यावरुन हे ब्राम्हण थोर याचे चाळविल्या श्रेयेस्कर जाणोन सुदामतप्रमाणे दानसे बीघे जमीन करार करून दिल्ही असेत. तरी सुदामत प्रो चालवीत जाणे. हे पत्र भटजी मारास भोगवठी यास देउन या पत्राची नकल लेहून घेणे. समाइक यैवजी तुमच्या इजारियात मजरा दिल्ही जाईल. बहुत काय लिहिणे हे विनती.

---

लेखांक [२१२] श्री * संवत् १८१५ मार्गशीर्ष

[ दिसंबर १७५८ ]

हिसेब संस्थान कोटे सरकार राजश्री जनकोजी सिंदे सुभेदार सुा तिसा खमसेन मया

---

(२१३) जयाजी शिंदे याचे कनिष्ठ [सहोदर] बंधु दत्ताजी यास जनकोजी 'काका' म्हणत असत. 'बाबा' हें सन्मानार्थी विशेषण तत्कालीन रुढीप्रमाणे लाविलेलें दिसतें

(२१४) गोपालराम व्यास हे पुढें शिंद्यांकडे राजकीय कारभारात कोटेकरांकडून येत जात असत तें पुढें कळणारच आहे

अल्फ. समत १८१५ श्री माहाराज सत्रसालजीच्या टीक्या बाबत नजराणा उभयेता सरदाराचा २,००,००० रुपये

पैकी वजा श्रीमंत राजश्री मल्हारराव होळकर याणी परभारे घेतले १,००,००० रुपये

बाकी सरकार [ जनकोजी शिंदे ] १,००,००० रुपये

यास पावती.

३३,९०० कबज छ २९ रबिलौवल

३१,००० जमा पोते छ २६ रबिलौवल मुकाम झपायता [?]

२४,५०५ नख्त

६,४९५ मोहरा नाणे सुमार ४४३ दर १५ प्रमाणे

३१,०००

२,९०० परभारे नख्त

२,४०० खरेदी घोडे रास २ देणे गुा मीर दुला

येकुन कीमत रुा

१,३०० निळा घोडा.

१,१०० कुमयेत घोडा.

२,४०० रास २.

५०० ता मनसूर चोपदार[२१५] कोठ्यात सामान करावयास दिल्हे.

२,९००

३३,९००

(२१५) हा मनसूर चोबदार महादजी शिंद्याच्या रंगीन दरबारी चित्रात उभा आहे.

६५,६०० किता कब्ज दुसरी छ २९ माहे रबिलौवल हुंड्या लस्करात दिल्या मुकाम अपायता मा। राघो जनार्दन.

६८॥ छ ३० रबिलौवल मा। मनसूर चोपदार बरहुकुम कब्ज सूत वजन पक्के ८३।७ मुकरा [ ? ]

रुपये

---

९९,५६८॥

बाकी

४३१॥ रुपये

---

लेखांक [२१३] श्री ः संवत् १८१५ पौष वद्य ८

[ २१ जनवरी १७५८ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहा जनकोजी सिंदे राम राम सुमा तिसा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले तेथे खिचीकरारा ताकीदपत्रे आणविली त्या वरून बलभद्रसिंगारा[२१६] व बकसी त्रिथीराजारा[२१७] ताकीदपत्रे पाठविली आहेत. पूर्वी ही या प्रोच पा। असेत व हालीही दुसरी पाठविली आहेत. ही त्याजकडे पाठवणे. जाणिजे छ * २१ माहे जमादिलौवल. ¹ बहुत काय लिहिणे हे विनती. मोर्तब सुद

---

(२१६) सुप्रसिद्ध खीची या जुन्या राजपूत घराण्याचा साम्प्रत ज्या तीन शाखा शिंदेशाहीत आहेत त्यापैकी ठिकाणे मकसूदनगड या शाखेचे हे राजे बलभद्रसिंगजी उत्पादक होत. या शाखेचा निर्वंश झाला असतां हें राज्य शिंदे सरकारांनी खालसा न करिता ठराविक टांका ठरवून सगोत्रजांपैकी रतनसिंग नामें मुलगा दत्तक घेण्याची परवानगी देऊन राज्य रक्षण केलें आहे.

(२१७) हा पृथ्वीराज जातीनें रजपूत असून खीचीचा तो बक्षी म्हणजे सेनापती होता. महान् शूर योद्धा अशी त्याची कीर्ति या देशात आजवर आहे.

लेखांक [२१४] श्री * संवत् १८१५ माघ शुद्ध १
[ २९ जनवरी १७५९ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया अलफ. सोभागसिंग व मेघसिंग हाडे वस्ती कोटे येथे राहतात त्याज कडे मथुरेस असता पेमराज सावकार याणी कर्ज रुपये दिल्हे होते. त्यास ते द्यावयासि नवदीगर करितात. तरी तुम्ही सरकारचेच रुपये आहेत येसे जाणून मशारनिलेकडून भला माणूस पाठविला असे. याजवळ दामदाम खतापत्राप्रमाणे व्याजसुधा हिशेब करून सरकारच्या जोऱ्याने देवणे. सावकार मार याचे जरूर जाणून लिा आहे. तरी तुम्हीही अवश्येकता धरून आज्ञे प्रा रुपये उगवेत ते करणे. हे गै न करणे. जाणिजे छ * २९ जावल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [२१५] श्री * संवत् १८१५ माघ शुद्ध १३
[ ९ फरवरी १७५९ ]




राजश्री बाळाजी येशवत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा तिसा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे लिहिले की 'प्रांत मारी बखेडा बळभद्रसिंग खिची याने धूम केली आहे. सबब पैक्यास दिरंग लागला असे म्हणून कीतेक तपसीले लिहिले. तरी त्याचा बखेडा तो काये ! त्यासी तंबी करितील सारखा भरवसाच आहे. त्यामधे राजश्री सटवोजी राजोले याचीही फौज त्या प्रातेच नजीक तुम्हास आहेत. त्यांचा व आमचा समाइकच पैका येणे. तरी त्यास पत्रे त्यांची व आपली पाठउन त्याजकडून बळभद्रसिंगास सिक्षापूर्वक ताकीदपत्र व त्यांचा एखादा भला माणूस त्याजकडे पाठउन आपले प्रांतात त्यांची धामधूम न होये

यैसे करणे आणि सरकारचा पैका लौकरीच वसूल येई यैसे करणे. वरचेवरी वर्तमान लिहित जाणे. रांगडे लोक लबाड आहेत. जाणतच असा. तरी यैवज वसुलात जलदीनेच आणणे. है गै न करणें. जाणिजे * छ १० माहे जमादिलाखर. ।" बहुत काये लिहिणे हे मिनती.

(मोर्तब सुद)

---

लेखांक [२१६]

श्री * संवत् १८१० माघ शुद्ध १४

[१० फरवरी १७५१]

पुा राजश्री बाळाजी येशवत गोसावी यासि.

स्नो जनकोजी शिंदे रामराम सुरसन तिसा खमसेन मया अल्फ. तीर्थस्वरुप राजश्री काकाबाबा कोट्याहून आले. ते समई अखेराम पचोली वगैरे कारभारी यानी तुमच्याच मारफातीने दोन लक्ष रुपये देउ केले. त्यापैकी आमची खासगत वाटणीचा यैवज तर पंधरा रोजानी रुपये ७७,००० सत्याहतर हजार रुपये पाठउन देतो यैसा करार करून कागदपत्र लेहून दिल्हे. [तो] वाइदा टळोन गेला. म्हणोन यथून राजश्री मोजीराम सावकार याची वरात तुम्हावर सत्याहतर हजार रुपयाची करून पाठविली. ते तुम्ही घेतली [नाहीं.] माघारी टाकून दिल्ही. हे अपूर्व असे ! 'आमच्या दरबारची सनद आजतागाईत कोण्ही तऱ्ही माघारी टाकली आहे की काये ! तुम्ही काये समजोन सनद टाकली २१८ न कळे ! बरे जे केले ते उतमच केले. याउपर सनदेचा बोभाट यउ न देणे.' ज्या साहूकारास मारनिलेने रुपये देविले आसतील त्यासी सत्याहत्तर हजार रुपये [देऊन] कबज हुजूर पाठवणे. येविसीचा बोभाट फिरोन येहू न देणे. लिहिल्याप्रमाणे यैवज आधी आधी पावता करणे. जाणिजे छ * ११ जाखर. ।" हे विनती.

(मोर्तब सुद)

---

(२१८) बाळाजीसारख्या मुत्सद्यानें अशा प्रकारें [ शिंद्याची वराती ] सनद टाकावी याचें कारण काय असावें बरें ? किरकोळ साहुकारी पत्रावरून हे लोक पैशासाठीं बरेच त्रस्त ल.वीत असल्याचें वळतें तसलाच काहीं तरी प्रकार घडला असावा एरवी हे प्रकरण बरेंच विकोपास गेले असतं 'याउपर बोभाट येऊं न देणें' एवढ्यावरच ज्याअर्थी तें संपलें तेव्हा कारण क्षुल्लक असणेंच संभवते. किंबहुना मोजीराम साहुकाराचे अतिशयोक्तीची ही मोजच समजली पाहिजे.

लेखांक [२१७] श्री * संवत् १८१६ जेष्ठ वद्य ७

[१७ जून १७५९].




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूरसन सितेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तेथे प्रा मजकूरचे व पां पाटणचे वर्तमान तपसीलवार लिहिले त्यावरून अवगत जाहले. कोट्याबाबत पैका अद्यापि वसूलात न आला. 'खिचीकरासी व यासी बधवैर'[२१९] लागले असे. सबब सर्वही कारभारी खिंचींच्या हदेत जाउन लडाया करितात. अ. खेराम पचोली [परत] आले आहेत. शिवसिंग आल्या नतर सरकारच्या यैवजाची विल्हेवाट कैसी करितातसे [पाहून] मागाहून लेहून पाठउ म्हणून लिहिले. तरी सर्वही विचारे सुस्ती तुम्हापासूनच दिसते. तुम्ही त्यासी तगादा सख्त करिते तरी पैका सरकारचा कधीही राहणार नाही. तगाद्याची हे गै तुम्हापासूनच आहे. त्याजवळ पैका आहे तो सिबंदीस खर्च करितात. सिबंदी मातबर ठेवितात आणि आपस[२२०] मधे भाडण भाडतात. सरकारच्या पैक्याची त्यान तरी काळजीच नसे आणि तुम्हास तरी निकडीने त्याजवळ मागणेच नाही. तसदी सख्त जाली ह्मणजे सहजेच यैवज देत जाते. असा अद्यापि तम्ही हैगैवरी न घालणे. यैवजाविसी त्यास त्वष्ट वरेवजेने लाउन सरकारचा पैका वसूलात लौकर येई ते गोष्ट करणे. दरगुजर सहसा न करणे. नवल विशेष वर्तमान आढलेल त्याप्रमाणे वरचेवरी लेहून पाठवित जाणे.' जाणिजे छ २१ माहे सवाल. बहुत काये लिहिणे हे विनती.




---

(२१९) खींची व कोटेकर यांचें परस्पर 'हाडवैर' असण्याचे मुख्य कारण हें होते कीं, कोटेकरांनीं खींचीचा बराच मुलख बळकाविला होता त्यामुळें या उभयतांमध्यें भाडण जुंपण्यास फारसें जड जात नसें. जयाजींच्या जिवनपर्णी खीचीवर गेलेली फौज परत बोलावून घेतली होती [लेखांक १२८] पण या वेळी परस्पर दोन हात झाल्यासिवाय राहिले नाहींत.

(२२०) खडणी वेळचीर पटत नसल्याविषयी राजेरजवाडे आपापली असमर्थता नाना प्रकारें प्रस्थापित करण्याचा आव घालून सवडमूट मराठ्याकडून मागीत असत हें जर खरे मानिलें तर सिबंदी खर्च वाढवून तें परस्पर जीं युद्धें करीत त्याकामी त्यांना पैशाची तूट का पडूं नये हा कटाक्ष या पत्राचा आहे.

लेखांक [२१८] श्री * संवत् १८१६ जेष्ट वद्य ७

[ १७ जून १७५९ ]

पुरवणी राजश्री बाळाजी येशवंत परगणे कोटे व पाटण गो यांसि.

सुरसन सितेन मया अलफ. पा पाटण येथे कर्ज पटी बाबत रुपये पांच हजाराची वरात हुजरून श्रीमंत स्वामीकडून आली आहे म्हणून लिहिले. त्यास पा मारीच्या ऐन जमापैकी तरी करारात येक पैसा देता येत नसे. हे तुम्ही जाणताच असा. तरी परभारे रयेत निस्वत गावगन्नापैकी सदरहू पांचा हजाराची पटी कर्जाबावत म्हणून करून रुपये वसूल करून घेणे. येविसी है गै सहसा न करणे. आला [ हि ] दा जमा सिवाये कर्ज पटी म्हणून रुपये खामखा गावगन्ना पैकी वसूलात लौकरीच येत ते गोष्ट करणे. जाणिजे छ * २१ सौवाल. ॥ हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [२१९] श्री - सवत १८१६ श्रावण शुद्ध ७

[ ३१ जुलै १७५९ ]

पुा राजश्री बाळाजी येशवत प्रांत कोटे व पा पाटण गोसावी यासि.

सुमा सितेन मया व अलफ. पा पाटण येथे पांच हजार रुपये कर्ज पटी श्रीमतानी घातले आहेत. येशास समाइक सारेच गांवावरी पांच हजार रुपये येन बेरीजे सिवाये पटी घालोन सदरहू रुपये वसूल करून पांच हजार रुपये पा मारी गांवगन्नाहून घेउन जमा तुम्हाजवळ असो देणे. पुढे आम्ही लेहून पाठउन देउं. तेव्हां श्रीमंताकडे रवाना करणे.' राजश्री मल्हारजी बाबा होळकर याजकडील अमलदार कांही खटखट करितील तरी धण्याचा परगणा आहे. त्याणी पांच हजार रुपये समाइक पा मारी मागितले तो येवज कर्ज पटीचा सुटणार नाही. परगणाही त्याचेच सरकारचा आहे. तुम्हास व आम्हास मुकासा देणे धण्याचाच असे. येसे त्यास हेच पत्र दाखउन पाच हजार रुपये समाइक वसूलात आणून तुम्हाजवळ जमा असो देणे.' जाणिजे छ * ६ माहे जिल्हेज. ॥ हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [२२०] श्री * संवत् १८१६ पौष वद्य १३

[ १६ जनवरी १७६० ]




राजश्री लालाजी बलाल प्रांत कोटे व पा पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुमा सितेन मया अलफ. 'दिलीवरी गिलच्या[221] व रोहिले आले. त्यांची व आमची लडाई जाली. छ २० ‡ जमावली गुरूवारे जाहली. त्यास तीर्थरूप काकाबावा यास गोळ्या लागोन लडाईतच[222] राहिले व आम्हासही उजवे दंडावरी गोली लागली. थोडकीच असे. त्याउपर आम्ही बुनग्यात येउन सर्वेही बुनगे सामाळून गांव कोट पुतली[223] प्रांत

‡ १० जनवरी १७६०

(२२१) गिलच्या हें नांव अहमदशाह अवदालीस उद्देशून मराठ्यानी वापरले आहे

(२२२) अवदालीशी बडाऊचे घाटावर जी शिंद्याची दुसरी लढाई [ १० जनवरी १७६० रोजी ] झाली त्यांत 'गोळ्या लागोन दत्ताजी शिंदे लढाईतच राहिले' असे स्पष्ट आहे तेव्हा [दत्ताजी] 'पाटील रणात जिवंत सापडले पेंढारी उचलून लष्करात घेऊन आले' [ राजवाडे खंड १ लेखांक १६५ ] हें शुद्ध ऐकीव [ बाजारी ] वर्तमान होतें असें आता निर्विवाद ठरते

(२२३) कोटपुतली हे गाव रेवाडीचे वायव्य दिशेस २४ कोसावर आहे. जनकोजी 'घायाळ' झाल्यावर ते प्रथम 'बुनग्यात' आले व समागमे बुनगे घेऊन नंतर कोटपुतळीस आले तेथे जवळच मल्हारजी होळकर होते ते या मुकामीं येऊन जनकोजीस भेटले असा या पत्राचा जो ओघ आहे त्याचें साम्य बखरीशी बरेंच जुळतें [ पान ९२ ] 'दहावे दिवशीं चमेलीस आले क्रिया कर्म करून कुवारी नदीवर मुकाम केला तेथे तेरा दिवस करून राहिले तो रात्रौ भागीरथी बाईस पुत्र जाहाला' असें जे बखरकार सागतो ते सध्या तरी जुळत नाही [ बख पान ९६ ] किंवा '४ फरवरी १७६०' अशी जी तारीख राजवाड्याने दिलेली आहे तीही जमत नाहीं [ खंड १ लेखांक १६२ ] 'बुणगे येखादे जागा लाउन सडे फौजेनसी' जाण्याचे मानस उघड होते त्याअर्थी शिंदे होळकराचे बुणगे एकत्र निघाले असतील व [ फाल्गुण वद्य ३ स ] सबलगडास 'पाविले' असतील पण ते 'दहावे दिवशीं' बहुधा पोहोचले नसावेत ही कालमर्यादा अशक्य कोटीतील नव्हती पण बखरकारापेक्षां बुणगे 'पहावयास' प्रत्यक्ष आलेल्या इसमाची साक्ष [ नवीन पुरावा पुढे येईपर्यंत ] केव्हाही विश्वसनीय मानावी लागेल. या दृष्टीने राजवाड्याचें वरील पत्र माननीय आहे खरें पण त्याच्या शिरोभागी '४ फरवरी १७६०' अशी जी तारीख त्यानें ठरविली आहे ती समाधानकारक वाटत नाही 'फाल्गुण वद्य ३ रविवार' ही पत्रातील तारीख खरी मानली तर मोडकाचे जंत्रीनुसार त्या दिवशीं '४ मार्च १७६०' ही तारीख येते. मग ही '४ फरवरी' आली कशी? कदाचित् लिहिणारा चुकला असेल असें ह्मणावें तर 'फाल्गुन

जेपूर येथे आलो. तो येथेच राजश्री मल्हारजी बाबा होळकरही फौजेसहवर्तमान आले. त्याची व आमची भेटी जाहली. याउपरी बुनगे येखादे जागा लाउन आम्ही उभयता सडे फौजेनसी दिलीकडे रोहिले व गिलच्यास तबी करावयास येका दो रोजात जातो. शत्रूस नेस्तनाबूत करितो. चिंता न करणे. तुम्ही आपले मामलियात मजबूदीनेच[२२८] असणे आणि आपले कामकाज करीत जाणे. वरचेवरी वर्तमान लिहित जाणे'. जाणिजे छ * २६ माहे जोवल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

पै छ १७ जोवल माघ वद ४

[ ५ फरवरी १७६० ]

---

लेखांक [२२१]

श्री * संवत् १८१७ कार्तिक वद्य १२

[ ५ दिसबर १७६० ]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजि सुत जनकोजि सिंदे निरंतर)

राजश्री लालाजी बलाळ

कमाविसदार पा पाटण केशवरायाचे गोसावी योसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन इहिदे सितेन मया अलफ. राजश्री बाबुराव गुणाजी याची आसामीचे वेतन रुपये २५०

---

वद्य ३ ' असे स्पष्ट दोन वेळां झाले आहे आणि ' पैवस्ती ' देखील ' फाल्गुन वद्य १२ ' ची आहे. बरें सपशेल चूक आहे असें गृहित धरिलें आणि फाल्गुनाचे जागी माघ वद्य ३ पाहिजे असें मानिलें तरी त्या दिवशीं ' रविवार ' येत नाहीं माघ किंवा फाल्गुन महिन्याचे शुद्ध किंवा वद्य पक्षात त्रितीयेस रविवार मुळीच येत नाहीं रविवार हवाच असला तर तो माघ [शुद्ध किंवा] वद्य २ स येतो व ती तारीख '३ फरवरी' येते फाल्गुना ऐवजी माघ वद्य ३ कोणत्या आधारावर राजवाड्यानें ठरविली हें कळत नाहीं. एवढेंच मला सुचवावयाचें होतें दृष्टीदोष अथवा मुद्रणलीला [ Printers Devil ] ह्मणावी तर ' पचविसावें ' रोजी दत्ताजीस पुत्र झाला असें आचार्य स्वयंस दोनदा ह्मणतात [ खंड १ लेखांक १६२, १६७, टीप २३५, २४५ ]

(२२४) या अपजयामुळें कोटेकराचे कदाचित् डोळे फिरले तर सावधानी ठेवून सज्ज राहण्यासाठीं हा संकेत असावा असें वाटते.

अडीचसे नेमणूक पा। मारी आहे. बाळाजी यशवंत मृत्य[२२५] पावला. नवी सनद पाहिजे ह्या अंपये तुमच्या चित्तान आला आहे. त्यावरून हे पत्र सादर केले आसे. पुरातन नेमणूक आहे त्याप्रानागेच करार आसे. नेमणूकेप्रमाणे मारनिलेचे वेतनाचे रुपये आडीचसे रुपये पावतें करणे. पुढे सालदरसाल चालवीत जाणे. दिकत न करणे. जाणिजे छ ❊ २६ ॡ ।' राखर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैावस्ता छ २५ माहे जमादिलावल.
[ ३ जनवरी १७६१ ]

---

लेखांक [२२२]  श्री  संवत् १८१७ मार्गशीर्ष वद्य १३
[ ४ जनवरी १७६१ ]




राजश्री लालाजी बल्लाल कमाविसदार प्रा। कोटे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुमा इहिदे सितेन मया व अल्फ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. कोटेकराचे व पा। पाटण येथील वर्तमान लिहिले ते सविस्तर कळले. त्यास सेत्रुचे पारपत्य जाल्यानतर कोटेकर वगैरे रजवाडे सर्व पादाक्रान होतील. चिंता न कीजे. पा। पाटण येथील वर्तमान लिहिले. त्यास गारा गेरवा ह्याच परगण्यावरी पडल्या असा अर्थ नाही. ज्याप्रमाणे वरकड परगण्याची

---

(२२५) बाळाजी यशवंत गुलगुल्याचे मृत्यूची ही तारीख नक्की नव्हे. बाळाजीनंतर त्याचे दत्तपुत्र लालाजीचे नावें पहिलें पत्र १६ जनवरी १७६० चें आहे अर्थात् त्यापूर्वी बाळाजी वारले असावेत अक्टूबर १७५९ चे सुमारें त्याचे ' शरीरी आरोग्य नव्हते. प्रस्तुत काहीं आरोग्य आहे थोडीशी शे[सेह]त आलिया सेवेसी येईन ' असें मल्हारजी होळकराचे पत्रावरून कळतें. [ १ नवंबर १७५९ ] स्वास्थ्य होऊन भेटीची पाळीच आली नसावी आणि नवंबर किंवा दिसंबरचे पूर्वीच त्याचा अंत झाला असावा असें वाटतें कोटपुतळीचे तळावरून पहिलें पत्र लालाजीचे नावें येतें तेव्हा बाळाजीचे मृत्यूची वार्ता त्यापूर्वीच शिवारा होती असें निश्चन होतें



श्री जयाजी आपा शिंदे यांची छत्री, श्रीक्षेत्र पुष्कर.

# श्रीमंत जनकोजी बावा शिंदे
## यांच्या नांवें
### उत्तरपानिपतीय पत्रव्यवहार.

१८१८-१८२३ विक्रमी.

लेखांक [२२३] श्री * संवत् १८१८ जेष्ट वद्य ८
[ १८ जून १७६१ ]




राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार प्रा कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी[२२७] सिंदे दंडवत सुरसन

---

(२२७) जनकोजी शिंदे भाऊगर्दीत राहिले मग त्याच्या नावानें हा 'पानिपतोत्तर' पत्रव्यवहार कोठून आला अशी स्वाभाविक शंका येते त्याचें उत्तर असें आहे कीं या महायुद्धातून माघारे आलेल्या वीर मुत्सद्याची तशी कल्पना नव्हती या धुमश्चक्रीतून जसे ते निसटले त्याप्रमाणेंच जनकोजी अन्य मार्गाने निघून गुप्तरूपें येत असावेत अशी त्यास बरीच आशा होती 'चीरजीव [ सदाशिवराव ] भाऊ व जनकोजी शिंदे हे उभयता लडाईतुन निघोन आले ते [ भाऊ ] अजमेर, रुपनगर प्रांत आले. [ बाळाजी पेशवे १५ फरवरी ] [ जनकोजी ] जाटाच्या मुलकातून लखे जंगलाकडून वि कानेराकडे गेले बहुतामुखे वर्तमान आहे शोधात कासिद जोड्या पाठविल्या आहेत. [ ७ मार्च १७६१ ] श्रीमंत यजमानाचे [ जनकोजी ] वर्तमान तर कस्बे विजेपूर सवलगडापलीकडे वैरागीयाचे मठी रात्रीचे वस्तीस होते राजेश्री विठ्ठल सिवदेव याचा खिजमतगार कुन्हाजी खामकर × × विठ्ठलरायाचे पुतण्याचे शोधास जात होते तेथें वस्तीस राहिले तो श्रीमंतास वळखोन रामराम केला. करोली वरुन आले. आठापासी मथुरेस दाखल झाले. मानसानी सांगितले. ठाकरानें इनामें दिलीं आनंद केला आम्ही व राजश्री गंगोबा तात्या [ चंद्रचूड ] नी पुसले तर वर्तमान सिद्धात सांगितले. यजमान गुप्तरूपे जातात. उज्जनीस जावयास एक मास पाहिजे [ चितो कृष्ण २८ मे १७६१ ] पोहरीपुढें सात आठ कोसावर [ येऊन मुक्काम केला तो ] वर्तमान आलें की, जनकोजी शिंदे विजेपुरास आले दो मजलीनें लष्करांत येणार जनकोजीची भेट झाली म्हणजे रामपुऱ्याचे मुमारे येतो [ मल्हारजी

इसने सितेन मया व अल्फ. श्री महाराव छेत्रसाल[२२८] याच्या पोषाखाच्या रानगापैकी जे मिळाली नाहीत त्याचे कीमतीचे

रुपये

४५ श्री छेत्रसालजीकडील.

४५ जामेवार १

० लग

---

४५

३५ राणावतजी[२२९]

३० कीम [न] खाप १

५ चोली १

---

३५

---

८०

---

होळकर २ अप्रेल १७६१ ] या विवेचनेंत राज्यकारभार चालविण्यासाठीं त्याचे जीवित्वाच्या आशेवर हा पेंच प्राप्त होऊन प्रथम प्रचार पावला पश्चात् तोतया जनकोजीचे खूळ उपस्थित झालें तें अस्थ बरेंच दिवस माजलें. शेवटी 'तोतया' रघोजी थोरात चाडोलीकर निघाला' [ लेखाक २७८ ] याच सुमारास रघुनाथराव दादासाहेबास उच्चीचे ग्रह आले त्याचे राज्यकारभाराच्या भरारींत प्रथम शिंद्याची 'मुतालकी' संपुष्टात आली [ शकावली पान ८ ] त्यानंतर दिवाणगिरीची 'बोली' लागली आणि शिंदेशाही 'नजरे' वर डोलूं लागली [ शकावली ८, ९, ११, १४, १६ ] अशी अनेक गडांतरें आलीं त्यासर्वांतून पार पडण्यासाठीं ही प्रथा बरीच वर्षे महादजी शिंद्याना लाववावी लागली हें रहस्य या 'उत्तरपानिपतीय पत्रव्यवहाराचें' आहे संख्येच्या दृष्टीनें पत्रें जरी कमी असली तरी त्याचा कालमान कल्पनेच्या बराच बाहेर गेलेला आहे असें ह्मणावें लागतें.

(२२८) अजितसिंगजीनंतर त्याचे पुत्र छत्रसिंगजी यास 'समाधानपत्र' जाऊन टीक्याबद्दल नजराणाही वसूल झाला होता. [ लेखाक १९६, २१२ ] अशा स्थितींत या पोषाखाचें प्रयोजन बरोबर प्रगट होत नाहीं 'राखी किंवा भाऊबीजे' चें सूत्र जोडावें तर पक्षमासाचा मेळ बसत नाहीं. पानिपतचे महायुद्धात गुंतल्यामुळें कदाचित् हा दिरंगाईचा प्रसंग प्राप्त झाला असेल तर असंभवनीय नाहीं.

(२२९) हीच राणावतजी महाराणा उदेपुरची मुलगी व महाराव दुरजनसालजीची राणी शिंद्यांची 'रक्षाबंधक' भगिनी झाली होती [ ले. क्र. १७९ टीप १९४ ]

येकुण आसी रुपये संस्थान मारच्या यैवजी आमच्या हिसेवी खर्ची लिहून सनगे घेणे. मजुरा आसेत. जाणिजे छ २५ जिलकाद. बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

बार

पैवस्ता छ २८ माहे जिलकाद.
मि. जेष्ट वद्य आमवाशा संमत १८१८
[ २ जुलै १७६१ ]

---

लेखांक [२२४] श्री * सवत् १८१८ कार्तिक शुद्ध १०
[ ८ नवंबर १७६१ ]




राजश्री लालाजी बलाल कामदार सा कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणे विशेष. राजश्री यशवंतराव पवार याजकडे श्रीमंत स्वामीचे खासगीचे कर्ज आहे. त्यास पेशजी राजश्री मल्हारजी होळकर सुभेदार याणी व तीर्थरूप कैलासवासी दत्ताजी पाटील [शिंदे] याणी सा मजकूरची खडणी चालीस लक्ष केली. त्याचा हिसा व महालच्या येवज मशारनिलेचा येणे. त्यायेवजी त्याणी वरात रुपये १,८५,००० येक लाख पच्यासी हजाराची दिल्ही. त्याचे वसूलास नेहमी तेथे गणेश[२३०] अनंत आहेत. त्यासी येवजाचा निकाल अद्यापि होउन येत नाही. 'त्यास प्रस्तुत श्रीमंत स्वामीही यशवंतराव [ पवार ] याचा सरंजाम कुल त्याचे पुत्र राजश्री खंडेराव[२३१] याजकडे करार केला आहे. तरी पेशजीच्या खडणीचा हिसा व हाल

---

(२३०) पवाराकडील कर्ज वसूलीसाठी राघो केशव आला होता तो मृत्यु पावला [लेखांक १८८] त्याचे जागीं हा गणेश अनंत आला होता असें दिसते.

(२३१) पानिपतचे अपजयामुळें नानासाहेब पेशवे 'भ्रांत जाहाले' त्यांस 'बुद्धीभ्रंश जाला' असें जें बखरकार सांगतात [ पाणीपत बखर ४६. भाउबखर १६३ ] त्यासबंधीं आतां

सालचे खंडणीचा हिसा व महालचा येवजपैकी वरातेप्रमाणे येवज व्याजसुधा गणेश अनत याचे पदरी पडे ते करणे. आम्हीही राज्या[जा]स पत्र लिहिले आहे. तरी पत्र राज्यास देउन तुम्ही च्यार गोष्टी त्यास सागोन जेणेकरून याचे पदरी येवज पडेल ते करणे.' ।" बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैवस्ता छ * १० माहे रविलाखर सुा इसने सितेन
[८ नवंबर १७६१]

---

लेखांक [२२५] श्री * सवत् १८१८ मार्गशिर्ष वद्य १२
[२२ दिसंबर १७६१]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजी सुत जनकोजी सींदे नीरतर

सिक्का थोडा फाटला आहे.

राजश्री लालाजी बलाळ कमाविसदार पा पाटण यासि.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दंडवत सुरसन

---

कागदोपत्रीं पुराचाही पुढें येऊ पहात आहे 'हिंदुस्थानची मसलत बिघडली श्रीमताचे शरीरीं समाधान नाही यामुळे प्रवृत्त विलक्षण झाली पवाराचे महाल जप्त केले उजनीस शिंद्याकडील येवज नक्त कापड व जवाहीर घेतले हुजुरी द्रव्यसाधना न झाली प्रयत्न करावयाचा तितका करून पाहिला सुभेदार याजकडील महाल देशचे जप्त केले श्रीमंत सिरोंजेहून माघारे फिरल्यावर पूर्वलोभास अतर केले चाकरानी सेवा करावयास अतर केले नाही जे लढाईत होते त्यानी निवेदन केले असेल मोडल्या झुंजाची [आम्ही] शिफारस कशास ल्याहावीं। शिंदे पवार पूर्वींपासून चाकर साहेबकामावर [आले] त्याच्या या गती। आज पावेतो सेवा केली त्याचे फळ हे। पुढें केलिया कळतच आहे। [पारसनीसकृत ऐश्वर्या पान २ ते ५] मल्हारजी होळकर व नारोशंकर राजेबहादुराचे वरील वर्णनोद्धाराविषयीं पवाराच्या मोकळीकेचें हे दुसरे प्रत्यक्ष प्रमाण पहावयास मिळते 'रत्न प्रावरण सिवाय शिंद्याच्या जप्तीचा स्पष्ट उल्लेख अद्याप सापडत नाही 'तुकोजी शिंदे याचा भाऊ महादजी शिंदे आउंधकर याचे नावे सरदारी करावी रामचंद्र गणेश [कानडे ?] दादासाहेबापाशी होते त्यास दिवाणगिरी सांगावी ऐसे घटत आहे' असा ओझरता उल्लेख आला आहे [राजवाडे खड १ लेखाक २९२] त्यापेक्षां किंचित् अधिक स्पष्टीकरण शकावली ध्वनित करते [पान ८] परतु गुलगुले संग्रहातून मात्र पुष्टी मिळत नाही इतकेच नव्हें तर उलट पुरावा पहावयास येतो. तो असा कीं साबाजी शिंदे ग्वाल्हेर शोपूर कडील बंदोबस्त करीत होता तर खानाजी जाधवराव कोटा बूंदी कडील व्यवस्था लावीत होता त्यावरून उत्तर हिंदुस्थानातील जप्तीची पाळी आली नसावी असे अनुमान निघूं शकते दक्षिणेतील महालाची गत काही वेगळी झाली असेल तर असो

इसने सितेन मया आलफ. पा मारी धर्मार्थ ब्राम्हणास उदक धरती व रोजीना पूर्वी पासून सरकार तर्फेने सालाबाद चालत आले आसेल. या [त्या] प्रमाणे सनदपत्रे मनास आणून सुदामत सरकार आमलात चालत आसेल त्याप्रमाणे चालवणे. जाणिजे. छ * २४ ।' जमादिलॊवल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

वार

---

लेखाक [२२६] श्री केशव * संवत् १८१८ पौष शुद्ध २

[ २८ दिसंबर १७६१ ]

सिका नकल

राजश्री लालाजी बलाल कमाविसदार सा कोटे गोसावी यासि

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन इसने सितेन मया अलफ. सुा समानचे साली खासा स्वारी कोटे प्रांती आली. ते समई साबाजी पाटील सिंदे याजकडील हाती तुम्हापासी ठेविला होता. त्यास तो हाती राजश्री मल्हारजी बावा होळकर व आम्ही मिळोन कोटेकर अखेराम पचोली यासी बक्षीस[२३२] दिल्हा तर हती मारनिलेस देणे. जाणिजे छ * १ जमादिलाखर. बहुत काय लिहिणे हे विनती. मोर्तब सुद. वार

---

लेखाक [२२७] श्री * सवत् १८१९ चैत्र वद्य १

[ ९ अप्रेल १७६२ ]




राजश्री लालाजी बलाल कादार सा कोटे गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दडवत सुमा

---

(२३२) हा हत्ति कोणत्या महत्त्वाच्या कामगिरीप्रीत्यर्थ बक्षीस दिला हें कळत नाही तथापि तारखेच्या मानाने पहाता असा तर्क सुचतो कीं पानिपतानंतर व 'देशीं येवनाचा विघाड झाला' असता उत्तर हिंदुस्थानात स्थिरस्थावरता करण्याचे कामीं कोटेकराच्या वतीनें या अखेराम पंचोलीने सहायता केली असावी तत्संबंधी ही त्याची संभावना केली असे दिसते.

इसने सितेन मया व अलफ. विशेष. तुम्ही चैत्र सुध [1] अष्टमीचे पत्र [ पा ]ठविले ते छ १० [1] रमजानी साइकाल × × [चार] घटिका दिवसा मुकाम सावेर[233] येथे पावली ' कितेक राजे माधोसिंग व जैनगरवाला वगैरे याजकडील वर्तमान लिहिले ते सविस्तर कळले. वरकड आम्ही फौजसहवर्तमान मुकाम मारी दोन प्रहरा आलो. उदईक येथून कूच करून उजनीस दाखल होणार तेथे येक मुकाम होईल. तदनतर दुसरे रोजी कूच करून सडे फै[ा]जेनिसी त्वरेने येतो. आठा दाहा रोजात येतो. तर्ह तुम्ही माहाराजजी कडील फौज वगैरा सरंजाम जुजाचा तयार करून राहणे. येसियास तेथे आल्यावर सर्व पारपत्य करून बंदोबस्त केला जाईल.' जाणिजे रा छ ~ १२ रमजान. ❀ अम्ही पैय दर पैई तुम्हापासी येउन लैवकर पोह्चतो. भेटी लंतर परस्परे वर्तमान कळेल. त्याप्रमाणे बंदोबस्त केला जाईल. त्या प्रांताचे वर्तमान वरचेवर लिहित जाणे.' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [२२८] श्री ⁂ सवत् १८१९ चैत्र वद्य ७-

[ १५ अप्रेल १७६२ ]




राजश्री खानाजी[234] जाधवराव सेनापतजी गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम विनंती.

---

असून तेथील गणपतीचे स्थान माळव्यात प्रसिद्ध आहे

(२३३) सावेर इंदोराहून उत्तरेस ९ कोसावर

नवल विशेष हें की

(२३४) शिंदेशाही इतिहासांत या जाधवराव सेनापतीचें नाव नवीन आहे

[ लेखांक २६२, २६७, २७१ ] राजघराण्यातील व्यक्तिप्रमाणे यानें सरकारी सिक्कामोर्तब वापरलें आहे

' बायजाबाई जाधव तेव्हा हा कोणीतरी ममतेतील आप्तेष्ट असला पाहिजे क्षीरसागर हें नांव देत नाहीं

मग बावाजी जाधवाचा देऊळगावकर बावाजी जाधव याची सून ' असा निर्देश करितो [ वंशावली ४ ]

कैलास वासी भागिर्थीबाई सिंदे हा खानाजी पुत्र कीं काय ? ' सौवती बायजाबाई जाधव सिंदखेडकर

त्याचा मेळ क्षीरसागराशीं बसतो पण गावाचें नाव याची नात ' असे एका सनदेंत ह्मटलें आहे खरें.

असली तर न कळे जुळत नाहीं कदाचित् देऊळगाव ही सिंदखेडचीच शाखा

[1] ९ अप्रेल १७६२.

[1] २ अप्रेल १७६२.

उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशलार्थ लेखन करीत जावे. यानंतर आपण पत्रे चैत्र शुद्ध १२ † ची पाठविली ती आम्हास उजेनीच्या मुकामी छ १८ ‡ रमजानी बुधवारे प्रविष्ट जाहली. वृतात तपसीले लिहिला त्याप्रमाणे साद्यं[त] कळले. 'त्यावरून सडी फौजेची निवड करून मातबरच लोकास पुढे रवाना केले आहेत. जलदीनेच आपणा जवळ येउन पोहोचतील. आम्हीही मागाहून दरकूच येत आहो. कुछेव्याने[२३५] पुनरोक्त शोकी[२३६] केली असे. त्यासी तूर्त आपण गांठ घालावयाचा विचार न करावा. पुरताच त्यासी पुढे पुढे येउ द्यावा. म्हणजे त्यास अचाणकच गाठोण नेस्तनाबूद करणे तो केला जाईल. आम्ही व सडी फौज येई तोपर्यंत त्यासी साम दाम विचारे [नादी] लाउन ध्यार रोज आपण असिले पाहिजे. उतावली सहसा केली न पाहिजे. पोख्त सामान आल्यावरी पारपत्य शत्रुचे करणे अगाध नसे. वरचेवरी वृतांत लिहित असिले पाहिजे.' रा छ * १९ रमजान. ‡ बहुत काये लिहिणे हे विनंती

मोर्तब सुद

---

लेखांक [२२९] श्री * संवत् १८१९ भाद्रपद वद्य ५
[८ सितंबर १७६२]




राजश्री लालाजी बलाल गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुरसन सलास सितेन मया व अलफ. पा॥ मजकूरची मामलत पेशजीपासोन तुम्हाकडे आहे. हाली साल मजकूरी कमाविस सरकार हिसाची सांगितली आसे. तरी इमाने इतबारे सेवा

---

(२३५) जयपूरचे राजे माधोसिंग जातीचे कछवाय रजपूत असल्यामुळें त्यांना उद्देशून हें विशेषण विशेषणाम् योजिलें आहे

(२३६) मूळ फारसी शब्द 'शोखी' असा असून त्याचा अर्थ उद्धटपणा, उद्दामपणा असा आहे.

† ५ अप्रेल १७६२ ‡ १४ अप्रेल १७६२.

करून आपले उर्जित करून घेणे. जाणिजे छ * १९ माहे सफर. ॥ बहुत काये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार

लेखांक [२३०] श्री * संवत् १८१९ आश्विन शुद्ध ३
[ २० सितंबर १७६२ ]

श्री जोति स्वरूप चरणि त त्पर जयाजी सुत जनकोजी सींदे नीरंतर

राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे दंडवत सुहूरसन सलास सितेन मया अलफ. राजश्री मल्हारजी बाबा होळकर देशास श्रीच्या[२३७] दर्शनास गेले. त्यासी माधोसिंगासी व कोटेकराशी वैशमता पडली म्हणोन राजश्री खानाजी जाधव यांसी फौजसह ठेविले. त्यासी कोटेकरानीं करार केला की खर्चास खंडणी यैवज १,००,००० पैकी परभारे करवड पिंपळदे खातोली इंद्रगड याजकडोन रुपये २५,००० पंचेवीस देवउ. बाकी ७५,००० पचाहतर नख्त कोट्यास गेल्या [नतर] रुपये देउ त्यापैकी पंचेवीस परभारे राजश्री सुलतानजी लांबहाते दि॥ मल्हारजी होळकर त्यासी देविले रुपये २५,००० पंचविस हजार. ॥ बाकी यैवज स्वारी शाडा राजश्री खानाजी जाधव राउ मु॥ कोटे त्यात जमा भरणा वितो.

१४,२०० छ १३ जालेखर गु॥ राघो त्रिंबक ४,००० छ ३० सावान मो॥ राघोबा

४,९९३ छ १९ जोलाखर गु॥ दौलजी २,६०० मोह रमजान
१,२०० छ १ रोज गु॥ दौलजी

८,००० छ २७ जोलाखर गु॥ मारनिले १,४०० छ २८ रोज गु॥ राघोबा

२,६००

(२३७) 'श्री' म्हणजे जेजुरीचे 'श्रीखंडोबा'. होळकराचें हें कुलदैवत होय.

| | | | |
|---|---|---|---|
| १,१८० | छ १८ रजब गुा मारनिले | ४१॥= | छ २९ सवाल गुा राघोबा |
| ५,००० | छ ३० रजब गुा राघोबा | ४८५॥= | छ ४ जिल्काद गुा राघोबा |
| ९,००० | छ १० साबान मुा कोटे | ५०० | छ ९ जिलकाद गुा सदाशिवपंत |
| | गुा मजकूर | | चिठी |
| ४२,३७३ | | ७,६२७ | |

५०,०००

सदरहू पंनास हजार रुपये जमा पोते आसेत. संस्थान मजकूरचे स्वारीचे खंडणीपैकी मजरा येंतील. जाणिजे छ ॰ १ माहे रावल. सुा [१] मजकूर. १' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

बार

---

लेखांक [२३१] श्री * संवत् १८१९ आश्विन शुद्ध १०
[ २७ सितंबर १७६२ ]




राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार पो पाटण केशवराईजीचे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो जनकोजी सिंदे रामराम सुमा सलास सितेन मया व अलफ. तुम्हास नेमणून सालीना वेतन रुपये

१,००० कमाविस साल मजकूरापासून सागितली वेतन सालीना.

४०० पो मजकूरची फडनीसी पेशजीपासोन तुम्हाकडे करार आहे तेणेप्रमाणे वेतन सालीना पेशजी आनवये.

१,४००

येणेप्रमाणे येक हचार च्यारसे रुपये ✓ सालीना नेमणूक करून दिल्ही आसे. सदरहू

यैबज पा मजकूरी उगउन घेणे. हिसेवी मजरा असेत. जाणिजे रा छ * ८ माहे रोवल. ||" वहुत काय लिहिणे हे विनंती.




वार

---

लेखांक [२३२] श्री * संमत् १८१९ आश्विन शुद्ध ११

[ २८ सितंबर १७६२ ]




राजश्री लालाजी वलाल
कमाविसदार पाटण श्री केशराईजीचे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुमा सलास सितेन मया व अलफ. पो॥ मजकूरी समाईक तिन्ही हिसे सिवदी वगैरे खर्च नेमणूक सालीना. रुपये.

१३,१४० स्वार आसामी ७५

२५ मारनुलेकडील राउत आसामी पचवीस

२५ चिमणाजी गोविंद.

२५ त्र्यंबकराव सिवदेव.

७५

आसामी पाऊणशे तैनात सालीना दर आसामीस रुपये १७५ प्रमाणे येकूण रुपये निवळ

२०,२०० सिवंदी वरकदाज आसामी सुमार ६०० तैनात.

८,८०० गढी कसबे मजकूरी त्यासी आसामी २०० तैनात दर आसामीस दरमाह रुपये ४ प्रमाणे. चाकरी नेहमी बारमाही तलब आकार रु. माही येकूण

४,९५० ठाणी गावगंना यासी आसामी १५० दरमा[हा] दर आसामीस

तैनाती रु. ३ प्रमाणे दरमा[हा] यो रुपये ४९० प्रो बारमाही चाकरी तलब आकर माही यो रुपये.

१,६५० तहसीलेस प्यादे आसामी ५० तैनात दर आसामीस दरमा[हा] रुपये ३ प्रमाणे दरमा[हा] रुपये १५० नेहमी चाकरी बारमाही तैनात आकार माही येकूण रु.

४८०० शाहणे[२३८] गावगंना माल रखवाटीस आसामी २०० तैनात दर आसामीस रु. ३ प्रमाणे दरमा [हा] रु. ६०० प्रमाणे आठमाही रु.

२०,२००

१,००० भोजन खर्च समाइक येकंदर सालीना रु.

३४,३४०

श्री केशाराईजीचा खर्च पेशजीपासोन चालत आला आहे त्या प्रमाणे करार असे व रोजिनदार ब्राम्हण सुदामतप्रमाणे व लंगर वगैरे

३४,३४०

येणेप्रमाणें चवतीस हजार तीनसे चाळीस रुपये सालीना समाइक नेमणून करून दिल्ही आसे व याज खेरीज श्रीजीचा खर्च वर्षसनावरहुकूम करार आसे. पो मजकूरी समाइक झडतीस खर्च लिहिणे. हिंसेबी मजुरा पडतील. ठाण्याची बंदोबस्त उत्तम करीत जाणे. जाणिजे रा छ * ९ माहे रावल. गढी व ठाण्यांत दारू गोळी प्रंसगानुरूप लागेल ते कार्या कारण खर्च करणे. मजुरा पडतील. जाणिजे छ मजकूर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

(२३८) शाहणे मूळ शब्द 'सेहेना' असा असून त्याचा अर्थ टेहळणी करणारा, चौकीदार असा आहे.

लेखांक [२३३]

श्री

संमत् १८१९ मार्गशीर्ष शुद्ध ३
[१८ नवंबर १७६२]




राजश्री आखेरामजी [पचोली] गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन सलास सितेन मया व आल्फ. देणे 'हुजूर पागा' वगैरे किरकोळ व तोफखान्याकडे ताा राजश्री आपाजीराम[२३९] पागेनीस याजकडे खर्चाबद्दल तुम्हाकडोन यैवज देविला येणेप्रमाणे बीा

रुपये.

१०,००० उसणवारी कर्जाउ यैवज तुम्हाकडे येणे दाहा हजार.
९,६८२ बूंदी संस्थान येथील खंडणीचा करार आहे त्यायैवजी.

१९,६८२

येणेप्रमाणे एकोणीस हजार सासे ब्यासी रुपये तुम्हाकडो[न] देविले आसे. तरी रु॥ सदरहू रुपये मारनुलेच्या पदरी येकुणीस हजार सासे ब्यासी रुपये घालोन पावल्याचे कबज घेणे. जाणिजे राा छ * १ माहे जौवल. ॥ बहुत काये लिहिणे हे विनंती.




लेखांक [२३४]

श्री

* संवद् १८१९ मार्गशीर्ष शुद्ध ४
[१९ नवंबर १७६२]




सिक्का दुर्वाच्य आहे

राजश्री लालाजी बलाळ कामदार प्राा पाटण केशोरायाचे यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे दंडवत सुर-

(२३९) आपाजीराम शिंदेशाहींत पागनीस होता असें तर उघड आहे. पण त्याचें आडनाव 'पागे' कीं 'दाभोळकर' हे गूढ उलगडत नाहीं दोनी नांवें मात्र सांपडतात एवढी गोष्ट निर्विवाद आहे. हा आपाजीराम बहुधा 'पागेच' असावा असें वाटतें. कारण कीं 'आपाजीराम, राघोराम [पागे] यांचे बंधु' असा एक विश्वसनीय शोध लागतो [२८ दिसेंबर १७९४] दुसरें राघोराम

सन सलास सितेन मया अलफ. सरकारात सरंजाम पाहिजे म्हणोन मकाजी चव्हान व सुजनाजी गुजाल येसे पाठविले आहेत. त्यासी जिनस बितपसील खरीद करून मारनिलेस देणे.

५०० खादिया सनगे थान.
१०० नालमेख रुपये शंभराचे बाजार निरख कडून [लाउन] खरीद करणे.

---

[५००] १००

सदरहू पांचसे खाचा लांब रुद घट व नालमेख चागली रूपये शांभराची येसे खरीद करून मारनिलेस पाटणीहून अथवा कोव्यातून घेउन देणे आणि कबज घेणे. जाणिजे छ ~ २ माहे जौवल. बहुत काये लिहिणे ! हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

लेखांक [२३५] श्री * संवत् १८१९ माघ शुद्ध ७
[२१ जनवरी १७६३]




राजश्री लालाजी बलाल व चिमणाजी गोविंद
कमाविसदार पो पाटण गोा

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेो जनकोजी सिंदे रामराम सुहूर-सन सलास सितेन मया व अलफ. पो मजकूरी रखवालीस पागा सरकारच्या पाठविल्या आहेत. यासी रोजमरा चंदी येणेप्रमाणे देणे.

२५७ रोजमरा इा छ २६ जाखर ता छ २० रजबपरियेत देणे.
६७ पागा सुजनाजी घुले.
९० पागा खंडोजी कोल्थे[ल्हे][२४०].

---

पारयाच्या वंशात यांचे अंग असल्यामुळें त्याजकडील पागनिसी जाऊन ती बाळाजी अनंत पिंगे यास मिळाली व पुढें ती त्या घराण्याकडेच स्थिरावली भारतेतिहास मंडळ त्रैमासिक वर्ष ९ अंक २ लेखांक १२ तील 'आपाजीराम दाभोळकरांशीं' देखील यांचे सूत्र जाऊन मिळूं शकते पण त्यावरोबर राघोरामाचें 'पागे' हे अडनाव नसून पदवी होती आणि मूळ उपनाम 'दाभोळकर' होतें असें गृहीत धरावें लागेल. उपनामाचा लोप होऊन असली पदानुगामी अनेक नावें प्रचार पावलीं आहेत. अस्तु. प्रत्यक्ष पुरावा पुढें येईपर्यंत या तर्कवितर्कांचें वाऱ्यावर वाहून जाण्याचें कारण नाहीं

(२४०) हा शिंदेशाहींतील एक शिलेदार असून त्याचेकडे स्वतंत्र पागा होती लष्करात 'कोल्ह्याची पागा' म्हणून जी जागा आहे तिला नाव पडण्याचें कारण हेच होत.

६२ पागा हैबतराव गुंजाल.

३८ [पागा] विठोजी गव्हाणे.

---

२५७

८३॥।२ चंदी शा छ २८ जाखरपासोन देत जाणे. दररोजी चंदी केली बरूले मण चौसेरी मापे.

८१८१ सजनाजी घुले.

८१।१॥ खंडोजी कोलथे[ल्हे]

८॥१ हैबतराव गुंजाल.

८॥१॥ विठाजी गव्हाणे.

---

८३॥।२

तेल सजणाजी घुले यासि दररोज छ २८ जाखरपासोन वजनी ८८।९ दीड पाव देणे.

ऱ्हे येणेप्रमाणे रोजमरा चोवीस रोजा दोनसे सतावन रुपये व चदी दररोज केली बरूले मण चौसेरी मापे तीन मण अकरा पाइली देत जाणे. पो मजकूरच्या समाइक पैवजी खर्च लिहिणे. हिसेबी मजुरा पडतील. जाणिजे रा छ * ६ माहे रजब. बहुत काय लिहिण हे विनती.

मोर्तब सुद

---

लेखांक [२३६] श्री * संवत् १८१९ माघ शुद्ध ८
[२२ जनवरी १७६३]




राजश्री लालाजी बलाल व चिमणाजी गोविंद
कमाविसदार पो पाटण प्रात बूंदी गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन सलास सितेन मया व अलफ. पो मजकूरी रखवालीस स्वार पागेचे पाठविले तेथे पेंढारी व

[ त्यासी ] कहीवर[२४१] ताकीद करता लडाई जाली. ते रामई जखमी लोक जाले. त्यासी खर्चाबद्दल देविले येणेप्रमाणे रुपये.

१० पागा सजणाजी घुले.

३ शंकराजी घुले याच्या तोंडावर धोंडा लागला सबब

४ नगारच्यास भाला मानेस लागला सबब.

३ सकोजी सावळे हातात भाला लागला सबब.

१०

५ पागा हैवतराव गुंजाल याजकडील भला माणस तरवार हतास उजव्या लागली सबब.

१५

येणेप्रमाणे पंधरा रुपये तुम्हाकडोन पा मजकूर यैवजी देविले असेत. तर सदरहू रुपये मारनुलेच्या पदरी पंधरा रुपये घालोन पावल्याचे कबज घेणे. समाइक यैवजी खर्च लिहिणे. हिसेवी मुजरा आसेत. जाणिजे रा छ ७ माहे रजब. बहुत काये लिहिणे ॥ हे विनंती.

मोर्तब सुद

लेखांक [२३७] श्री संवत् १८१९ फाल्गुण शुद्ध १

[ १३ फरवरी १७६३ ]




राजेश्री लालाजी बलाळ कमाविसदार पो पाटण गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन सलास सितेन मया व आलफ. हरीसिंग गारदी[२४२] याजकडील माणसे शेडग्याच्या[२४३] जुंझात

(२४१) कही म्हणजे दाणा, वैरण आणणारी लष्करी तुकडी [ फार्शीकोश ३१ ]

(२४२) गारदी म्हणजे कवाईत शिकलेला शिपाई या वेळी शिंदेशाहींत त्या प्रकारचें सैन्य थोडे का होईना पण होते असें अनुमान ओघानेंच करावें लागते त्याचा विस्तार पुढें कळेल

(२४३) कहीवर जे रखवालीस स्वार गेले होते त्याचा पुढारी किंवा नेता शेडगे किंवा सेंडगे अडनावाचा मराठा असला पाहिजे.

मोजे हिंगोणे[२४४] प्रो लाखेरी[२४५] येथे जाले. ते समई जखमी जाले. त्याजला पाटणी ठेविले. त्यास खर्चाबदल रुपये ३०० तीनसे तुम्हाकडोन पा मजकूरच्या पैवजी देविले असेत. तरी सदरहू तीनसे रुपये गारद्याच्या पदरी घालोन पावल्याचे कबज घेणे. जाणिजे रा छ * २९ माहे ~ रजब. बहुत काये लिहिणे ?" हे विनंती.



बार

पैवस्ता छ ८ माहे साबान.

मिती फाल्गुण सुद ९ संवत १८१९

[ २२ फरवरी १७६३ ]

---

लेखांक [२३८] श्री * संवत् १८२० भाद्रपद शुद्ध ३

[ १० सितंबर १७६३ ]

नकल

राजेश्री लालाजी बलाल कमाविसदार पा पाटण गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूर सन अर्बा सितेन मया अलफ. देणे गुलराज व नंदराम वकील दिमत शाहा अबदालीचे श्रीमंत राजश्री दादासाहेबानी देविले वितपसील.

२,५०० वकील गुलराज रु[प]ये १२,००० पैकी बुंदीवर वरात रु[प]ये १०,५०० बाकी तुम्हाकडून दविले.

१,००० कापड शाहा बा रुपये.

---

(२४४) हिंगोणें हे गांव नकाशांत मिळत नाहीं. पण ते बहुधा मेज नदीच्या उत्तरतीरीं असलें पाहिजे

(२४५) शिंद्यांच्या व होळकराच्या सैन्यात परस्पर वितुष्ट वाढून ज्या जागेवर उभयतात युद्ध झालें ती ही लाखेरी इतिहासभक्तांच्या परिचयाची आहेच हल्लीं ती बूंदी राज्यात मोडते.

२,००० हती शाहावली खान रुपय[२४६] रुपये ३,५०० पैकी परभारे खाचरोद उजन
५०० रुपये येकूण रुपये १,५०० बाकी रुपये दोन हजार.

---

५,५००

येणेप्रमाणे पाच हजार पांचसे रुपये तुम्हावर साल मजकूरचे पा मजकूरपैकी देविले असेत. त्यास पा मजकूरच्या यैवजी यैवज सत्वर यासी देउन पावल्याचे कब्रज घेणे. जाणिजे रा छ * २ मोहे रविलौवल. बहुत काय लिहिणे हे विनती.

---

लेखांक [२३९] श्री * संवत् १८२० भाद्रपद वद्य ११
[ ३ अक्टुबर १७६३ ]




राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार पा पाटण गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन आर्बा सितेन मया व अलफ. पा मजकूरची मामलत तुम्हाकडोन दूर[२४७] करून साल मजकूर पासून राजश्री अनंदराउ रुद्र याजकडे सांगितली असे. तरी तुम्ही अमल दखल न करणे आणि साल मजकूरी पो मजकूरचा वसूल तुम्ही घेतला असेल तो मारनिलेकडे देणे. जाणिजे रा छ २५ माहे रविलावल. आणि खर्च नेमणूकेपैकी मजरा घेणे. जाणिजे छ मार. बहुत काये लिा हे विनंती.




बार

---

पैा छ ७ माहे रविलाखर.
मिती अस्विन सुद्य ९ मंदवार.
[ १५ अक्टुबर १७६३ ]

---

(२४६) हा अहमदशाहा अबदालीचा वजीर होता [बखर १४६ राजवाडे खंड १ लेखांक २४६] त्याच संबंधी दुसरे सिक्केमोर्तबी पत्र आहे ते येथें दिलें नाहीं.

(२४७) या वेळीं कोणत्या विशेष कारणामुळें लालाजी गुलगुले याजवर रोष होऊन ही त्याजकडील कमाबीस दूर झाली होती हे तूर्त सांगता येत नाहीं तथापि ती सत्वरच परत मिळाली. [लेखांक २४०]

लेखांक [२४०]        श्री        * संवत् १८२१ आषाढ वद्य ९
[२२ जुलै १७६४]




राजश्री लालाजी वलाल प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुरसन खमस सितेन मया व अलफ. पा॥ मजकूर येथील मामलेत राजश्री आनदराव रुद्र याज कडून दूर करून साल मारी तुम्हास कमाविस सांगितली असे. तर इमाने इतबारे स्वामी सेवा करून माहाली वसूल होईल त्यापैकी नेमणूकेप्रमाणे माहाल मजकूरचा खर्च घेउन बाकी यैवज सरकारात पावता करणे. माहाली आमची तिसरी तकशीम आहे. जो अकार कच्चा पा॥ मारी होईल त्यापौ॥ हिसेरसीद तुम्ही यैवज घेऊन सरकारात पावता करणे. जाणिजे छ * २२ मोहरम. बहुत काय लिहिणे हे विनती.




बार

---

श्री        * संवत् १८२१ आषाढ वद्य १२
[२५ जुलै १७६४]

लेखांक [२४१]




राजश्री लालाजी वलाल कमाविसदार
प्रा॥ पाटण केशवरायाचे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ जनकोजी सिंदे रामराम सुहूर-सन खमस सितेन मया व अलफ. तुम्हास नेमणूक सालीना वेतन रुपये.

रु.

१,००० कमाविस साल मजकूरापासून सांगितली वेतन

४०० प्रा॥ मारची फडनीसी पेशजीपासोन तुम्हाकडे करार आहे. तेणे प्रा॥ वेतन

पेशजीप्रमाणे रुपये.

१,४००

येणेप्रमाणे येक हजार च्यारेसे रुपये सालीना नेमणूक करून दिल्ही आसे. सदरहू यैवज प्रा मारी उगउन घेणे. झडतीस खर्च लिहिणे. मजुरा आसे. पहिली सनद हरवली सवब दुसरियाने करून दिल्ही. सदरहूप्रमाणे खर्च लिहिणे. जाणिजे छ . २५ मोहरम. ।' वहुत काये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

वार

---

लेखाक [२४२] श्रीरामजी सवत् १८२१ मार्गशीर्ष शुद्ध ४

[२८ नवंबर १७६४]

नकल

卍 सीधश्री सर्वोपमा विराजमान महाराज महारावजी श्री छत्रसालजी जोग. लिखतं राजश्री जनकूजी सींदे केन जश्री जीकी वंचजो. अठाका समाचार श्री जीकी कृपासे भला छे. आपका समाचार भला चाहीजे. अपरंच. गोपालराम व्यासजीकी मारफत र[ह]वारीकी पाससे सरेकार मे खरीदे उट नफर २५ पचीस लिये है तिसके रु. ३,६२० छतीससे बीस सरकारकी वाकी तुम्हारे तरफ हे. तिसमे सदरहू रु. व्यास जीकी मारफत र[ह]वारीकू पोहचाई कबज लेणा. सरकारकी वाकीमे मजरे आवेगे. जाणिजे छ ॰ ३ जाखर सुाा खमस सितेन मया व अलफ. मिती अगन सुद ७ संवत् १८२२. मुकाम मुगावली[२४८]. मोर्तब सुद.

वार

---

(२४८) ही मुगावली कोणती ? हे निश्चित ठरवितां येत नाही पण या नावाचे गाव इसागड [शिंदेशाही] जिल्यांत बिन्याहून पश्चिमेस ७ कोसांवर आहे.

लेखांक [२४३] श्री संवत् १८२२ वैशाख शुद्ध ५
[२५ अप्रेल १७६५]
असल बरहुकूम नकल

सिका

राजश्री लालाजी बल्लाल कमाविसदार पा। पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ जनकोजी सिंदे रामराम सुरसन खमस सितेन मया अल्फ. राजश्री बाळाराव[२४९] गोविंद यासी पा। मजकूरची बक्षगिरीची आसामी साल मजकूरी करार करून दिल्ही असे. यासी सालीना वेतन रुपये ३५० साडे तीनसे केले असेत. तर पा। मजकूरचे बक्षगिरीचे कामकाज मशारनिलेच्या हाते घेउन सालदरसाल वेतन रुपये साडे तीनसे पाववीत जाणे. हिसेबी मुजरा असेत. वेतनासिवाये भेट गांवगन्ना परभारे फडनीसाप्रमाणे देवीत जाणे. जाणिजे छ ४ जिलकाद. बहुत काये लिहिणे हे विनंती. मोर्तब सुद.

बार

---

लेखांक [२४४] श्री सवत् १८२२ वैशाख शुद्ध १०
[३० अप्रेल १७६५]
नकल

राजश्री लालाजी बल्लाल
कमाविसदार प्रा। पाटण प्रांत बूंदी गोसावि यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ जनकोजी सिंदे रामराम सुरसन खमस सितेन मया आल्फ. प्रा। मजकूर येथे पेशजीपासोन आसाम्या आहेत येणेप्रमाणे त्यास वेतने समाइक यैवजपैकी रुपये.

---

(२४९) हा बाळाराव गोविंद [बक्षी] पुढें फार मोठा मुत्सद्दी म्हणून प्रतिष्ठा पावला. त्याने महादजी शिंद्यांची दिवाणगिरी पण केली. याला-'रावजी' या संक्षिप्त नावानेंही-पुढें संबोधिलें आहे.

७०० गणेश दादाजी हली पुत्र आनंदराउ गणेश.
८०० विसाजीराम मजमदार.

---

१,५००

येकुण पंधरासे रुपये समाइक यैवज पौ दरसाल देत जाणे. पूर्वीपासून समाइक यैवजी सदरहू वेतनाचे रुपये पावतात त्याप्रमाणे हलीही पावते करीत जाणे. जाणिजे छ * ९ माहे जिलकाद. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२४५] श्री * संवत १८२२ आषाढ वद्य ७
[९ जुलै १७६५]

राजश्री लालाजी बलाळ कमाविसदार संस्थान कोटे गोसावी यांसि

स्नो जनकोजी सिंदे दंडवत सुा सित सितेन मया व अलफ. देणे सिवराम मोरेश्वर कारकून उमेदवार[२५०] रो दोन येकुण रुा ६० तुम्हाकडून देविले असे. तर संस्थान मारच्या यैवजी मारनिलेस साठ रुपये करून कबज घेणे. जाणिजे छ * २० मोहरम. हे विनंती. (मोर्तब सुद)

वार

---

(२५०) उमेदवार कोणत्याही खात्यात नोकरी मिळण्याच्या आशेवर [ विनपगारी ] काम करणारा हा अर्थ सर्वश्रुत आहेच पण पानिपतोत्तर काळी याचा उपयोग विशिष्टार्थी केलेला दिसतो राजकीय पत्रव्यवहार करणारासच हें नांव मराठी पत्रव्यवहारात लाविलेलें आहे ' × कारकून उमेदवार होळकराचे लष्करात वकीली कामावर असतात [ ७ मे १८०० ] × कारकून उमेदवार इंग्रजाकडील वकील मेजर मिलकिन [ Malcolm ] याजपाशी जावसालाचे कामकाजास आहेत त्यास रोजमुरा [ १७ फरवरी १८०४ ] × कारकून उमेदवार पातशाही लिहिण्याचे कामावर होते त्यास वेतन [ ४ फरवरी १८०६ ] × कारकून उमेदवार होळकराकडे वकीलीचे कामावर पाठविलें त्यास रोजमुरेबदल [ १४ जनवरी १८०९ ] वरील वेच्यावरुन अलीकडील ' Political Attache ' चा भावार्थ रुढ झाला होता असें स्पष्ट होतें तसेंच उमेदवारी विनपगारी नसे हें वेगळे सांगावयास नको आणि त्याच अर्थी येथें हा प्रयोग आलेला आहे [ लेखांक २४६, २५२ ]

लेखांक [२४६] श्री * संवत् १८२२ आषाढ वद्य ७

[९ जुलै १७६५]

राजश्री लालजी बलाळ

कमाविसदार संस्थान कोटे गोसावी यांसी.

स्नो जनकोजी सिंदे दडवत सुहूरसन सित सितेन मया व अलफ. देणे विठलराव देशमुख श्रीगोंदेकर कारकून उमेदवार याजला रोजमुरे दोन येकुण रुपये ३१० येकुण तीनसे दाहा तुम्हाकडून देविले असेत. तर सदरहू तीनसे दहा रुपये संस्थान मारच्या येवजी मारनिलेस पावते करून कबज घेणे. तीनसे दाहा पावते करणे. जाणिजे छ २० मोहरम. हे विनती.

मोर्तब सुद

वार

---

लेखांक [२४७] श्री * संवत् १८२३ श्रावण शुद्ध

[२० जुलै १७६५]




राजश्री लालजी बलाल

कमाविसदार प्रा पाटण केशवरायाचे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा सित सितेन मया व आलफ. तुम्हास नेमणूक सालीना वेतन बारमाही येकुण रुपये.

| | | |
|---|---|---|
| | | रुपये |
| १,००० | कमाबिसदार वेतन पेशजी गुदस्ता प्रा | रुपये |
| ४०० | प्रा मारची फडनीसी पेशजीपासून तुम्हाकडे आहे. वेतन पूर्ववत प्रा | रुपये |
| ३५० | बालाजी गोविंद बक्षीगिरी | रुपये |
| २५० | बाबूराव गुणाजी कारकून पेशजी प्रा | |

---

२,०००

येणे प्रा दोन हजार रुपये सालीना नेमणूक करून दिल्ही असे. सदरहू यैवज उगउन घेउन झडतीस खर्च लिहिणे. मजरा पडतील. जाणिजे छ * १ माहे सफर. ॥' वहुत काये लिहिणे हे विनती.

मोर्तब सुद

बार

---

लेखांक [२४८] श्री * संवत् १८२२ श्रावण शुद्ध २

[ २० जुलै १७६५ ]




राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार प्रा पाटण केशोरायाचे गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुरसन सित सितेन मया व अल्फ. प्रा मार येथील मामलत पेशजीपासून तुम्हाकडे आहे. त्याप्रमाणे हली साल मजकूरी कमाविस आमच्या हिशाची तुम्हास सागितली आहे. तर इमाने इतवारे सेवा करून आपले उर्जित करून घेणे. माहाली वसूल होईल त्या पैा नेमणूकी प्रा महाल मजकूर खर्च घेउन बाकी यैवज सरकारात पात्रता करणे. महाली आमची तिसरी तकशीम आहे. जो आकार कचा होईल त्या ⅓ प्रा हिसेरसीद तुम्ही यैवज घेउन सरकारात पात्रता करणे. जाणिजे छ * १ माहे सफर. ॥' वहुत काये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

लेखांक [२४९]     श्री     * संवत् १८२२ श्रावण शुद्ध १

[ २२ जुलै १७६५ ]




राजश्री लालजी बलाल कामदार सस्थान कोटे गोसावी यांसी.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो     जनकोजी सिंदे रामराम सुा सित सितेन मया व आलफ. देणे राजश्री आचुतराउ[251] गणेश याणी खासगत घोडा १ वौ रो निल्यानंद भटजी [कोटेकर] याजपासून घेतला. त्याची कीमत रुा २,०००[252] तुम्हाकडून देविले आहेत. तरी सस्थान मार येथील खंडणीचे ऐवजी भटजी मार यास दोन हजार रुा देउन कबज घेणे. जाणिजे छ * ३ माहे सफर. /' बहुत काय लिहिणे हे विंनंती.




बार

---

(२५१) रामचंद्र गणेश याची योजना काहीं कारणामुळें तात्काळ होऊं पावली नाहीं व पुढें केली असता ती शिंद्यांस कितपत रुचेल याचा विचार होऊन नारोशंकराची [नामधारी] मुतालकी ठेवून त्याचे मतीनें या अच्युतराव गणेशाची स्थापना झाली नारोशंकर राजेबहादूर यास स्वत मुतालकीची लालसा नसून कांहीं खास कारणास्तव ही गोष्ट त्यानीं स्वीकारली असावी असें वाटतें याबद्दल पुढें योग्य स्थलीं विचार केला जाईल.

(२५२) तत्कालीन मुत्सद्दी लोकास घोड्याची किती आवड होती व ते त्याकरिता किती पैसा खर्च करीत असत याची बरीच कल्पना या पत्रावरुन करिता येते बाळाजी गुलगुले याच्या वेळे पासून कोटा हें शिंदेशाहीस लागणाऱ्या घोड्याचें केंद्रच झाल्यासारखें होतें स्वयं शिंद्यासाठीं तर तेथून घोडे येतच असत [ लेखाक २, ४, ५६ ] पण सरदार, मुत्सद्दी याची घोडेखरेदीदेखील तेथेंच होऊं लागली व ती इतकी कीं, महादजी शिंद्यानी आपल्यासाठीं एक स्वतंत्र चाबुकस्वार ठेवून सैन्याकरिता घोडे तेथून मागविण्याचा प्रबंध करावा लागला होता; ह्या संबंधानें पुढें ओघानेंच स्पष्टता होणार आहे.

लेखांक [२५०] श्री * संवत १८२२ श्रावण वद्य ११.

[ १२ अगष्ट १७६५ ]




राजश्री लाळाजी वलाल कादार प्रा पाटण गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुहूरसन सित सितेन मया व आलफ. देणे कारकून वेतन समाइक

८०० विसाजीराम[२५३] मजमदार

७०० अनंदराव गणेश [?]

१,५००

येणेप्रमाणे पंधरासे रुपये पूर्वीपासून चालत आहेत. त्याप्रमाणे करार केले असेत. तर साल्दरसाल समाइक तीन वाटणीत पावत आहे त्याप्रमाणे देणे. दुसाला रुपये.

१,५०० सन खमस साल गुदस्ता.

१,५०० सन सित

३,०००

तीन हजार रुपये सन मजकूरी समाइक यैवजी देणे. पुढे दरसाल पधरासे रुपये समाइक तीन वाटणीत पावते करीत जाणे. जाणिजे छ * २४ सफर. ~~ ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




बार

(२५३) ' विसाजी त्रिंबक, विसाजीराम व विसाजी रामचंद्र ' ह्या नावाच्या तीन व्यक्तींपैकी हा विसाजीराम मजमदार कोणता हें निश्चयात्मक सांगतां येत नाही.

लेखांक [२५१]    श्री    * संवत् १८२२ फाल्गुन वद्य ९
[ ५ मार्च १७६६ ]




राजश्री लालाजी बल्लाल
कमाविसदार सस्थान कोटे व पा पाटण गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो     जनकोजी सिंदे रामराम सुहूरसन सित सितेन मया व अलफ. देणे राजश्री बाळाजी[२५४] गोविंद वकील यास     रुपये.

५०० श्रीमंतानी देविले ते वरात पेशव्याची रुपये.

५०० आर्जवान्न[२५५]

---

१,००० 

येक हजार रुपये तुम्हाकडून देविले आहेत. तर मशारनिलेस दाहासे रुपये हर येक ऐवजी पावते करून कबज घेणे. जाणिजे छ * २१ रमजान. बहुत काय लिहिणे हे विनति.




बार

---

लेखांक [२५२]    श्री    * संवत १८२३ अधिक चैत्र वद्य ४
[ ३० मार्च १७६६ ]
नकल यथाप्रत

राजश्री लालाजी बलाल कमाविसदार सस्थान कोटे गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो     जनकोजी सिंदे दडवत सुमा सित

---

(२५४) बाळाजी गोविंद या नांवाच्या अनेक व्यक्ति असून त्यापैकीं एकाचीं वरींच पत्रे संग्रहीं आहेत पण तूर्त ही व्यक्ति अमुकच असावी असें निश्चयात्मक सांगता येत नाही पुढे योग्य स्थळीं याचा आपोआप उलगडा होईल.

(२५५) आर्जवाब म्हणजे भेट, नजर, मदत, इनाम या पर्यायें नैमित्तिक देणगी असा अर्थ होतो.

सितेन मया व अलफ. देणे पागा पथके यासी अर्जबाब | रुपये
६,००० पा राघो हरी [?]
४,००० पा: विसाजीराम.

१०,०००

यकुन दाहा हजार रूपये तुम्हाकडून देविले असेत. तर साल मजकूरच्या घांस दाण्याचे यैवजी सदरहू रूपये मारनिलेस पावते करून कब्ज घेणे. जाणिजे छ १८ माहे सवाल. [?] बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२५३] श्री * संवत १८२२ अधिक चैत्र शुद्ध १४
[ २५ मार्च १७६६ ]




राजश्री लाल्जी बलाल कामदार सस्थान कोटे गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो जनकोजी सिंदे रामराम सुा सित सितेन मया व अलफ. तुम्हाकडून यैवज आला वितपसील | रुपये

| | | |
|---|---|---|
| २०० | अंताजी कारकून उमेदवार अर्जबाब | रुपये |
| १०० | कुमाजी गाढवे[२५६] सिलेदार हुजरात नालबंदीच्या वरातेपैकी | |
| ५६१॥ | कापड आले त्याज बा | रुपये. |

---

(२५६) कुमाजी गाढवे हा शिंदेशाहीत शिलेदार होता हें तर या पत्रावरुन कळते इतकेच नव्हे तर 'हुजूरात' पैकीं असल्यामुळें तो साधारण शिलेदार नसावा असा भास होतो 'फकीरजी गाढवे' या नावाचें एक घराणें शिंदेशाहीत बरेंच प्रतिष्ठेस आलें होतें त्याचा कार्यक्षेत्रसंबंध विशेषतें करून मारवाडकराशीं राहिल्यामुळें तें तसें होणें अगदी स्वाभाविक होतें त्या ऐतिहासिक घराण्याशीं या

१५२,।।। किरकोळ जिनस बा॥ रुपये.

१,०१५४०.

येकुण येक हजार सवा पंधरा रुपये सरकारात परभाऱ्याकडे जमा असेत. संस्थान मजकूर येथील हिसेबी मजुरा दिल्हे जातील. जाणिजे छ ११ माहे सवाल. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

ऋमाजीचा कोणी संबंध होता किंवा काय हें सांगण्यास आता साधन राहिले नाही. हे घराणें निर्वंश झाल्यामुळें त्याचें कागदपत्र मिळण्याची देखील फारशी आशा वाटत नाहीं

ॐ



# श्रीमंत दत्ताजी पाटील शिंदे

## यांचा असल पत्रव्यवहार.

१८१०-१८१६ विक्रमी.

लेखांक [२५४] श्री * संवत् १८१० आश्विन शुद्ध ३

[ २९ सितंबर १७५२ ]



२५७

राजश्री नारो गोपाळ गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो दत्ताजी[२५८] सिंदे दडवत. सुमा अर्बा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाा ते पावले. तेथे प्रात कोटेकर साहारावजी याज

---

(२५७) दत्ताजी पाटील शिंद्यानी जे हें जयाजींचें ' सिकामोर्तब ' वापरले आहे त्यावरून असें दिसतें कीं शिंदे राजघराण्यातील पुरुष आपापले सिक्के मोर्तब निराळे तयार करीत नसत राज्यकर्त्या व्यक्तीचाच सिक्का उपयोगात आणीत होते किंवा प्रसंगविशेषी राजमुद्राप्रमाणे ठसे वेगळे तयार करवून वापरीत असत [ लेखांक २६३, २९५ ] हा प्रघात केवळ पुरुषापुरताच होता असें नव्हें तर राज-स्त्रियांनींसुद्धा तोच क्रम स्वीकारिला आहे [ लेखांक २६१ ]

(२५८) जयाजी आपा शिंद्याचे सहोदर धाकटे बंधु होत राणोजीचे हे द्वितीय कीं त्रितीय पुत्र यासंबंधीं अजून वाद आहे दत्ताजी द्वितीय पुत्र होते असें इतिहासकार ह्मणतात. पण क्षीरसागरानें

कडील मार व राजश्री अटवोजी राजाले याचा मार लिहिला तो तपसीले कळला. येशास आमचे लोक त्या प्रांते यावयास तयार जाले असेत. राजश्री सदाशिव गोपाळ [कमाविसदार] बुंदीकर याज बराबरी सीघ्रच रा होत आहेत. सरकारच्या पैक्याची तयारी करउन सत्वर पाठवितात म्हणून लि।. तरी उत्तम आहे. पैका जलदीने आला तर त्याचेच बरे असे. येवज सत्वर येईल ते करणे. राजश्री बाळाजी येशवंत [महायात्रेहून परत] आले[२५९] म्हणोन लि।. तरी त्यास सांगोन कोट्यास येताच हुजूर येणे म्हणून सांगणे. लौकर पाठवणे. छ* १ जिल्हेज. बहुत काय लिहिणे हे विनती.

श्री मोर्तब सुद

---

लेखांक [२५५] श्री * संवत् १८१० आश्विन शुद्ध १०

[ ७ अक्टुबर १७५३ ]

श्री जोतिलिंग चरणि तत्पर राणोजि सुत जयाजि सिंदे निरंतर

राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसि.

राजमान्य स्नेो दत्ताजी सिंदे रामराम. सुमा अर्बा खमसेन मया अलफ. तुम्ही पत्रं पाठविले ते पावले. तेथे प्रांत मजकूरचा पैका सिद्द जाहला आहे. सत्वरीच रवाना होणार असे म्हणून लिहिले ते कळले व श्री महायात्रा करून घरी आला. भेटीस येतो म्हणून लिहिले. तरी बहुत उत्तम आहे. सरकारचा पैका मातबर हुजूर येईल ते करणे. येविशी हैगै न करणे. जाणिजे छ * ९ माहे जिल्हेज. [१] बहुत काये लिहिणे हे विनती.

श्री मोर्तब सुद

---

वंशावलीत तसें काहीं म्हटलें नाहीं तो हें [ द्वितीय ] स्थान जोतिबास देतो [ वंशावली पान २ ] आणि ही कल्पना शकावलीस संमत असावी असें वाटते [ पान ३, ५ ] जोतिबाचा उल्लेख १७३४ पासून असून दत्ताजीचा १७५० सात येतो आणि तोहि जोतीबा शिंदे [ बरवासागर प्रांत ओरछे येथें ] लढाईंत पडल्याचे 'सचीम' आला आहे अर्थात् जोतीबाच्या पश्चात् दत्ताजीस प्रामुख्य आलें असावें अस्तु उभयतांच्या स्त्रिया त्याच्या पश्चात् बरींच वर्षें जिवंत होत्या. त्याचा पत्रव्यवहार जर मिळाला तर याचा निर्णय शक्य आहे

(२५९) बाळाजी यशवंत गुळगुळ्यास महायात्रेसाठी फार दिवस लागले नाहींत त्यांचें पश्चात् कोटा येथील वकीलीचें काम नारो गोपाळ करीत होते असें समजते. [ रामाजी अनंत दाभोळकर २९ सितंबर १७५३ व लेखांक २५४]

लेखांक [२५६] श्री * संवत् १८१० कार्तिक शुद्ध ८
[ ३ नवंबर १७५३ ]




राजश्री बाळाजी येशवंत प्रांत कोटे गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो दत्ताजी सिंदे रामराम सुमा अर्बा खमसेन मया अलफ. तुम्हाकडून राजश्री त्रिंबक संभाजी हुजूर आले. याणी कितेक प्रकारे वर्तमान सांगितले. यावरून कळले. ' हुजूर दर्शनास [तुम्ही] येत होता त्यास श्रीमत राजश्री [ रघुनाथराव ] दादासाहेब व राजश्री मलारराव होळकर यैसे शैन्यसहवर्तमान प्रांत मारी गेले सबब खोळवा[२६०] जाहला. म्हणून कितेक अर्थ सागि [ त ] ल्या प्रा कळो आले. आम्ही मुहूर्त करून त्या प्राते यावयासी उजेनीहून कूज करून निघालो असो. तीर्थरुप राजश्री दादा साहेबही[२६१] रेवे[२६२] वरी आलेसी त्याची पत्रे आली. जलदीनेच लस्करास येणार असेत. लस्कर मकुंदबारिया सन्नीध आल्यानंतर तुम्ही पुढे भेटीस येणे. सविस्तर वृतात त्रिंबक संभाजी तुम्हास लिहितील त्यावरून कळेल. ' जाणिजे छ * ७ मोहे मोहरम. बहुंत काय लिहिणे हे विनती.




---

(२६०) 'थालनेरीहून उभयता सरदारसहवर्तमान हिंदुस्थान प्राती येत असो.' [ राजवाडे खंड १ लेखाक २७ ] याचा अर्थ दत्ताजी शिंदे दादासाहेबाबरोबर आले [ व ते उज्जयनीस थाबले ] असा होतो कारण जयाजी तर देशीच मागें राहिले होते ते या वेळी ' रेवेवरी ' [किंवा हिरवेवरी ?] आल्याचें दत्ताजीच सागतात तेव्हा ' जयाजी थेट हिंदुस्थानात जातो [ दत्ताजी थालनेरास × मिळतो हें खरे पण ] सर्व मिळून रजपुतान्यात जातात ' असे जें अनुमान राजवाड्यानें केलें आहे तें शिंदापुरतें तरी बरोबर नाही [ ऐप्र पान १५ ]

(२६१) 'तीर्थरूप दादासाहेब' ह्मणजे जयाजी आपा शिंदे होत. दत्ताजी हे जयाजीस 'दादा साहेब' ह्मणत-असत असें आता स्पष्ट कळतें

(२६२) ' दादा साहेबही रेवेवरी आले ' किंवा ' हिरवे वरी आले ' असें वाचावें ? बहुधा 'रेववरी' असावें असें वाटतें. कदाचित् ' हिरवे ' असलें तर तें तालुके पाचोरे जिला खानदेश यातील ' हिवरें ' तर नव्हे ?

लेखांक [२५७] श्री * संवत् १८१५ आश्विन वद्य २

[ १८ अक्टुबर १७५८ ]

सिका स्वारी नकल

राजश्री बाळाजी यशवत कमाविसदार प्रा कोटे वगैरे गो.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो दत्ताजी सिंदे रामराम सुा निसा खमसेन मया व अल्फ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिा वर्तमान सविस्तर कळले. ' राजश्री मल्हारराउ होळकर याचा निरोप कोटेकर रागडियासी मुकुदवारी गेल्याखेरीज होत नाही. त्याही बराबेरी आम्हास आता येतली पाहिजे. यास्तव मुकुंदवारीपावेतो लस्करा समागमे येतो. उपरांतीक साहेबाकडे येतो म्हणोन लिा. तरी सैन्यासमागमे मुकुदवारी पावेतो येणे. तेथून आज्ञा घेउन उजनीस येणे. आम्ही आमझरि टटै या[263] कडे गेलो आहोत. आमझरियाचा राजा आमझरियाहून स्थानभ्रष्ट होउन गेला. भेटला नाही. त्यास आमझरियास ठाणे ठेउन बंदोबस्त करून उजनीस येतो. भेटीनंतर वर्तमान कळेल'. प्रा पाटणचा हिसेब पाठविला तो पावला परंतु तुम्ही आल्याखेरीज प्रा मजकूरच्या हिसेबाचा फडशा होत नाही. हुडिया सोळा हजारच्या उजनीच्या पाठविल्या त्या पावल्या. यैवज उजनीस जमा जाल्यावर पावल्याचा जाब पाठउ. लाला देवीदास [यास इकडे] पाठविला म्हणोन लिा. त्यास मारनिले येथे आला नाही. कळले पाहिजे. जाणिजे छ * १५ सफर. बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब सुद.

पैा आश्विन वद्य ११ शुक्रवार.

[ २७ अक्टुबर १७५८ ]

---

(२६३) या नावाचें एक लहानसें राज्य माळव्यात धारानगरीचे पश्चिमेस असून तें शिंद्यांचे अंकित होतें १८५७ चे बंडात तें सर्वस्वी खालसा झालें. तेथील राजा जातीचा रजपूत राठोड होता. दत्तीगांववाले स्वतास त्याचे वंशज म्हणवितात.

लेखांक [२५८] श्री * संवत् १८१५ आश्विन वद्य १०
[२६ अक्टुबर १७५८]

राजश्री बाळाजी यशवंत कादार प्रांत कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो दत्ताजी सिंदे रामराम सुहूरसन तिसा खमसेन मया व अलफ. राजश्री कृष्णाजी पवार व राजश्री शिवाजी पवार यासी यांच्या हिशाची वरात पेशजी तुम्हावरी दिल्ही आहे व हाली चिरंजीव राजश्री जनकोजी सिंदे यानी सन समानची वरात तुम्हावर दिल्ही आहे. त्यास पेशजी वरातेचा यैवज बाकी राहिला आहे. तो व हली वरातेचा यैवज वाटणीप्रमाणे मारनिलेचे कमाविसदारास पावला नाही म्हणून विदित जाले. तरी मारनिलेची वाटणीचा यैवज पावता करून कबज घेणे. याविशी फिरोन बोभाट येउ न देणे. वरातेप्रमाणे रूपये देणे. जाणिजे छ * २३ सफर. बहुत काय लिहिणे ꣸ हे विनती[२६४].

बार

---

लेखांक [२५९] श्री * संवत् १८१५ कार्तिक शुद्ध ८
[८ नवंबर १७५८]

सिका खारी

राजश्री बाळाजी येशवत गोसावी यासी.

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो दत्ताजी सिंदे रामराम सुरसन तिसा खमसेन मया व अलफ. चिरंजीव राजश्री जनकोजी सिंदे यानी करार मदार केला. त्याचे वायदे बाधून दिल्हे आहेत. वायेद्याप्रमाणे ताकीद करून यैवज सरकारात पावता कीजे. करारामधे तफावत पडली तर उतम नाही यैसे रागद्यास समजोन सागोन करार केला आहे ते रूपये पाठउन देणे. याइयात तफावत न पडे ते करणे. 'आमच्या दरबार

---

(२६४) हें पत्र मुळींच महत्वाचें नाहीं पण त्यातील 'हे विनती' स्वहस्तम् दत्ताजी शिंद्याची आहे. त्यावरून दत्ताजीस लिहिता वाचता येत होते इतकेंच नव्हे तर जमाखर्चाचे कामीं ते ज्ञेच रुळलेले होते असें दाखविणारीं अनेक किरकोळ पत्रें संग्रहीं आहेत.

चा[२६५] कारभार प्रमाणिक आहे. त्याप्रमाणे राजगड्यानीही वर्तणूक केली तर उत्तम असे. कराराप्रमाणे वर्तणूक न करी[त] तर सर्व गो ष्टी कळतच आहेत. तर उत्तम जाणाल ते करणे.' जाणिजे छ * ६ रावैल. ।' बहुत काय लिहिणे हे विनती. मोर्तब सुद.

---

लेखांक [२६०] श्री * संवत् १८१५ मार्गशीर्ष शुद्ध १
[१ दिसंबर १७५८]

राजश्री बाळाजी यशवत कामदार प्रा पाटण गोसावी यांसी.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो दत्ताजी सिंदे रामराम सुहूरसन तिसा खमसेन मया व अलफ. तुम्ही सरकारात जिनस दिल्हा बितपसील.

२,९०२ जामदारखान्याकडे रुप्याचे व सोन्याचे दागिने दिल्हे असेत रुपये.

१,४१० श्रीमंत राजश्री पाटील बाबा[२६६] च्या देवपूजेकडे दागिने.

---

(२६५) ही आत्मस्तुति, अतिशयोक्ति किंवा स्पष्टोक्ति म्हणावी ? राणोजीनीं हाच भावार्थ जर निराळ्या शब्दानी प्रगट केला आहे. 'आपणाकडील कारभार अवघाच अकृत्रिम ' असें जयाजीनीं तर सरळ उच्चारिले आहे. [ लेखाक ५१ ] रामचंद्र मल्हार सुखठणकराने असेच उद्गार काढले आहेत आणि बखरकार देखील राजपूत, जाठ, गोसावी व मुसलमान याच्याशी आलेल्या निरनिराळ्या प्रसंगाचा संबंध दाखवून शिंदे 'दरबारची' छाप कशा प्रकारे होती त्याचे गौरवपर वर्णन देत आहे. [ भाऊबखर पान ५, ८, ८६ ] अशा स्थितींत ही अभिमानपुरस्सर अतिशयोक्ति किंवा शुद्ध स्पष्टोक्ति हे वाचक वर्गानेच ठरवावें.

(२६६) जयाजी व जोतिबा शिंदे यांच्या पश्चात् दत्ताजीनें हे विशेषण कोणास अनुलक्षून योजिलें आहे ? वयमान पाहातां साबाजी शिंदे तर वडील होतेच पण शकावलीनुसार तुकोजी देखील वयमानें वडील संभवतात [ पान ३ ] आणि हे दोघेच काय ते ह्या वेळी जिवंत होते मग तिसरी अन्य व्यक्ति कोण असावी ? तुकोजीविषयी कोणास कांहीं कल्पविकल्प असला तर त्याना जाऊं द्या पण त्याचे जागीं साबाजी तर येतील कीं नाहीं ? आणि जयाजी व दत्ताजी या उभयताचे वर्णनास पात्र होतील की नाही ? [ लेखाक ५० टीप ८२ ] किंवा त्या जागीं महादजी शिंदे येऊं पहातात ? हा दृष्टिकोण वाचकवर्गानीं लक्षात असूं द्यावा इतिहासकारानीं साबाजीला ' सगोत्रीसुद्धा ' मानिलें नाहीं मग त्याचा राजघराण्याशी जिव्हाळ्याचा निकट संबंध तरी कसा जुळावा ? अथपासून इतिपर्यंत शिंदेशाहीशीच याचा संबंध होता याविषयीं मुळींच मतभेद शक्य नाही त्याचा नातू धारराव शिंदे यास ' चिरंजीव ' असें स्पष्ट महादजी शिंदे यांनी अनेक पत्रीं संबोधिलें आहे तेव्हा 'सगोत्रत्व' सिद्ध होते राणोजीचे पश्चात् जयाजींनीं व तदोत्तर दत्ताजीनें ' [तिर्थरूप] श्रीमंत पाटीलबावा ' असे जर म्हटलें आहे आणि दत्ताजी,

४९८ नंदीवरील कमल रुप्याचे १.
५६१ बाजोट रुप्याचा १.
३५१ तबकडी सोन्याची १.

१,४१०
१,२३२ दुसरे देवपूजेचे साहित्य.

---

केदारजी, खलोजी व मातोश्री निंबाबाई ह्या राजघराण्यातील व्यक्तीप्रमाणे साबाजी शिंद्यानें ज्याअर्थी सरकारी सिक्कामोर्तब वापरलें आहे तर त्याचा अर्थ काय निघतो ? [ लेखांक २६८, २६९, २७० ] खानाजी जाधवासारखा सिक्कामोर्तबासंबंधी हा अपवाद वाटत असला [ लेखांक २६३, २६४, २६६, ते २७१ ] किंवा जयाजी व जनकोजीप्रमाणें नाते दाखविणारें विशेषण दत्ताजीचे पत्री साबाजीचें नावाबरोबर स्पष्ट सापडत नसले [ लेखांक २६१ ] फार काय साबाजी शिंदे यांचे 'श्रीमंत' व 'सरकारीपत्राचे' प्रयोगामुळें भिन्नत्वाचा भास होत असला [ लेखांक २६२ ] तर तो सर्वस्वी तर्क चमत्कार समजला पाहिजे 'कैलास [ वासी ] तीर्थरूप साबाजी पाटील शिंदे आमचे आजे यांचें वडसीचें आमचे बंधु तीर्थरूप धारराव सिंदे व चिरंजीव रघुनाथराव सिंदे व नारायणराव सिंदे व खलोजी सिंदे व आमचे चुलत [ बंधु ] भागीरथराव सिंदे' असा मानाजी शिंद्यानें एका पत्री उलगडा केला आहे [ २४ जून १७८६ ] आणि त्याच सुमारास 'आमचे चुलते तीा नरसिंगराव [ मानाजीचा बाप ] सिंदे व भगवंतराव सिंदे व बयाजी सिंदे [ आणि ] चुलतबंधु धारराव सिंदे व मानाजी बाबा सिंदे आणि चुलतबंधु भागीरथराव सिंदे मोकदम मौजे कनेरखेड संमत कोरेगाव प्रांत वाई' असे खलोजी बिन निंबाजी शिंदे यानें आपल्या उपनामासह मूळगावाचा स्पष्टोच्चार केला आहे [ ८ अक्टुबर १७८६ ] त्यावरून साबाजी व त्याचे वंशविस्तारासंबंधी शंकाच राहत नाही. तसेंच महादजी शिंद्यानी धाररावास 'चिरंजीव' लिहिल्याचें कारण कळतें व परस्पराचे नाते दृगोचर होते. ऐतिहासिक 'चिटोरे' हातीं लागल्याखेरीज संशोधकास चकार शब्दही काढिता आला नसला तरी भाउबखरकाराविषयीं मात्र तसें ह्मणता येत नाही 'साबाजी शिंदे यांचा पुत्र बयाजी शिंदे' असें त्याने स्पष्टीकरण जेथे केलें आहे तुकोजी, महादजी व बाळाजी शिंदे यांची उत्पत्ति दिली आहे [ पान ४३, ७६ ] तेथे साबाजी संबंधीच संदिग्धता का असावी ? महादजीचे नाते ज्ञात व साबाजीचें अज्ञात होते असें मानावयाचे कीं काय ? सकृद्दर्शनी बखरकाराच्या या कटाक्षाबद्दल साहजिकच शंकास्पद आश्चर्य वाटतें. हा भास मलाच नव्हे पण चिंतामणराव वैद्यास प्रथम झाला आहे [मराठ्याचे क्षत्रियत्व पान १६] अस्तु त्याविषयी दोषारोप त्याजवर ठेवीत नाही असल बखरच जर उपलब्ध नाही तर नकलकाराचे 'नकलेचा' दोष बखरकाराचे माथीं मारणे उचित होणार नाही शोधानें जो विचार आला तो सुचविला आहे बखरकारास प्राधान्य दिले तर 'श्रीमंत पाटिलबाबा' चे हें कोडे उलगटावें लागेल. भविष्य भाकीताचा अधिकार नाहीं. ऐतिहासिक पुराव्याच्या पाठिंब्यावर असें ह्मणता येते की, हे विशेषण बहुधा तुकोजी किंवा महादजी शिंदे यापैकी एकास द्यावे लागेल मग ते कोणास 'गोड कीं 'कडू' वाटो त्यास निरुपाय आहे [ राजवाडे खंड १३ विषयप्रवेश पान १ आणि नाना फडणवीस पान ३८ ] मातोश्री सखुबाई शिंदे या माउलीनें 'चिरंजीव' [विजयीभव] असा जो मायेचा आशिर्वाद

४९७ गरूडाचे कमल १.
४१७ वाजोट रुप्याचा १.
३१६ तबकडी सोन्याची १.

---

१,२३२
२५९ चंबू रुप्याचा १.

---

२,९०२
६,१५७ गुा साहादाजी गंगाधर व सदासिव छ [स]भाजी.
५,६५१ खरीदी उंटे ४६.
१७१ गोणपाट २०६.
१५ सुतली वजन.
११ कांबळे २२ दर.
८९ खाथा सुतार ६६.
१८८ खारवे सुतार १२६.
८ चंदी दाणा वगैरे.
२२ रखे सुताचे वजन.

---

६,१५७
५० चिमोजी पवार सिलेदार हुजरात घोड्याबदल सिरपाव जमीदार पाटणकर परवानगी श्रीमत राजश्री पाटील साहेब रसानगी रामराव नारायण मुंसी.

---

९,११०

येणेप्रमाणे नव [हजार] येकसे सवा दाहा रूपये तुम्हास सन समानच्या झडती खर्ची मजुरा दिल्हे असेत. जाणिजे रा छ ॥ २९ रोवल. बहुत काय लिहिणे ॐ हे विनंती.

बार

---

महादजी शिंदे यास दिला आहे [ राजवाडे खंड १३ पत्रांक १७ ] तो वायफळ जाईल असें वाटत नाहीं. तोतयाप्रकरणीं आप्तेष्टमोजनाचा प्रकार जसा दृष्टोत्पत्तीस येतो [ खरे भाग २ लेखांक ३८९ ] तसेंच महादजी शिंदे याचवरील पोकळ व निराधार आक्षेपासंबंधीं प्रमाण पहावयास मिळतें [ शिंदेशाही पत्रव्यवहार भाग ४, ५ लेखांक २४, १२६ ]

लेखांक [२६१] श्री * संवत् १८१५ मार्गशीर्ष शुद्ध १

[ १ दिसंबर १७५८ ]

राजश्री बाळाजी येशवंत गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो दत्ताजी सिंदे रामराम सुहूरसन तिसा खमसेन मया व आलफ. प्राा उरमाल येथील साल गुदस्ताच्या घांसदाण्याचा हवाला तुम्ही सरकारचा घेतला होता. त्या पाो सरकारा[त] यैवज दिल्हा बितपसील.

२,२२५ गुाा राणोजी भोईटे मुाा काा उरमाळ. सन समान छ २६ साबानी बाा कब्रज १.

७,७७५ गुाा साबाजी सिंदे याजकडे कोठ्याच्या मुकामी भरणा दिल्हा. सन समान छ २७ रमजान प्राा कब्रज १.

---

१०,०००

येकुन दहा हजार रुपये हवाल्याबाबत सरकारा [त] गुजारतवार दिल्हे. मारानिलेच्या कब्रजा सरकारात घेतल्या आसेत. जाणिजे छ * २९ रोवल. ।" बहुत काय लिहिणे हे विनंती.

बार

---

लेखांक [२६२] श्रीनाथ[२६७] * संवत् १८१७ कार्तिक शुद्ध २

[ ९ नवंबर १७६० ]

राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो साबाजी सिंदे दंडवत विनंती.

---

(२६७) ह्या पत्राखेरीज अन्य फिरकोळ पत्री केवळ साबाजी शिंदे ह्यानें 'श्रीनायाचे स्मरण केलें आहे पूर्वपानिपतीय पत्रव्यवहारात इतरानीं श्रीनाथाचें स्मरण केलेले नाहीं. [ पहा लेखांक ३ टीप ८ ]

येथील कुशल ता। छ* ३० रबिलावल मुा पाणीपत जाणून स्वकीय लेखन कीजे. विशेष. भाद्रपद वदी आमावाश्येचें पत्र तुम्ही पाठविले ते पावलें. हुंडी वरातेचा मजकूर लिहिला तो कळला. त्यावरून श्रीमंतास सांगायाचे ते सांगितले.[२६८] सरकारचें पत्र तुम्हास लिहिले आहे. त्यावरून सर्व कलो येईल. तूर्त आम्हासी आणि अबदालीसी प्रसंग पडला आहे. हे उरकलियावरी त्या प्रांती सत्वरच येउ. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनती.

राजश्री नारो गोपाल यासी दंडवत विनती. तुम्ही लिहिल्याचा मजकूर वरील पत्री लिहिला आहे. त्यावरून कलो येईल. बहुत काय लिहिणे हे विनती.

---

लेखांक [२६३] श्री * संवत् १८१८ श्रावण शुद्ध ¹

[५ अगष्ट १७६१]




राजश्री लालाजी वलाल प्रात कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो साबाजी सिंदे व खानाजी जाधव रामराम विनंती उपरी. येथील कुशल जांणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे विशेष. 'ठांणे नेणवे' येथे लोकाच्या वेगमीस्तव तुम्हांकडून हाली मा[म]लेते बाबत आगाउ वायेदापैकीं रुपये दा [हा] हजार देवविले असतां अद्यापि ठाणे मजकूरास पैका पावविलात नसा. हे गोष्ट उत्तम न केलीत. ठाण्याचा विचार नाजुक. ठाणे भारी कछेव्यांचे लोक येउन मोर्चे त्यांचे बैसिले म्हणून कळले. लोकां भक्षावयास नसेल तर दगा होणार. हे तुम्ही चितांत समजोंन बदनामी तुम्हावरी न ये येसे जाणोन हर इलाज करून कोटेकरांस ही माकूल करून च्यार गोष्टी बोलोन ऱ्ह त्यांजकडून जरीं दिरंग लागलाच तरी तुमचे तजवीजेने दाहा हजार रुपये नेणव्यास राजश्री सदाशिव गोपाळ यांजवळ सत्वर पावे ते गोष्ट खांमखा करणे. याउपरी तेथे रुपया न पावला म्हणजे ठांणे मारची बदनामी

---

(२६८) लालाजी गुलगुल्यानें वराती व्यतिरिक्त विशेष काय लिहिलें होतें व तें 'श्रीमंतास' ह्मणजे 'शिंद्यास' किंवा सदाशिवराव भाऊ यास सांगितलें हे कोडे सुटत नाही 'सरकारी पत्रानुरोधे' श्रीमंत म्हणजे बहुधा शिंदेच असावेत असें वाटतें .

तुम्हांवरच येईल. हे पष्ट चित्तांत आणून जलदीनेच रुपये सदरहू तेथे लौकर पावेत तें करणे. म्हणजे या समयांत तुमचा मजुरा आहे. ठांणे तुम्हीच राखिलेसे होईल. हर तरदूद तुम्ही करा[ल.] [ठा]णे मारी दाहा हजार रुपये जरूरच पावणा[ल]सारखा भरवसा तुमचा जांणून हे वरात तुम्हावरी दिल्ही आहे. तरी तरतूदेस ढील न करिता रुपये ठांणे मारी लौकर पाठउन त्याची रसीद सत्वर पाठवणे.' रा छ * ४ मोहरम. ॥' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पेवस्ता छ २४ माहे मजकूर.
[२५ अगष्ट १७६१]

---

लेखांक [२६४] श्री * संवत् १८१८ श्रावण वद्य १
[१९ अगस्ट १७६१]

श्री जोति स्वरूप चरणी त त्पर जयाजी सुत जनकोजी सींदे नीरंतर

राजेश्री लालाजी बलाळ
कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्यं स्नो सावाजी सिंदे व खानाजी जाधवराव रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयं कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. हाळींच्या मामलतींत हालीचाच वायेदा पहिला येणे. त्या येवजीं प्रांत मार पैकीं ठांणे जेणव्याचे वेगमीस तुम्हांकडून देविले रुपये दहा हजार. जरूर कांम जांणून मायेने तुम्ही हर तजवीज करून त्यांस येवज सदरहू पावताल. हा भरवसा जाणून देवविले. परंतु त्यांस अद्यापि पैका न पावला म्हणून राजश्री सदासिवपंतांचीं पत्रे ठाण्यांहून येतात. तरी हे गोष्ट तुम्हास विहीतांत की काये ! हर इलाजें करून नाजुक कांम ठाणे मारचें येसें जाणून थोडकाच येवज असता तुम्हांस चाली जाली नसे. तेव्हां पुढे लाखोंलाख रूपयाची निल्हेवाट कैसी कराल ? तुमचे वडिलानी याप्रमाणे सरकार कामे थोर थोर कितेक करीत आले आहेत. हेही चित्तांत तुम्हीं आणून याउपरी तरी थोरपणा धरून सहस्त्र पत्राचे जागां हें पत्र जाणून पत्र पावतांच क्षिणी रुपये दहा हजार ठाणे मांरी तजवीजेनेच तुमच्या पावेत तें तो अर्थ करणे. म्हणजे तुमचा मजुरा धण्याजवळ

आहे. ठाणे तुम्हीच राखिलेसे होईल. तुमचा भरवसा जाणून वारंवार पत्रे लिहितो. या उपरी ठाणे मार बोभाट न ये ते गोष्ट केली पाहिजे. हे काम बदनामीचे आहे. यैसेच राव अखेरामजीसही सागोन ते व तुम्हीं येकाविचारे होउन पैका सदरहू लौकरीच तेथे पाते तो विचार हस्तेपरहस्ते हर इलाजें करून होये यैसे करणे म्हणजे उत्तम आहे. रा छ * १५ माहे मोहरम. † याउपर यैवज द्यावयासी दिवसगत न लावणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पो छ १ सफर.
[ १ सितंबर १७६१ ]

---

लेखांक [२६५]

श्री

* संवत् १८१८ श्रावण वद्य
[ २६ अगष्ट १७६१ ]

श्री जोति स्वरूप चरणी त त्पर जयाजी सुत जनकोजी सींदे नीरंतर

राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्यं स्नो सावाजी सिंदे व खानाजी जाधव रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीयं कुशल लेखन करीत जाणे. यानंतर तुम्हीं पत्र श्रावण शुध † नवमीचे पाठविले तें येथे वद्य ११ † येकादसीस पावले. त्यात मजकूर तपसीले काडून लिहिला त्याप्रमाणें कळो आलें. 'राजे माधोसिंग कछेवा व दिलीकडील व शहाजाद्याचे वृत तपसीले लिहिले ते कळले. पुढे आणखीही विशेष वृतांत पाटणचे देखील लिहिणे. आळस न करणे. ठाणे [नेणवे] येथे वरात रुपये दाहा हजाराची ठाणे मांरचे बेगमीस तुम्हाकडून देवविले होते. ते अद्यापि त्यास पाविलेत नसा अपूर्व आहे! दुष्टांचा शह त्या ठांण्यास आला असता तुम्हीं हा कालवरी सुस्ती केली असा यावरून कोये म्हणावे! हस्तेपरहस्ते हर इलाजे करून ठाणे मांरी सदरहू दाहा हजार रुपये सनद वरातेची पावताच तेथे पाववावे. हा तुमचा भरवसा जाणूनच तुम्हाकडून पैका नाजुक कांमाकरितां देवविले होते. त्यास या प्रकारचा विचार केला अत.पर तरी थोरपणा चित्तांत धरून हर इलाजे कडून वरातेप्रा दहा हजार रुपये ठांण्यास सत्वर

---

† ९ अगष्ट १७६१ † २६ अगष्ट १७६१

पावेत ते गोष्ट करणे. म्हणजे तुमचे सेवेचा मजुरा असे. ॡ वरकड रांगड्याचा कारभार आम्हास ठावकाच आहे. मुख्ये भरवसा तुमचा जाणूनच हे वरात नाजुक कामाची तुम्हा कडे दिल्ही होती. याउपरी तर्‍ही लिहिला अर्थ चित्तांत आणून सदरहू रुपये लैकरीच ठाणे मजकूरी पावे ते करणे. ढील सहसा न करणे. रा राव अखेरामजी यासीही ताकीद पत्र पाठविले आहे. हे त्यांस देणे आणि पहिला वायेदा पंधरा रोजाचा होता त्यास फार रोज होत आले. तो पैका त्यासी तगादा करारा प्रां मागोन घेउंन लेहून पाठवणे. जाणिजे छ ~ २५ माहे मोहरम. |' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

पैवस्ता छ २ माहे सफर.
[ २ सितंबर १७६१ ]

---

लेखांक [२६६] श्री * सवत् १८१८ भाद्रपद शुद्ध ७
[ ५ सितंबर १७६१ ]

श्री जोति
स्वरुप चरणी त
त्पर जयाजी सुत
जनकोजी सींदे
नीरतर

राजश्री लालाजी बलाल प्रांत कोटे गोसावी यासि

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो खानाजी जाधव रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पा ते पावले. तेथे लिा मार कलो आला. 'शेत्रुच्या गर्मीचा'[२६९] मार लिा. त्यास याउपरी ही त्याची बातमी आपले तर्फेने ठीकठाक राखोन तत्वता वर्तमान येत जाईल त्या प्रा वरचेवरी लेहून पाठवित जाणे. ढील सहसा न करणे. आम्हींही स्वार व प्यादे [पा]ठविलेच आहेत व श्रीमंत राजश्री सुभेदार साहेबाकडीलही फौज येसे मातबरच फौजेने तुमच्या खबरीसारखे सत्वरीच मुकुंदवारीकडे येतो. चिंता न करणे. राव अखेरामजीस ताकीद रुपये आठा हजाराची देणग्या बाबत वरातेची बाकीची लिहिली आहे. तरी तुम्हांही त्यास

---

(२६९) ग्रर्मा म्हणजे उकाडा, उष्णता पण ह्या अर्थ येथें नसून तेजी, प्रबलता, जाज्वलता असा आहे

निकड करून मागोन घेउन ठाणे मारी यैवज जलदीनेच पावे यैसें करणे. हे गै सहसा न करणे. रा छ * ५ सफर. ।' बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [२६७]

श्री * संवत् १८१८ भाद्रपद वद्य ११
[२५ सितंबर १७६१]

श्री जोति स्वरूप चरणी त त्पर जयाजी सुत जनकोजी शींदे नीरंतर

राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार प्रांत कोटे गोसावी यासी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ना॥ खांनाजी जाधव रामराम विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयं कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. यानंतर तुमचें पत्र पूर्वी आलें होते. त्याचे जावसाल तुमच्या कासिदाजवळ देउंन रा केले होते. त्यास तें कागद त्यांजवळून हारवले म्हणून हें पत्र आंणखी लि॥ असे. त्या पत्रांत मार तुम्ही लि॥ होता. जे नणवे ठाण्यांस हर इलाजें कडून रुपये सात हजार पा[ठ]विले. बाकी राहिले तेही पोंहोंचवितो म्हणून लि॥ तें कळलें. बहुत उत्तम केलेंत. बाकीचाही यैवज यां समयांत त्यांसी लौकरीच पावे तें करावें. हे गै केली न पाहिजे. 'दुसरें कछेल्यानी उणेरें-चा[२७०] सडूच करून सुरेतरामास पाटणास पाठविला आहे व ठांणे नेणवेंस तोफखाना व फौज पाठवणार म्हणून ऐकिलें. त्यावरून श्रीमंत राजश्री सुभेदार साहेबांनी व आम्हीं मिळोन घ्यार पांच हजार फौज इकडून रामपुरे प्रातें तूर्त रवांना केली आहे. पु॥ हें देसची ही फौज आंणखी आणविलीच असे. सत्वरीच शेत्रूच्या पारपत्यास येतों. चिंता केली न पाहिजे. वरचेवरी वर्तमान अमित्रांचें वगैरे तत्वताच मनास आणून लिहित जाणे. ढील येकंदर न करणे.' जाणिजे छ * २६ माहे सफर. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

(२७०) उणेरे [उनियारा] हें गांव जयपूर राज्यांत असून अजमेरच्या ईशान्येस २० कोसावर आहे.



मातोश्री निवाबाई शिंदे । २ सकुबाई शिंदे ३ भागीर्थीबाई शिंदे

[ श्रीगोंदे, जिल्हा नगर ]

लेखांक [२६८] श्री * संवत् १८१८ कार्तिक शुद्ध १०

[ ७ नवंबर १७६१ ]




राजश्री लालाजी बल्लाळ गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य प्रति पूर्वक मातुश्री निंबाबाई[२७१] सिंदे विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तिकडील सविस्तर अर्थ लिहिला तो कळो आला. येसियासी प्रस्तुत देशी येवनाचा[२७२] विवाद आहे. त्यामुळे फौजाचा अटकाव जाहाला. त्यास इकडील बंदोबस्त लौकरच होउन राजश्री नारोपंत नाना व रा. सटवाजी [!] वावले[२७३] फौजेसह त्या प्रांते आलियाउपरी सर्व बंदोबस्त होउन येतील. तुम्ही वरचेवर तिकडील वर्तमान लिहोन पाठवित जाणे. जाणिजे रा छ * ९ माहे रबिलाखर. सन इसने सितेन. बहुत काय लिहिणे. मोर्तब सुद

---

(२७१) निंबाबाई ह्या राणोजी शिंद्यांच्या ज्येष्ठ पत्नी होत. त्याचे पोटीं तीन पुत्र व चार कन्या झाल्या असें क्षीरसागर सांगतो. राणोजींच्या दुसऱ्या पत्नी चिमाबाई सिवाय विसरें एक नाव 'मैनाबाई' असें बखरींत आढळते. दोघींपैकीं एकीची तें असलें पाहिजे. रानवडे निंबाबाईचें नाव देत नसून मैनाबाई असें नांव देतो. ह्यावरून निंबाबाईचेंच माहेरचें नांव 'मैनाबाई' असेल तर न कळे. 'निंबाई जयाजीची आई २२ अक्टूबर १७५५ रोजीं मृत्यु पावली' असें जें शकावलीकार म्हणतो तें या पत्रान्वयें निराधार ठरतें. [ पान ८ ]

(२७२) येवन म्हणजे मोगल, निजाम हैदराबादवाले. यांशीं लढाई दक्षिणेंत चालू होती. [ चंद्रचूड लेखांक ५२, ५३ ]

(२७३) संताजी [ सटवाजी ] वावळे जातीनें मराठा असून तो शिंदेशाहींत शिलेदारी पथकदार होता. अबदालीच्या युद्धांत जनकोजी शिंदे घायाळ झाले असता त्यांस जानबा वावळे घेऊन आला असें बखरकार सांगतो. [भाऊबखर पान ८२] पण त्यास अन्य लेखी आधार अद्याप पुढें आला नाही. लष्करात सरदार घोरपडे हल्लीं ज्या वाड्यांत राहतात तो पूर्वी वावळ्यांचा होता. साम्प्रतही या घराण्याचे वंशज शिंदेशाहींत आहेत. पण त्यांचें पूर्ववैभव आता राहिलेलें नाहीं.

लेखांक [२६९] श्री * सवत् १८१८ पौष शुद्ध १४
[ ९ जनवरी १७६२ ]




राजश्री लालाजी वल्लाल का [दार] पा पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो खानाजी जाधवराउ दडवत विनती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष. राजश्री सुलतानजी लांबहाते यासी रा सुभेदारानी [होळकर] आपल्या तीसरे हिशावर वरात पाच हजार रुपयाची दिल्ही. त्यास प्रा मजकूरी यैवज वसूली आला थोडका. मारनिलेस द्यावयास यैवज नाही आणि त्याजला खर्चाची वोढ. जाणोन त्याणी आम्हास सागितले. त्याजवरून तुम्हाकडोन देविले. त्यास प्रा मजकूरपैकी ाा वसूली यैवज येत जाईल तो समाइक झाडून पांच हजाराचा मारनिलेचे पदरी घालणे. राजश्री चिमणाजी गोविंद कमाविशदार दिा होळकर त्याचे पदरी पांचा हजाराचा येवज आधी घालणे. पुढे यैवज प्रा मजकूरी वसूल होईल तो आपले हिशात घेत जाणे. जाणिजे छ * १३ माहे जाखर. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [२७०] श्री संवत् १८१८ पौष वद्य ३०
[ २५ जनवरी १७६२ ]




राजश्री नारोबा नाना गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो खानाजी जाधवराउ दडवत विनती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे. तदनतर तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान कलो आले. राजश्री सुलतानजी बावा [लांबहाते] नी प्रा पाटणाची देखरेख करावयासी राजश्री अमृतराउ व चिमणाजीपंत पाठविले आहेत म्हणोन आपल्याकडीलही गृहस्थ पाठउन द्यावा म्हणोन लिहिले. त्यास आमचा इतबार

पूर्वपासोन कमाविसदारावर आहे. हाली कांही गैरइतबार जाला यैसे नाही. आमचे इतबारी कमाविसदार आहेत. त्यास सर्वस्वे तुम्ही आम्हाकडून आहात. आपली खतरजमा राखोन प्रगण्याची देखरेख करणे. कोणे गोष्टीचा गैरविश्वास येकंदर चित्तात न आणणे. आपले कामकाज करिता ते करीत जाणे. जाणिजे छ * २९ माहे जाखर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

( मोर्तब सुद )

पैावस्ता छ मजकूर

---

लेखांक [२७१] श्री * संवत् १८१९ मार्गशीर्ष वद्य २
[ ३ दिसंबर १७६२ ]




राजश्री बाळाजी बलाल गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो खानाजी जाधवराउ रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. राजश्री राये अखेरामजी [वि]सा रोजाचा करार रुपयाचा करून गेले आहेत. त्याजबद्दल राजश्री शिंदो योगीराज व विसाजीराम याजला पेशजी पाठविलेच आहे. त्याजपासी यैवज पाउन लक्ष रुा देणे. बाकी करारा प्राा यैवज राहिला तो झाडून राजश्री राघो शंकर व सदासिव गोपाल पाठविले आहे यांच्या पदरी घालणे. यैवजास दिवसगत न लावणे. येथे खर्चाची जरूर बहुतच आहे. ते तुम्ही जाणतच आहां. तरी कराराप्रमाणे बेबाकी झाडियानसी रुा देणे. यानंतर राजश्री संताजी वाबले याज समागमे फौज देउन बुंदेलखंडात[२७४] रवानगी जरूर करावी लागती. त्याजला खर्चास पाहिजे म्हणून उभयेता तुम्हाकडे पाठविले आहे. तरी कोव्यात सावकारापासोन येक लक्ष रुा मेळउन देउन उभयेतास सत्वर रवाना

---

(२७४) बुंदेलखंडात पानिपतानंतर गर्दी झाली होती खरी पण कोठे व काय कारणामुळें संताजी वाबळ्याची योजना झाली हें तूर्त तरी कळत नाही पुढें कदाचित् शुगावा लागेल.

करणे. सावकारास उजेनीहून हुंडी आणून देउ. तर येविसी अनमान न करणे. जरूर जाणून काम सत्वर करणे. जाणिजे रा। छ * १६ माहे जावल. ॐ बहुत काय लिहिणे हे विनंती.

(मोर्तब सुद)

पै॥ मार्गशिर्ष वद्य २ संवत् १८१९. छ १७ मनोहू.
[ ४ डिसेंबर १७६२. ? ]

---

लेखांक [२७२] श्री

[ १७६५. ? ]

राजश्री जालमसिंग[२७५] गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ खानाजी जाधवराउ रामराम विनंती उपर. येथील कुशल ता। छ २६ माहे जाखर जाणोन स्वकीये कुशल लिहित आसिले पाहिजे विशेष. आमच्या वराता कोट्यावर आहेत तो यैवज अद्याप पावला नाही. तुम्ही कारभारात आसोन आमचे कार्य न व्हावे. है गई करावी हे उत्तम नाही. स्नेह तुमचा आमचा पूर्वीपासून आहे. तरी वरातेप्रमाणे यैवज देविला पाहिजे. याउपर दिवसगत न लावावी. कार्ये सत्वर होये ती गोष्ट करावी. बहुत काये लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

(२७५) हा जालमसिंगजी झाला महाराव गुमानसिंगजी कोटेकरांचा नात्यानें मामा होता. अजाणपणी पेशवाईचीं सर्व सूत्रें जशीं नाना फडणवीसाचे हातीं आलीं तद्वत् कोटेकराचे बाल्यावस्थेंत [ व तदोपरांत बराच काळ ] कोट्याचा कारभार या जालमसिंगजीकडे आला. आणि ही सत्ता त्यानें केवळ आपल्या बुद्धीबलावर सतत ६० वर्षे गाजविली या अवधींत स्वत चें प्राबल्य वाढवून इतकें स्तोम माजविलें कीं पुढें त्याचें सोईसाठीं झालरापाटणचें स्वतंत्र राज्यच निर्माण करावें लागलें राजस्थानच्या इतिहासांत टॉडनें या झाल्याचे गुणानुवादपर मोठे झोंकदार पोवाडे गाईले आहेत. किंबहुना आपल्या काळाचा तो 'भारतीय चाणक्य' होता असेंच ठरविलें आहे [ Rajasthan vol. II page 399, 403, 423 ] 'झाला और लाला [ जो गुलगुले ] करे सो भला' अशी देशोक्तिहि प्रचलित आहे. यासंबंधीं मराठी पत्रव्यवहार काय प्रकाश टाकणार आहे तें पुढें आपोआप कळेल.

---



छत्री साळुबाई शिंदे छत्री केदारजी शिंदे.
[औंध समीप, पुणे ]

ॐ



# श्रीमंत केदारजी पाटील शिंदे

## यांचा असल पत्र व्यवहार.

१८१९-१८२४ विक्रमी

लेखांक [२७३] श्री * संवत् १८१९ चैत्र वद्य ५

[ १३ अप्रेल १७६२ ]




राजश्री खानाजी जाधवराउ सेनापती गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो केदारजी[२७६] सिंदे रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. ' आम्ही उदईक उजनीस दाखल होणार तेथे

---

(२७६) हे तुकोजीचे ज्येष्ट पुत्र व राणोजी शिंद्याचे पौत्र होत जनकोजी शिंद्याचे जीवित्वाची निराशा झाल्यासरशीं महादजी शिंदे याचे नाव प्रथम जरी पुढे आलें तरी वडीलपणा केदारजीकडे होता. पण त्याचें अंगी राज्यशकट चालविण्याची शक्ति नसल्यामुळें ' सरदारी उभयताचे नावे झाली शिक्के मोर्तब [ ही ] दिल्हे गेलें, तथापि काहीं विशिट कारणामुळें तें फारसें प्रचारात आलें नाहीं. ' तारीख २० जनवरी १७६३ ' पावेतो शिंदेशाहीचें ' घोंगडें भिजत पडलें होते सरदारी कोणाला द्यावयाचा निकाल झाला नव्हता ' असें जें विधान राजवाड्याने केलें आहे ते या पत्रव्यवहारावरुन योग्य दिसत नाहीं [ खंड १३ विषयप्रवेश पान २ पत्राक १ ] तत्संबंधीं पुढें सविस्तर स्पष्टीकरण होईल

एक मुकाम करून दूसरे दिवसी दरकूच फौजसुद्दा खासा स्वारी सडे होउन येतो. पुढे फौज दाहा पधरा हजार पाठवावी म्हणून लिहिले, त्यास फौज नाही पाठवीत. आम्ही आठवे दाहावे रोजी सामील होतो. दरकूच लैवकर येतो. तुम्हास कळावे.' ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

(मोर्तब सुद)

---

लेखांक [२७४] श्री * संवत् १८१९ चैत्र वद्य १०

[ १८ अप्रेल १७६२ ]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजी सुत जनकोजि सिंदे निरंतर)

राजश्री खानाजी जाधवराव सेनापतजी गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम विनंती. येथील कुशल ता छ - २२ माहे रमजान जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. तेथे लिहिले वर्तमान कळो आले. 'त्याचा जावसाल आपल्यास तीर्थरूपानी [ महादजी शिंदे ] लिहिले आहे त्यावरून कळो येईल. लौकरीच सडी फौज या पत्रा मागोमाग पावेल. आम्हीही मागाहून लांब लाब मजली करीत येत आहो. तोपर्यंत आपण जल्दाई न करावी. गनीमी काव्याने च्यार रोज असिले पाहिजे. उतावली सहसा न करावी.' ।[२७७] बहुत काये लिहिणे हे विनंती.

(मोर्तब सुद)

---

लेखांक [२७५] श्री * संवत् १८१९ वैशाख शुद्ध ११

[ ४ मे १७६२ ]

(श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजी सुत जनकोजि सिंदे निरंतर)

राजश्री लालाजी वलाल प्रांत कोटे गोसावी यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे दंडवत सुा

---

(२७७) केदारजी शिंद्यांस लिहितां वाचतां येत होते असें आता साधार सिद्ध होतें

इसने सितेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान विदित जाले. साद्यन्त अर्थ राजश्री खानाजी बावा [जाधव] यास लिहिला आहे. त्यावरून सविस्तर वृत कळो येईल. रा छ * ९ माहे सवाल. ‖ बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

---

लेखांक [२७६]

श्री * संवत् १८१९ मार्गशीर्ष शुद्ध १४

[३० नवंबर १७६२]




राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार प्रांत पाटण प्रांत बूंदी गोसावि यासि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुहूरसन सलास सितेन मया व अलफ. परगणे मजकूरी तीसरा हिसा राजश्री मल्हारराव होळकर यानी राजश्री त्रिंबकराव शिवदेव यासी दिल्हा. येसियासि श्रीमंत राजश्री [रघुनाथराव] दादासाहेब स्वामी यानी आम्हास सनद पाठविली. ती पूर्ववतप्रमाणे दोन्ही हिस्से कराराच असे. तुम्ही दूसरियासी आमल न देणे म्हणोन त्याजवरून दोन्ही हिसियाची सनद पूर्ववत प्रमाणे लिहून आला[हि]दा पाठविली असे. त्याप्रमाणे तुम्ही आमल करणे. त्रिंबकराव शिवदेव याचे कारकून पो मजकूरी असतील त्यासी आमल घेउ न देणे. दोन्ही हिसियाचा अमल करणे. जाणिजे छ * १३ माहे जौवल. ‖ बहुत काये लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

पैा छ १८ माहे जमादिलावल
मिती मार्गेश्वर वद्य ५ समत १८१९.
[६ दिसंबर १७६२]

---

लेखांक [२७७] श्री * संवत् १८२० चैत्र शुद्ध ९

[ २३ मार्च १७६३ ]




राजश्री लालाजी बलाल

कमाविसदार प्रा पाटण गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुा सलास सितेन मया व अलफ. तुम्हाकडे पूर्वी रा कासीबा बीराचे[२७८] घोडीविषई येक दोन वेळी लिहिले असता अमलात येत नाही म्हणोन विदित जाले. त्यास हाली मा [ रनि ] ले चे घोडीचा पूर्वी लिहिल्या प्रमाणे वैरण दाणा व माणसास सेर देत जाणे. येविशी अनमान सहसा न करणे. मा [ रनि ] ले पदरचा जाणून लिहिले आसे. रा छ * ७ रमजाणे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [२७८] श्री * सवत् १८२० कार्तिक शुद्ध

[ ६ नवबर १७६३ ]




राजश्री लालाजी बलाल कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुहूर सन अर्बा सितेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. पांच लक्ष रुपये कोटेकर पासून घ्यावयाविसी व आपल्या खासगत खर्चाविसी व पा पाटणच्या हिशेबाविसी लिहिले त्यास पांच लक्ष रुपये घ्यावयाविसी माहारायास व अखेरामास व तुम्हास उज्जनीच्य

---

(२७८) 'रघोजी थोरात चाडोलीकर हा आपलें नांव जनकोजी ह्मणून सांगत होता व लबाडींत हा कासिबा वीरही होता.' [ वाड रोजनिशी भाग ७ पान २०७ ] त्याला महादजी शिंद्यानें ममतेंत घेऊन सोतयाची सर्व बिंगें बाहेर काढिलीं असावीत असें वाटतें.

मुक्कामी [हून] पत्रे लिहिली होती. ते पत्रे राज्याची व अखेरामाची फाडून टाकिली. दूसरे पत्रे लेहून पाठविली. तुमचे [त्याचे ?] पत्र तुम्हाकडे चुकोन गेले. त्याजवर न जाणे. आम्ही त्या प्रांतीं आल्यावर रुपये घेतले जाईल. तर्त तुम्ही रुपयाची चर्चा न करणे. तुमच्या खासगत खर्चाविसी राज्यास व अखेरामास लिहिले आहे. ते तुम्हास खर्चास देतील. तुम्हा कडील पाटणचा हिशेब येणे आहे. तो अम्ही हिंदुस्थान प्रांती आल्यावर समजोन घेतला जाईल. इकडील वृत ' तर श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीची भेट गंगातीरी[२७९] छ ११ राखरी जाली. मानसन्मान पूर्ववतप्रमाणे जाला. छ २५ राखरी पुणियास आलो. जनकोजी सिंदे होउन आले होते. त्याची वासपूस जाली. तो रघुजी थोरात[२८०] चाडोलीकर

(२७९) गंगा ह्मणजे 'गोदावरी' कीं 'कृष्णा' हें निश्चयात्मक सागता येत नाही भेट १९ अक्टूबर रोजीं जाली त्यापूर्वी मिरज कृष्णातीरीं केदारजी व महादजी शिंदे होते असे राजवाड्यानें म्हटलें आहे [खंड १३ पत्रांक १]

| १९ अक्टुबर १७६३ | | २ नवबर १७६३ |

(२८०) जनकोजी शिंदे हे १४ जनवरी १७६१ चे भाऊगर्दीत राहिले किंवा पुढे त्याचें काय झालें हें त्यावेळी कोणास कळूं शकले नाही तथापि ' ते लढाईतून निघून जाटाच्या मुलकांतून लखे जंगल, बीकानेर, अजमेर प्राते आले ' अशी एक वदंता होती दुसरी बातमी अशी आली कीं 'वीजेपूर सवलगडापलीकडे बैरागियाचे मठी रात्री वस्तीस होते विठ्ठल शिवदेव याजकडील खिजमतगार विठ्ठलराव याचे पुतण्याच्या शोधास जात होते तो रात्रीचे बैरागियाचे वस्तीस राहिले तेथें खिजमतगारानें बाबासाहेबास वळखोन रामराम केला तेव्हां एकाती बोलावून व लष्करची व सरदाराची नावे घेऊन वर्तमान पुसलें तो जाटाची माणसे होती त्यानी [ही] तर्क करुन रामराम केला तेव्हा त्यावर राग केला. ते दूर सरकून बसले प्रात काळी माणसे निवस्त्र सोडून कूच केले माणसानी बैरागियास पुसले, माणसे करोलीवरुन मथुरेस दाखल झाले त्याजवर ठाकरानें इनामें दिली आनंद केला आम्हीही खुशवक्ति केली दुसरे दिवशीं खिजमतगारास आम्ही व गंगोबा तात्या [चंद्रचूड] शपथ किरया करुन पुसले तो जहालें वर्तमान सिद्धात सागितलें त्यास दिवसगत लागली. लष्करास पोचालियाचे वर्तमान येत नाहीं यामुळे चिंतार्णवी आहो वर्तमान येईल तो सुदिन असे यजमान नित्यानी दोन तीन कोस चालतात गुप्तरुपें जातात उजनीस जावयास एक मास पाहिजे लष्कर दरमजल गेले म्हणोन गाठ न पडली जिवंत आहेत बहुतानीं दृष्टीनीं पाहिले, चिंता न करावी ' [ चिंतो कृष्ण २८ मे व २७ सितंबर १७६१ ] ही दुसरीच बातमी मल्हारजी होळकर यास साहाजिकच लागली. त्यावरुन त्यानी खोळंबाकरुन मार्गप्रतिक्षा केली पोहरीचे व विजेपुरचे फारसे अतर नव्हतें मल्हारजी होळकर शोध घेतल्यावाचून राहिले नसतील तथापि हे ' राजश्री ' अगदी जवळ असूनही ' गुप्तरुपे जात ' असल्यामुळें भेटीची पाळी आली नसावी तेव्हा साहाजिकच शंका उत्पन्न झाली त्यासंबंधीं चिकित्सा होऊं लागली. ती इतकी कीं ' सितंबर १७६१ ' चे सुमारास हा 'शक पुराव्यास आला'. तथापि त्याच्या सोक्षमोक्षाची घटका येईना. तोतया दोन वर्षानंतर ' कुरकुंभास जातो तो दहा बारा हजार फौजेचे तैनात जावते करितो. दोन हजार फौज जमा होते. खाणाखुणाहि त्याजला

निघाला. त्याजला कैद केले. समागमे लोक होते त्यास कैद करून घोडी व वस्ताभावा गरकारात लाविली. प्रा पाटण येथील मामलेत तुमची तुम्हाकडे खमसत्ते सालापासून दिल्ही जाईल. जाणिजे छ ४ ८९ रावर. !" बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

पैवस्ता छ २० माहे जमादिलावल.
[ २६ नवंबर १७६३ ]

---

होला. मनुष्यास ओळखावें. साक्ष पुरवावी दिनकरपंत जोशी व भुलोजी ढमढेरे त्याजवळ गेले. तेथून श्रीगोंदास जाऊन अगावरील खूण [विचारून पाहिली तर ती] उत्तम मिळाली [त्यामुळें] मोठा भ्रम सर्वत्रास पडला तदोत्तर पवाराच्या कवटयानजीक संगमामध्येंच उतरविला. तेथें भापकर, गराडे, [?] सरलष्कर, गाढवे, खानाजी जाधव आदिकरून सात आठशे मराठे त्यास ओळखून एक ताटीं जेवले. कोणाचाही तर्क हा लटका नच चाले असें जाले दुसरे दिवशीं थोडोपंत पुरंदरे व गोविंद शिवराम [यांनी] तहकीकात करिता 'थोरात रघोजी असा ठराव झाला.' कैद करून ठेविला. भले लोक होते ते पळोन गेले काहीं सापडले ते अटकेंत आहेत. लोकास मोठी दुराशा होती पण तो तोतया निघाला त्याला 'कोणी धर दिली' हे विचारावें असे मानस आहे त्याचे आईबाप व बायको आलेवर अवघे तथ्य असेल तें ठरेल गिरमाजीपंत बोकिलाचा बंधू तोतयाचा कारभार करीत होता' [ खरे भाग २ लेखांक ३८० ते ३८३ ] या पलीकडे तथ्य अद्याप कळलेंच नाहीं हे खूळ उपस्थित करून खेळ खेळावयाची कल्पना कोणत्या तरी सुपीक मेंदूंतून निघाली असावी असें हलीच भासतें असें नव्हे. तर तत्संबंधीं त्याकाळींसुद्धा पृच्छा झाली होती. ते डोकें उघडे झालें असो वा नसो पण एवढी गोष्ट स्पष्ट दिसतें कीं तोतया स्वभावत चाणाक्ष होता संधी मिळताच त्याने आपल्या चेहेरेपट्टीच्या साम्यतेचा उपयोग करून घेतला आणि तो इतका नाटकी, बेमालूम केला कीं त्यामुळें भापकर, गाढवे, गराडे [गरुड ?] सरलष्कर व खानाजी जाधव या सारखे जनकोजींच्या प्रत्यक्ष सहवासातील अनुभवी गडी देखील त्याचे मोहजालात सपशेल फसले महादजी शिंद्यांनी जर थोराताच्या दोळीतून कासिदा विरास ममतेंत घेऊन या मायेचे मर्म जाणून ते साधून ठेविलें नसतें तर हा पाताळयंत्री डाव निःसंशय यशस्वी झालाच असता तोतयासंबंधीं साशंकतेचा ध्वनी प्रथम चितो कृष्णाचें पत्रीं येतो. [ सितंबर १७६१ ] त्याअर्थीं त्याचें अग तावत्काल पर्यंत तरी नसावें असें अनुमान करणेंच न्यायाचें होईल. त्यानंतर कदाचित् त्याचा पाय घसरला कीं काय ? 'शक पुराव्यास आल्या मितीपासून' त्यांचा पत्रव्यवहार बंद झाला. ही गोष्ट उघड आहे. मग तो 'पथकाची फडनीसी त्यास मिळाल्यामुळें [ राजवाडे खंड १२ पत्रांक ५ ] किंवा कटांत त्याचा हात असल्यामुळें झाला हें सांगणें फार कठिण आहे तोतयाचे घटस्फोटाबरोबर त्याची फडणिसी जाते. [ राजवाडे खंड १२ पत्रांक ५ ] हा केवळ काकतालीय न्याय तर नव्हे ? किंवा राघोराम पागेचें बंडाच्या रहस्याला दाखविणारी ही मनोभूमिका समजावी ?

लेखांक [२७९] श्री * संवत १८२० माघ वद्य ७

[२३ फरवरी १७६४]




राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुहूरसन अर्बा सितेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री रुद्राजी खंडेराउ पा पाटण येथील सिबंदीबदल खर्च मजरा दिल्हा. कमाविसदाराची नेमणूक मजरा देत नाहीत म्हणून लिहिले. त्याजवरून आनंदराउ रुद्र यासी ताकीद पत्र पाठविले आहे. ते देउन खर्च मजरा घेणे. वरकड राजकारणी मजकूर लिहिला तो कळला. यैसेच सदैव लिहित जाणे. ?‡ तुम्ही देसी यावयाविसी लिहिले. त्यास खासा स्वारी हिंदुस्थान प्रांती लौकर[२८१] च येणार. स्वारी त्या प्रांती आल्यावर मग तुम्ही देसी येणे. जाणिजे छ * २० शाबन. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [२८०] श्रीरामजी * संवत् १८२२ आषाढ शुद्ध १०

[२८ जून १७६५]

सिका. नकल.

सीधश्री सर्वेवोपमा लाएक ठाकूर राजश्री जालमसिंघजी वा पुंडरीक व्यासजी श्री गोपालरामजी जोग. लिखाइतंक सूमेदार राजश्री केदारराव सिंघे वा पटेल राजश्री माधवराव सिंदे केन वंचा. अठाका समाचार भला छे. राजका सदा भला चाहीजेजी. अपरंच. पंडत धरमराव तमाजीकू रू. दोई हजार वरखासन श्रीमंत राजश्री पंत प्रधान जी ने करदिया. सू साल गुदस्ताका रू. पोंहचा न्ही इस तरे जाहार हुई. तिसे राजने

---

(२८१) दक्षिणेंत पटवर्धन, भोसले व निजाम ह्या त्रिवर्गावरील मोहिम समाप्त झाल्यावर उत्तर हिंदुस्थानात परतले.

लखा छा. सू साल गुदसतका रू. दोई हजार पोहचाई रसीद हुजूर भेज दीजो. आंगेसू साल मजकूर मे दोइ हजार को गांव वसूली पंडत मजकूरकू दीजो. आंकी फेर नालीस न आवे. याकी रजावंदी को कागद हुजूर आवे सो कीजो. जाणिजे छ * ९ मोहरम. सुा तिसेन मया व अलफ. मिती आसाढ सुद्ध १० समत १८२२. मुा उरमाल प्रांत कोटे. मोर्तब सुद.

बार

---

लेखांक [२८१] श्री * संवत् १८२३ जेष्ट शुद्ध ६

[ १३ जून १७६६ ]

सिका खारी. नकल

राजश्री लालाजी बलाल कादार पा पाटण गोसावी यांसि.

*अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुमा* सत्रा सितेन मया व आल्फ. मोजे दइता पा मार हा गांव सिवसिंग राठोड याज कडे इजारियाने समाइक आहे. त्यास तीन साला गांवचा रुपया दिल्हा नाही या करिता राजश्री तुकोजी[२८२] होळकर याणी आपले कमाविसदाराकडून गावची जपती करविली आहे. तरी तुम्हीही जप्ती करून तीन साला यैवज ती राहिला असेल त्याच्या निकाल करून घेणे. पुढे इजारिया प्रा यैवजाची सावकारी निशा करून देतील तरी त्याजकडे गाव इजारा ठेवणे. नाही तरी त्याजकडे गाव न ठेवणे. पेशजी गांवची जमावदी होती त्यात अलिकडे इजारा कमी करून दिल्हा आहे म्हणोन विदित जाले. यैसियास गांवची गुजरसी

---

(२८२) श्रीमंत मल्हारजी बावा होळकर 'वैशाख शुद्ध ११ मंगळवारी [ २० मे १७६६ ] अलमपुर [प्रांत दतिया] या मुकामी वारले' त्यानतर त्याचे नातु मालजी होळकर हे गादीवर आले. ते अल्पवयी असल्यामुळे होळकराकडील खारी शिकारीचें काम हे तुकोजी होळकरच करीत होते असें पत्राधारें कळते

मनास आणून जो आकार होईल त्याप्रा इजारा करून देणे. नाही तरी गांव सरकारात ठेउन वसूल घेणे. जाणिजे छ * ५ मोहरम. [283] बहुत काय लिहिणे हे विनंती.

पैवस्ता छ २२ माहे मोहरम.

[ ३० जून १७६६ ]

---

लेखांक [२८२]

श्री * सवत् १८२३ मार्गशीर्ष शुद्ध १४

[ १५ दिसंबर १७६६ ]




राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो रवलोजी[284] सिंदे दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष. सरकारची चापी[285] वटीक मातुश्रीच्या [?] चाकरीची पलोन गेली. तीचे ठिकाण कोव्यात व पाटणात लागले म्हणून हुजूर विदित जाले. यास्तव कासिद व खासबरदार पाठविले आहेत. याजबरोबर च्या[र] माणसे देउन व वेगली माणसे पाठउन बटीक ठिकाणी लावणे. कोव्यात व पाटणात व सोपारात शोध करून कासिद पाठवणे. येथून माणसे पाठविली ते जेथे सागतील त्या त्या जागा तलास करणे. दो ती जागा ठिकाण लागेना तर जैपुरास पत्रे देउन व येथील माणसे व तुमची माणसे पाठउन तलास करणे. येथून ज्याणे नेली त्याचे

---

(२८३) हस्ताक्षर महादजी शिंदे.

(२८४) केदारजी शिंद्याचे हे रवलोजी धाकटे बंधु होत यानें सरकारी सिक्कामोर्तब वापरलें आहे गुलगुले सग्रहात शिंदे राजघराण्यापैकी जोतीबा, तुकोजी व आनदराव [ केदारजीचा बधु ] या तीन व्यक्तींची पत्रें मुळीच मिळत नाहींत हें नवल आहे

(२८५) ही चापी वटिक कोणत्या मातोश्रीच्या चाकरीस होती हें निश्चित कळत नाहीं तथापि तिजविषयी राजघराण्यात परस्पर बराच गैरसमज झालेला दिसतो पण शेवटीं समेट झालेला आहे

घर पाटणात आहे. त्याची मुले माणसे जप्त करणे. जाणिजे छ * १२ रजब. बहुत काय लिहिणे ! हे विनंती.

मोर्तब सुद

पँवस्ता छ २१ माहे रजब. समत १८२३.

[ २४ दिसंबर १७६६ ]

लेखांक [२८३] श्री * सवत् १८२३ माघ वद्य २

[ १५ फरवरी १७६७ ]

श्री जोति स्वरूप चरणी त त्पर जयाजी सुत जनकोजी सींदे नीरतर

राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो खलोजी सिंदे दंडवत सुरसन सन्ना सितेन मया व अलफ. सरकारची बटीक पळोन गेली तिचे ठिकाण पाटणात ज्याणे नेली त्याचे घर आहे. × [त्या]स पेशजी पत्र पाठविले होते. त्यास तुम्ही लिहून पाठविले की तो न्हावी कबिल्यासुधा पळोन गेला. तर आपण येथून कासिद व खासबरदार पाठविले आहेत. ते सागतील त्या ठिकाणी आपली च्यार माणसे देउन शोध करून पाठउन देणे. माणसे अ[ा]मची कोण्या गावात जाउन ठिकाणी लाविली आणि त्या गावकरी यानी व हर कोणी कजा [के]ला तर तुम्ही दाहा वीस स्वार पा[ठ]उन घेउन येणे. ज्याचे घरी बटी[क] आहे त्याचेही घर पाटणात आहे. [त्या]चा भाउ व बटीक [जय?]नगरात होती. आमची माणसे पाहून आली. ज्याजवळ बटीक आहे. त्याचा मुला[हि]जा कराल तर कार्यास येणार नाही. रा छ * १५ रमजान. बहुत काये लिहिणे ! हे विनंती.

मोर्तब



छत्री रवळोजी शिंदे [ औंध समीप, पुणें ]

लेखांक [२८४] श्री सवत् १८२४ चैत्र शुद्ध २
[ ३१ मार्च १७६७ ]

राजश्री लालाजी बलाल कादार सस्थान कोटे गोसावी यांसि.

अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुमा सवा सितेन मया व अलफ. चापी बटकी करिता तीर्थस्वरूप राजश्री नाना[२८६]नी लिा आहे. तरी बटीक मातुश्रीकडे पाठवणे व माणसे हुजूर पाठउन देणे. येविसी उजूर न करणे जाणिजे छ * ३० सवाल. ॐ वहुत काये लिहिणे हे विनती.

---

लेखांक [२८५] श्री * संवत १८२४ चैत्र शुद्ध १२
[ १० अप्रेल १७६७ ]

श्री जोति स्वरूप चरणि तत्पर जयाजी सुत जनकोजि सिंदे निरंतर

राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार सवस्थान कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो केदारजी सिंदे रामराम सुहूरसन सबा सितेन मया अलफ तुम्हास पेशजी दोन तीन पत्रे पा की चापी बटीक पलोन तेथे आली, ती तुम्हापासी आणून ठेविली. तर तीर्थरूप मातुश्रीकडे माणसे समागमे देउन बटीक उजनीस पावती करणे. अ[ा]णि वटीक ज्यानी काढून नेली त्या माणसाबरोवर आपली माणसे देउन मार्गाची वंदोबस्ती करून हुजूर पाठवणे. म्हणून पेशजी लिहिले असता हा कालपर्यंत त्याचा जाबसाल नाही. तर तुम्हास हे युक्त नाही. तर पत्र दर्शनी सदरहू लिहिल्या प्रा बटीक पावती करणे आणि ती माणसे हुजूर पाठवणे. × × इतकिया वर पत्राचे उतर न आले तर गोष्ट कामास येणार नाही. जाणिजे छ * १० माहे जिलकाद. ॐ वहुत काये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

(२८६) महादजी शिंदे यांना केदारजी 'नाना' असें ह्मणत होते

लेखांक [२८६] श्री * संवत् १८२४ चैत्र वद्य २
[१६ अप्रेल १७६७]




राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार सा। कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ केदारजी सिंदे रामराम सुमा सबा सितेन मया व अलफ. आम्हास बंदूख पाहिजे या करिता ठाकूर शिवासिंगजीस पत्र लि॥ आहे. तरी त्याजकडील बदूख येक चांगली घेउन तीर्थस्वरूप राजश्री नानाच्या बंदुखा पाठवाल त्याजबा॥ पाठउन देणे. येविसी उजूर न करणे. जाणिजे छ * १६ जिलकाद. ॐ बहुत काये लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [२८७] श्री * संवत् १८२४ वैशाख वद्य ११
[२४ मे १७६७]



२८७

राजश्री लालाजी बलाज का॥दार सो। कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो॥ केदारजी शिंदे रामराम सुमा सबा सितेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. शिवसिंग याजकडील बंदुखेचा मार लि॥. त्यास सिवसिंग यासी सांगोन बदूख चांगली येक पाठउन देणे. × × सरकारची वटीक पळोन गेली ती कोट्यात आहे. तिज बा॥ माणसे देउन पाठउन देणे म्हणोन तुम्हास पेशजी दोन च्यार पत्रे सादर [केली] असता वटीक पाठउन देत नाही.

---

(२८७) केदारजी शिंद्याचा हा नवीन शिक्का तयार होऊन तो नवंबर १७६७ अखेर चालला [लेखांक २९६]

याचा अर्थ काय ? या उपरी पत्र पावताच वटकी वो तुम्ही आपली माणसे देउन हुजूर पाठउन देणे. ज्याने बटीक पळउन नेली त्याजसुधा पाठवणे. येविसी तुम्ही उजूर केला तरी साफ कार्यास येणार नाही. बटीक सरकारची वस्तभाव घेउन गेली आहे. तिचा जाव तुम्हास करणे लागेल. यैसे समजोन जलद पाठवणे. जाणिजे छ * २५ जिल्हेज. ॐ बहुत काये लिहिणे हे विनंती.




पैा छ ३ मोहरम. जेष्ठ सुध ५.
[ १ जून १७८७ ]

---

लेखांक [२८८] श्री * संवत् १८२४ जेष्ठ शुद्ध १
[ २८ मे १७६७ ]




राजश्री लालाजी बलाळ
कादार पा पाटण गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने . केदारजी सिंदे रामराम सुमा सबा मया व आलफ. बाळाजी[२८८] गोविद याजकडे सरकारचे लढे आहेत. त्यास मगारनिले येथून न पुसता गेले. या करिता हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी कस्वे मजकूरी त्याची मुले मनुष्ये आहेत. ती तेथून जातील त्यास जाउ न देणे. [अ]टकाउन तेथेच आसो देणे. या उपरी तुम्ही सरकारचे परवानगी सिवाय गावातून मुले मनुष्ये जाउ दिल्ही तरी त्याच्या जाव तुम्हास करणे लागेल. पण्ट समजोन लिा प्रो करणे. जाणिजे

---

(२८८) हा बाळाजी गोविंद महादजी शिंद्याचे कृपेंतील व्यक्ति असून त्याजवर त्यावेळीं केदारजीचा रोष झाल्यामुळें ' कोणाची पत्रें येवोत तुम्ही न मानने ' अशी निक्षून आज्ञा त्यांनी केली होती. [ लेखांक २९१ ]

छ * २९ जिल्हेज. ‸ बहुत काय लिहिणे हे विनंती.




पै॥ छ १० मोहरम. जेष्ट सुध ११. मुकाम कोटे.
[८ जून १७६७]

---

लेखांक [२८९] श्री * संवत् १८२४ जेष्ट शुद्ध १५
[१२ जून १७६७]

राजश्री लालाजी बलाळ कादार सस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुमा समान सितेन मया व आलफ तुम्ही पत्र पाठविले ते पावोन लिहिला मजकूर सविस्तर विदित जाहला. यैसियास तुम्हास हुंजूर यावयाविसी पेशजी पत्र सादर जालेच आहे. तरी तुम्ही सत्वर येणे. येते समई फरमास करविल्या प्रो बंदुखा दोन सिवसिग याज कडील घेउन येणे. कोटेकराकडे गुदस्ताच्या खंडणीचा यैवज येणे. त्यास यैवज व भला माणूस मातबर तुम्हा बा॥ दिल्हा तरी घेउन येणे. नाही तरी तुम्ही येणे. खासा स्वारी-त्याच प्रातें होईल. जाणिजे छ ॥ १४ मोहरम. ‸ बहुत काय लिहिणे हे विनती.

---

लेखांक [२९०] श्री * सवत् १८४२ जेष्ट वद्य ४
[१६ जून १७६७]




राजश्री लालाजी बलाल कादार सा॥ कोटे गोसावी यासि.

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुमा समान सितेन मया व आलफ. तुम्हाविसी कितके [मजकूर] राजश्री भगवंतराव शंकर याणी

सांगितले यैसियास खासा स्वारी त्या प्रांते दो रोजा येत आहे. कोणी माहारावजीचे भले माणूस येईल तरी घेउन येणे. त्याचे पारपत्य यथास्थित केले पाहिजे. त्याज पासोन यैवज सुटी सुधा घेतला पाहिजे. याज करिता बहुतसे गली न पडता कोणी भला माणूस येईल तरी घेउन येणे. रा छ * १८ मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

---

लेखांक [२९१] श्री * संवत् १८२४ आषाढ शुद्ध ५
[१ जुलै १७६७]




राजश्री लालाजी बलाल
कादार संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे रामराम सुरसन समा- [न] सितेन मैया असफ. तुम्ही पत्र पाा ते पावोन लेखणार्थ विदित जाला. लिा [की] रो वाळाजी गोविंद याची मुले माणसे अ[ा]ज्ञेसिवाये जाउ देणार नाही. उतम केले. तर सरकारचा कझा त्याजकडे आहे सख्त आज्ञा तुम्हास हेच की कोणाची[२८९] पत्रे तुम्हा कडे येवोत तुम्ही न मानने. आमची अ[ा]ज्ञा येईल तेवाच मुक्त करणे. रोज [१] मारनुले त्याज पासून घेणे आहे. माघाहून आज्ञा जे येईल त्याप्रमाणे वर्तनूक करणे. तुम्हाकडून डागीणे करविले ते तयार जाले की नाहीं ? तयार जाले असतील तर येते समई घेउन येणे आणि बंदुखा दोन चागल्या उतम घेउन येणे. जाणिजे छ * ४ माहे सफर. ॥ बहुत काये लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

पैा छ ८ माहे मजकूर.
[५ जुलै १७६७]

---

(२८९) 'कोणाची' ह्मणजे महादजी शिंदे याची असें स्पष्ट व सरळ लिहिण्याचें साहस झालें नाही ह्मणून हा सांकेतिक कटाक्ष केला आहे असें वाटते

लेखांक [२९२] श्री - संवत् १८२४ आषाढ शुद्ध ७

[ ३ जुलै १७६७ ]




राजश्री लालाजी वलाल
कमाविसदार प्रा पाटण गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो केदारराव सिंदे दंडवत सुा समान सितैन मया व आलफ. राजश्री विसाजीराम व विठल गणेश याच्या आसाम्या प्रगणे मजकूरी आहेत. त्याचे वेतन पावत नाही म्हणउन हुजूर विदित जाले त्यावरून हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्हापासी जया सालापासून त्याचे वेतनाचे रुपये राहिले आसतील त्या प्रा हिशेब करून मारनिलेस पावते करोन फिरोन बोभाट येउ न देणे. जाणिजे छ * ६ माहे सफर. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती




---

लेखांक [२९३] श्री * संवत् १८२४ आषाढ शुद्ध ८

[ ४ जुलै १७६७ ]




राजश्री लालाजी वलाळ वकील प्रांत कोटे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो केदारराव सिंदे दंडवत सुा समान सितैन मया व आलफ. तुम्ही पत्र पाा पावले लिा वर्तमान विदित जाले विशेष. पत्र मजकूर की सुतरी स्वार याज समागमे पाठविली आहेत. त्याची प्रति उत्तरे आल्या नंतर माहारावजीचा भला माणूस व आम्हा येनो म्हणून लिा. त्यास कासीदा समागमे व सुतरी स्वार समागमे पत्र लिा आहे त्यावरून सविस्तर कळेल. व खासा स्वारीही त्या प्राती सत्वरच येईल तदनतर सर्व कर्तव्य ते केले जाईल. जाणिजे छ * ७ माहे सफर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखाक [२९४] श्री + संवत् १८२४ श्रावण वद्य १०

[ १९ अगष्ट १७६७ ]




राजश्री लालाजी बलाल
कमाविसदार सस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो केदारजी सिंदे दडवत सुाा उमान सितेन मया व अलफ तुम्ही पत्रे पाठविली ती पावली. सविस्तर वर्तमान विदित जाले. येशास माहारावजीस सांगणे जे खंडणीच्या येवजाचा फैस[ला] करणे आणि पुढील मामलतीच्या जाबसाल करावयास पुढे कोणास पाठवणार ते जल्दीने पाठवणे. खासा स्वारी ते प्रांती आल्यानी तर [ते] देतीलच परंतु सलूकानी देतील तर त्यास उपसर्ग होणार नाही. नाही तर मुलुक खराब होईल. हे पष्ट समजावणे. ग्‍जाणिजे छ * २३ माहे रावल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [२९५] श्री * संवत् १८२४ आश्विन शुद्ध २

[ २५ सितंबर १७६७ ]




राजश्री लालाजी कादार पाा पाटण गो.

अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो केदारजी सिंदे दडवत सुाा समान सितेन मया व आलफ श्री केशवराजाचे पुजारी यासि धर्मादाव सालीना रूये वीस पेशजीपासून पावत होते. त्यास हाली सदरहू वीस रूये तुम्हाकडून पाा पजकूरापैकी साल मजकूरच्या येवजी देविले आहेत. तरी सदहू प्राा वीस रूये पुजारी यास पावते

